


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.








अनुक्रमणिका

अनुक्रमणिका












नोव्हेंबर १९६९ ● मूल्य ४ रुपये

## श्रे य ना.मा व ली

- **चित्रकलाकृती :** होनाजी, पर्शराम, प्रभाकर व रामजोशी या महाराष्ट्र–शाहीरांच्या लावण्यातील मद्‌होष शृंगारनायिका: चित्रकार **दीनानाथ दलाल**
- **विंगचित्रमालिका :** दी ग्रेट डेमोक्रॅटिक सर्कस याने लोकशाहीचा खेळ (खंडोबा) ▲ **चुंबन**–एक देणे–घेणे ▲ एक नवा ल्योकनाटचोत्सव ▲ साहित्यातील गेरू जमात ▲ शासकीय धोरणे (आणि धोरणी राज्यकर्ते) ▲ धन्य ही गायनी कळा–व्यंगचित्रकार: दलाल आर्ट स्टुडिओ, अशोक डोंगरे आणि शाम जोशी
- **दोन कादंबरिका** स्वप्नांच्या सावल्या—**जयवंत दळवी** आणि सरळ चालीचा उंट—**अच्युत बर्वे**
- **कथा :** पु. भा. भावे ▲ अरविंद गोखले ▲ रणजित देसाई ▲ मधु मंगेश कर्णिक ▲ प्रभाकर पेंढारकर सुरेश वेंगुर्लेकर ▲ रवींद्र पिंगे ▲ प्र. श्री. नेरुरकर ▲ वि. वा. पत्की
- **विनोदी कथा :** भालचंद्र साहानी ▲ माधव अत्रे ▲ अनिल फळणीकर ▲ प्रभाकर मोटे (विनोदी साहित्य–स्पर्धेतील यशस्वी कथा)
- **ललित व वैचारिक लेख :** माधव राजवाडे ▲ आनंद साधले ▲ राजाराम हुमणे ▲ प्रभाकर अत्रे ▲ दादूमिया
- **लावण्या व कविता :** कुसुमाग्रज ▲ बा. भ. बोरकर ▲ वा. रा. कान्त ▲ राजा बढे ▲ मंगेश पाडगांवकर सूर्यकांत खाण्डेकर ▲ कोण्डवा ▲ डॉ. सरोजिनी बाबर ▲ अशोक परांजपे ▲ सुरेश जगताप ▲ प्रा. सदानंद रेगे ▲ पंडित महाजन याशिवाय विर्वलायन—**श्री. ग. सबनीस.**



टे. नं. ३५७७६५
Gram : DALALART

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल** यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.
Registered with the Registrar of Newspapers for India under No. RN 1612/57







अनुक्रमणिका




पंचवीस वर्षे ! माणसाच्या आणि मासिकाच्या आयुष्यातली एक महत्त्वाची, निर्णायक अवस्था ! त्या अवस्थेला कुणी कुणी 'गद्धे पंचविशी' म्हणनही संबोधतात. आणि तरीही ती सारी अवस्था शब्दांत पकडता येतेच असंही नाही. पंचविशीत माणूस शिरला की तो स्वतःबद्दल व लोक त्याच्याबद्दल बराच काही विचार करू लागतात. मासिकाची 'पंचविशी' हीही एक महत्त्वाची अवस्था आहे. ती केवळ 'रौप्य महोत्सव' नसतो. तर तो असतो एक आरसा. स्वच्छ, निर्मळ, बिलोरी आणि सच्चाही ! त्या आरशासमोर 'दीपावली' आज उभी आहे. सतत पंचवीस वर्षे हे दीप जळत राहिले आहेत. प्रकाशत राहिले आहेत. 'दीपावली' आज रौप्य महोत्सवाच्या प्रवेशद्वाराशी उभी आहे.

इसवी सन १९४५. दीपावलीचा तो अंक 'साहित्य-कला-संस्कृती' बिरुदे मिरवीत मिरवीत निघाला. समईवर निरांजन पेटविणारी, मोहक व हसऱ्या चेहऱ्याची एक स्त्री एक नवे आवाहन घेऊन मराठी वाचकांपुढे उभी ठाकली. संपादक म्हणून रॉय किणीकर यांच्याबरोबर माझेही नांव त्या अंकावर होते. आचार्य काका कालेलकर यांच्यापासून ते श्री. म. माटे, आचार्य अत्रे, प्रा. ना. सी. फडके, बा. सी. मर्ढेकर, वा. म. जोशी, स. आ. जोगळेकर, रांगणेकर, पु. य. देशपांडे, खांडेकर, पोतदार, य. गो. व चिं. वि. जोशी, ना. ह. आपटे, पु. भा. भावे, बांदेकर, पाध्ये, ठोकळ —किती नावे सांगू ? पहिल्या अंकाच्या मानकऱ्यांपैकी काहींना काळाने आपल्यातून उचलून नेले आहे. अत्रे, माटे, स. आ. जोगळेकर, मर्ढेकर, बांदेकर, वा. म. जोशी, य. गो. व चिं. वि. जोशी ही सारी माणसे गेली. त्यांच्यापैकी स. आ. जोगळेकर हे तर 'दीपावली' कुटुंबातलेच ! त्यांचा सहवास आणि लेखन दीपावलीला लाभले हा आमचा भाग्ययोग ! शृंगारनायिका, गाथा सप्तशती, अहिल्या, वारियाने कुंडल हाले, प्रवृत्तिरेषा भतानाम्, यथा काष्टं च काष्टं च आदि साहित्य हे केवळ दीपावलीचेच भूषण नव्हते तर ते त्यांच्या साहित्य-संसाराचेही भूषण होते. त्यांनी दीपावलीबद्दल सतत अभिमान बाळगला आणि दीपावलीनेही त्यांच्या अकृत्रिम स्नेहभावनेबद्दल कृतज्ञता नेहेमीच मनोमन जपली आहे. उपरोक्त सर्व थोर साहित्यिकांच्या स्मृतीला आजच्या प्रसंगी मी वंदन करतो.

खरं सांगायचं झालं तर मी केवळ अपघातानेच 'संपादक' झालो. माझे मित्र रॉय किणीकर हे मोठे कल्पक गृहस्थ आहेत. मराठीतल्या ह्या पहिल्या 'वार्षिका'ची कल्पना (दीपावली हे मराठीतले पहिले वार्षिक आहे ह्याची आज कित्येक वाचकांना कल्पनाही नसेल) त्यांच्याच सहवासात स्फुरली आणि त्यांच्याच सहकार्याने कार्यान्वितही झाली. "दिवाळी अंक" ही त्या काळात "मासिके" व 'नियतकालिके' यांचीच मिरास होती. 'वार्षिका'ची कल्पना त्यावेळी अनेकांनी साहसी अतएव हास्यास्पद ठरविली होती. पण संकेत आणि परंपरा मोडून काही नवी मळवाट चोखाळण्याचा प्रयत्न कलेच्या व जीवनाच्या क्षेत्रात नेहमीच होत राहिला आहे. कलेच्या गति-प्रगतीला तसले प्रयत्न नेहमीच उपकारक ठरत आले आहेत, अशी माझी मनोमन श्रद्धा आहे. त्या श्रद्धेतूनच 'दीपावली' वार्षिकाचा संकल्प घडला ! त्या संकल्पाचे पालन 'दीपावली'ने सतत पंचवीस वर्षे केले. त्या संकल्प सिद्धीच्या मार्गातील पहिला सुवर्णकाल म्हणजे हा रौप्य महोत्सव !

तसे तर दीपावलीने अनेक संकेत मोडले. नवे संकल्प सिद्धीस नेले. कलेच्या क्षेत्रातले, साहित्याच्याही क्षेत्रातले अनेक नवे आविष्कार रसिकजनांना सादर केले. नव्या परंपरा निर्माण केल्या. रुजविल्या. "नित्य नवे, मजसि हवे" ही दीपावलीची निष्ठा होती, धारणा होती व आहे. 'दीपावली'च्या कलासाधनेतले ते परवलीचे तत्त्व होते. 'दीपावली'ने नवी 'चित्रसज्जा' रूढ केली. ती करतांना


| प्रकाशन स्थळ | ऑफसेट छपाई | रंगीत चित्र छपाई | ब्लॉक्स | छपाई |
|---|---|---|---|---|
| दलाल आर्ट स्टुडियो, ४०/४२, केनेडी ब्रिज, मुंबई-४ | जगदीश्वर प्रिंटिंग प्रेस गायवाडी, मुंबई-४ | आशा प्रिंटरी खेतवाडी, मुंबई-४ | प्रभात प्रोसेस स्टुडियो, मुंबई धारगळकर प्रोसेस (प्रा.) लि. मुंबई-२८ | अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई-४ |

पुढील अंक क्रिकेट पुरवणीसह १ डिसेंबरला नेहमीप्रमाणे प्रसिद्ध होईल !

"'चित्राकरता चित्रे' दिली नाहीत. अभिरुची सोडली नाही. सवंग लोकप्रियता व भाबडा भक्तिभाव यांचे भांडवल कधी केले नाही. विपुल चित्रे योजनाबद्ध पद्धतीने दिली. त्यांचं एक वेगळं 'अपील' निर्माण केलं. वुडकटस्, लिनोकटस्, ईचिंग ह्या पद्धती दीपावलीने रूढ केल्या. 'ऑफ्सेट' छपाईचा मार्गही 'दीपावली'ने प्रथम चोखाळला. ग्रावूर पद्धतीच्या काश्मीर रेखाचित्रांचा, दुरंगी बिगचित्रमालांचा, विषयानुगामी बिगचित्रमालांचा, सामाजिक बिगचित्रमालांप्रमाणेच राजकीय बिगचित्रमालिकांची पद्धत अधिक समर्थपणे रूढ करण्याचा प्रयत्न दीपावलीने केला. दीपावलीच्या चित्रमालांचे संच हे खास मागणीचा विषय झाले होते ही अभिमानाची गोष्ट आहे. 'दीपावली'च्या चित्रमालांवर आधारित 'भारताचे भाग्यविधाते', 'शृंगार नायिका' व 'अमृतमेघ' ही 'दीपावली'ची प्रकाशनेही लोकप्रिय झाली तीही त्यातल्या योजनाबद्ध प्रयत्नशीलतेमुळेच.

साहित्याबाबतचेही अनेक नवीन प्रयोग 'दीपावली'ने प्रथम केले आणि आता ते 'मराठी'त लोकप्रियही झालेले दिसतात. अलिकडे दिवाळी अंकातून संपूर्ण कादंबरी वा कादंबरिका देण्याची पद्धत खूपच 'लोकमान्य' झालेली दिसते. परंतु दिवाळी अंकातून संपूर्ण कादंबरी देण्याची पद्धत 'दीपावली'ने प्रथम रूढ केली हे कदाचित सांगूनही खरे वाटणार नाही. १९४९ साली 'दीपावली'ने श्री. पु. भा. भावे यांची गाजलेली 'अकुलीना' ही कादंबरी 'इंद्र' ह्या टोपण नावाने प्रसिद्ध केली. विषय, आशय व अभिव्यक्ती ह्या सर्वच दृष्टींनी 'अकुलीना' ही मराठीतील एक आगळी कादंबरी आहे हे आतां साऱ्यांनी मान्य केले आहे. त्या कादंबरीवर मराठीत चित्रपटही निघाला आहे हेही मराठी वाचकांना विदित आहेच. विभावरी शिरूरकर ह्या त्यावेळी गाजलेल्या लेखिकेचीही कादंबरी दीपावलीने प्रसिद्ध केली आहे.

सर्वश्री वि. स. खांडेकर, ना. सी. फडके, पु. भा. भावे, अरविंद गोखले, पु. ल. देशपांडे, कुसुमाग्रज, चोरघडे, अच्युत बर्वे, बोरकर, पाडगांवकर, जी. ए. कुलकर्णी, माडगुळकर बंधु, मिरासदार, दळवी, वसंत सबनीस, काणेकर, रणजित देसाई, विभावरी, तेंडुलकर, दा. गो. देशपांडे, कान्त, बढे, शां. शं. रेगे आदि अनेकांनी गेल्या पंचवीस वर्षात साथ दिली. त्यापैकी काहींचे 'द बेस्ट' हे 'दीपावली'च्या मांडवातून रसिक वाचकांपर्यंत मिरवत गेले आहे. त्या 'द बेस्ट'चा परिचय करून देण्याच्या निमित्ताने गेल्या काही अंकातून आम्ही काही लेख प्रसिद्ध केले आहेत. त्या त्या लेखातून त्यासंबंधीची 'यश-गाथा' वाचकांना वाचायला मिळाली असेलच. त्या भागाची पुनरावृत्ती टाळतो. तरीही काही गोष्टींचा खास उल्लेख करायलाच हवा. 'परिसंवाद' हे दीपावली वार्षिकाचे वैशिष्टच होते. देश मराठी, लोक मराठी, मराठीच भाषा, महाराष्ट्र देश सुंदरा, माफ करा, गैरसमज नको, रसिकहो, किती चतुर बायका, मला परदेशात भेटलेली अविस्मरणीय स्त्री, बरे झाले देवा, मराठी माणूस–१९२० ते १९६०, आदि शीर्षकांवरून सुद्धा ह्या परिसंवादाच्या विषयांची विविधता ध्यानी येईल. दीर्घ काव्ये, कथा काव्ये, नाट्य काव्ये, विनोदी कविता, दीर्घ कथा, एक पानी कथा, चरित्र कथा, ऐतिहासिक कथा आदि अनेकविध प्रयोग दीपावलीने केले आहेत. दीपावली वार्षिकाने 'मासिक' रूप धारण केल्यानंतर (१९५९) ज्या अनेकविध लेखमाला सादर केल्या त्याही गाजल्या. त्यांची पुस्तके झाली. त्यातली काही पारितोषिकपात्रही ठरली आहेत – पोत (चित्रकार व. ग. गोडसे) हा जय नावाचा इतिहास आहे (आनंद साधले) उत्तर दिग्विजय (पु. भा. भावे) शिवा राणीच्या शोधात (दिलीप पु. चित्रे) आम्ही असे लिहितो (मुलाखतमाला–प्रभाकर अत्रे) अंदमान ते आनंदमान (माधव राजवाडे) ह्या लेखमालांचा खास उल्लेख करता येईल. प्रा. अनंत काणेकर यांच्या 'रुपेरी वाळू' ह्या पुस्तकाने मराठी साहित्य–टीकाक्षेत्रात धमाल उडवून दिली होती. त्याबाबतचा 'दंभस्फोट' करणारा त्यांचा लेख (मी–महाकवि) दीपावलीतच प्रसिद्ध झाला होता हे वाचकांना स्मरत असेलच. त्या लेखातले 'सत्य' आजही टिकून असल्याने त्याचे स्मरण ताजे राहते आणि ओठावर हसू फुलते.

दीपावली "मासिक" स्वरूपात प्रसिद्ध होऊ लागली. आणि वैशिष्टचपूर्ण दिवाळी अंकाप्रमाणेच अनेक विशेषांक सादर करण्याची परंपरा रूढ केली आहे, राखली आहे. "संगीत विशेषांक" (शास्त्रीय अंक नव्हे) हे दीपावलीचे खास वैशिष्टच! आक्रमण झाले की शासनाला व लोकांना सेवादलांचे स्मरण होते. एरव्ही ही दले असतात येवढेच ठाऊक असते. 'दीपावली'ने भूदल, वायुदल व नौदल असे तीन विशेषांक देऊन एक सार्वकालिन 'राष्ट्रीय' कर्तव्य पार पाडले आहे. 'क्रिकेट' हा एक चिरनव विषय! त्या विषयाला दीपावली दरवर्षी एक अंक बहाल करीत आली आहे. याशिवाय एव्हरेस्ट गौरव अंक, वैश्विक विनोद अंक, 'अ–जून' विशेषांक ह्या अंकांचा मुद्दाम उल्लेख करायला हवा. 'अजून' अंकाची कल्पना तर सर्वस्वी अभिनव होती. ते एक धाडस होते. मुंबईतील एका उपनगरात राहणाऱ्या व साहित्यविषयक 'रस' असलेल्या काही उत्साही साहित्यभक्तांच्या हाती 'संपूर्ण' अंक दीपावलीने दिला होता. त्या अंकाचे नाव 'अजून' विशेषांक! संस्थेचे नाव 'अजून' म्हणून तो अंकही तसाच निघाला. संयोजन, लेखन, संपादन, सदरे आदि सर्व गोष्टी 'अजून' मंडळींनी केल्या. दीपावलीच्या ह्या प्रयोगाबाबतचे सारे श्रेय संपूर्णपणे श्री. दा. गो. देशपांडे, कांत, ना. व्यं. देशपांडे आदि 'अजून' मंडळींचे आहे यात शंकाच नाही.

ह्या पंचवीस वर्षातल्या आणखी एका महत्त्वपूर्ण प्रयोगाचा उल्लेख करणे आवश्यक आहे. तो प्रयोग आहे 'हिंदी वार्षिका'चा! मराठी वार्षिकाची हिंदी आवृत्ती काढण्याची कल्पनाही 'दीपावली'चीच! ती केवळ हिंदी आवृत्ती (भाषांतरे) नव्हती. हिंदीमधील अनेक मान्यवरांनी त्या वार्षिकात स्वतंत्रपणे हजेरी लावलेली आहे.

(पान. २२० वर पहा)








## पु. भा. भावे

**शे**खर, पुन्हा तुम्ही मला भेटण्याचा प्रयत्न करू नका. मला सारखी पत्रं पाठवून सतावण्याचंही कारण नाही. तुमच्या कोणत्याही पत्राचं उत्तरं तुम्हांला माझ्याकडून मिळणार नाही. आमच्या घरी येण्याची मी तुम्हांला बंदी करू शकत नाही. ते काम हवे तर आईबाबा करतील. आईबाबांच्या अनुमतीनंच मी तुमच्या खोलीवर येत होते. कधीमधी तुमच्याबरोबर बोलपटाला नाहीतर फिरायलासुद्धा येत होते. आपण लग्न करणार असं माझे आणि तुमचेही आईवडील गृहीत धरून चालले होते. त्यांचे स्नेहसंबंध पुढच्या पिढीपर्यंत त्यांना चालवायचे होते. त्यांच्या उत्तेजनामुळेच आपली ओळख वाढली. आपण एकमेकांवर जवळजवळ 'प्रेम' करू लागलो. तुम्ही एम. बी. बी. एस. झालात आणि मी बी. ए. झाले, म्हणजे आपण लग्न करणार हे जवळजवळ ठरल्यासारखंच होतं. आपला साखरपुडा झाला नाही हेही एकंदरीत बरंच झालं. नाहीतर हे लग्न मोडणं अवघड गेलं असतं. आता मात्र अगदी निश्चित मनानं मी हे लग्न मोडले आहे. तुमचा माझा जो काही संबंध होता, तो संपविते आहे.

कां संपवते आहे? हाच प्रश्न तुम्ही मला तुमच्या पत्रांतून पुन्हा पुन्हा विचारता आहांत. हे रोप लावल्यावर आणि त्याला खतपाणी दिल्यावर मी ते कां उपटून फेकते आहे? ते रोप उपटून फेकलंच पाहिजे असं मला वाटलं म्हणून मी ते उपटून फेकते आहे. या रोपाचा वृक्ष होणं शक्य नाही आणि वृक्ष झाला तरं त्याला चांगली फळं येणं शक्य नाही अशी माझी निश्चित खात्री पटलेली आहे. तुम्हीच तुमच्या वर्तनानं माझी तशी निश्चिती पटवून दिलीत. मी हे रोप रुजू दिलं येवढा माझा अपराध मी मान्य करते. मी तुम्हांला थोडंबहुत उत्तेजन दिलं. तुमच्याबरोबर फिरायला आले, बोलपटांना आले. तुम्हांला पत्रंसुद्धा लिहीली. त्या पत्रात मी कुठंही मर्यादा सोडलेल्या नाहीत हे तुम्हांला ठाऊकच आहे. म्हणून त्या पत्रांचं मला भय नाही. तरी पण मी तुम्हांला पत्रं लिहीली हे खरंच आहे. गावातल्या गावात पत्रं लिहीली हे खरं आहे. त्या पत्रात एका कोमल भावनेची चाहूल होती, हेही खरं आहे. ती कोमल भावना तुमचं आणि माझं आयुष्य व्यापून टाकण्याइतपत वाढू शकली असती. पण तुम्ही ती तशी वाढू दिली नाहीत. कोमलता, संकोच, मर्यादा, या गोष्टींशी तुमचा फारसा परिचयच नाही. जे ओबडधोबड उघडंवाघडं, ग्राम्य, दिखाऊ, उथळ, तेच

**...असलं कसलं ग तुझं नाव ? म्हणे यमुना ! यमू...यम्री... यमुना...त्यापेक्षा यामिनी हे नाव किती सुंदर आहे, त्याचा अर्थही किती सुंदर आहे...यामिनी म्हणजे रात्र...सर्वांना सुखावणारी...**

तुम्हांला आवडतं. वरं झालं, फार उशीर होण्यापूर्वीच हे सारं माझ्या ध्यानात आलं. एरवी जन्मभर मला आणि कदाचित तुम्हांलाही पश्चात्ताप करीत बसण्याची वेळ आली असती. अगदी प्रारंभीच मी तुम्हांला तोडून टाकलं नाही, इथं हवं तर माझं चुकलं म्हणा, पण मी तुम्हांला एकदम तोडू तरी कशी ? आपल्या आईबापांची इच्छा आपलं लग्न जुळावं अशी होती. तुम्ही गावात एकटे राहात होतात, म्हणून साहजिकच माझे आईबाबा तुम्हांला आमच्या घरी वारंवार जवायला आणि कधी कधी राहायला सुद्धा बोलावत होते. म्हणजे घरची आडकाठी अशी आपल्याला काही नव्हतीच. होतं ते सगळं उत्तेजनच होतं. त्या उत्तेजनानं आणि थट्टेच्या बोलण्यानं माझ्या मनाची बरीचशी सिद्धता आधीच करून ठेवली. वरं तसं माझं वय तरी काय होतं ? सारं अठरा वर्षांचं वय. या वयात मुलींचं मन हुरहुरल्यासारखं झालेलं असतं. नव्या प्रकारची स्वप्ने ती पहात असते. एका परीनं कुणाच्या तरी प्रेमात पडायची ती वाटच पहात असते. प्रश्न असतो तो केवळ संधीचा आणि सहवासाचा. ती संधी आयतीच तुमच्या रूपानं माझ्यासमोर चालून आलेली होती. वरं, प्रथमदर्शनी न आवडण्यासारखं असं तुमच्यात काही नव्हतं. होतं ते बहुतेक सगळं आवडण्यासारखंच होतं. तुमच्यापाशी शिक्षण होतं. कुळ होतं. पैसा होता, वयानं तुम्ही मला अनुरूप होता. आणि तुमचा चेहेरामोहराही तसा चांगलाच होता. माझ्या प्रेमात पडण्याची तुम्ही सिद्धताच केलेली होती. (ती सिद्धता तुमच्या आईवडिलांनी करून दिली असेल) मीही रूपानं शंभरजणींत एक होते, शिकलेली होते, चांगल्या कुळातली होते आणि माझ्या आईवडिलांची सांपत्तिक स्थितीसुद्धा चांगली होती. तेव्हा मी तुम्हांला एकदम आवडले तर त्यात नवल नाही. तुम्ही सुद्धा मला प्रथमदर्शनी आवडलात. मला तुमची एकच गोष्ट आवडली नाही. तुम्ही कसला तरी भडक चौकड्यांचा सदरा घातला होता, तो फक्त आवडला नाही. तुम्ही आमच्या इथे प्रथम येऊन गेलात, त्यानंतर माझ्या बाबांनी मला विचारलं सुद्धा—"काय यमू ? कसा काय वाटला मुलगा ?" मी म्हटले, "मला त्यांचा तो भडक चौकड्यांचा शर्ट काही आवडला नाही." त्यावर ते खो खो करून हसत म्हणाले, "अग शर्ट आवडला की नाही, ते नाही मी तुला विचारलं ! मुलगा आवडला की नाही ते सांग !" त्यावर मी काहीच उत्तर दिलं नाही, नुस्तीच मान खाली घातली. तुम्ही मला आवडला होतात. वरवर पाहून न आवडण्यासारखं तसं तुमच्यात काही नव्हतंच. त्या शर्टच्या विषयात आईसुद्धा मला म्हणाली, 'अग, आजकालची मुलं घालतात असेच काहीतरीही कपडे ! माणसाकडे पाहावं, कपड्याकडे काय पाहायचं ?' मला तिच्या बोलण्यात तथ्य वाटलं. तरी तुमचे ते भडक कपडे माझ्या डोळ्यात सलतच होते. माझी आवड मंद आहे. मला मंद रंगाचे कपडे आवडतात. फुलांचे मंद सुगंध आवडतात, हसणे मंद आवडते, उगाच खिंकाळून हसलेले आवडत नाही. आमच्या घरी सगळ्यांच्याच आवडी तशा आहेत. माझ्यावर संस्कारसुद्धा तोच आहे. माझी उपजत आवडसुद्धा तशीच आहे. भडक कपडे मी कधी वापरीत नाही. शरीराचं प्रदर्शन करणारे कपडेसुद्धा कधी चुकून वापरीत नाही. पण या विषयातली तुमची आवड वेगळी असल्याचं माझ्या अनुभवाला आलं. तेवढ्यापुरती मी तडजोड केली. तुम्ही आमच्याकडे येत राहिलात. तुमचं माझं संघटन वाढू लागलं. एकदा असेच तुम्ही जेवायला आलात. आमच्याकडे जेवायला यायची तुमची ती पहिलीच वेळ होती; पण त्या पहिल्याच वेळेला तुम्ही असं काहीतरी केलंत की जे पाहून मला कससंच वाटलं. समोर ठेवलेल्या पुऱ्या उजव्या डाव्या दोन्ही हातांनी तुम्ही उचलल्यात आणि कागद फाडावा तसे त्यांचे तुकडे केलेत. तुमच्या त्या गांवढळ वागण्याकडे मी नुसती पाहातच राहिले. आईबाबांनीही तुमचं ते दोन्ही दोन्ही हातांनी पुऱ्या फाडणं पाहिलं. मला तो प्रकार फार खटकला. आम्ही स्वच्छता पाळतो. उष्टं खरकटं हवं तसं कालवीत नाही. खाण्याच्या वस्तूंना केवळ उजवाच हात लावायचा अशी लहानपणापासून मला शिकवण आहे. आणि इथं पाहावं तर तुमच्यासारखा डॉक्टरी शिकणारा माणूस दोन्ही हात अन्नाला लावीत होता. आपली पद्धत चुकली, हे तुमच्या गावीही नव्हतं. तसेच जेवून तुम्ही निघून गेलात. मी मात्र उदास झाले. मला रडायला यायला लागलं. मी उदास कां ते आईला तात्काळ कळलं. ती बाबांना म्हणाली, "पाहिलंत का तुमची मुलगी रडते आहे. कां ते ठाऊक आहे का ?" "ठाऊक आहे" बाबा म्हणाले, 'जावईबोवांनी जेवताना दोन्ही हात वापरले. तिथे हिचं बिनसलं ! अग पण तो बरीच वर्ष दिल्लीला राहिला आहे. तिथल्या मोंगली सवयी त्याला न लागत्या तरच नवल ! जातील हळू हळू."

तेवढ्यापुरतं त्या शब्दांवर मी समाधान मानलं. ती गोष्ट मी हळूहळू विसरून गेले. तुम्ही मला नाना प्रकारच्या भेटवस्तू देत होतात. मला कधीमधी बोलपट पहायला नेत होतात. फिरायला नेत होतात. आपण एकदा फिरायला गेलो तेव्हांची गोष्ट. माझ्या कंबरेभोवती हात टाकून चालण्याचा तुम्ही प्रयत्न केलात. मी तुमचा हात लागलीच झिडकारला. तेव्हा तुम्ही म्हणालात, "हे काय ? मी तुझ्या कंबरेभोवती हात टाकला तर तू विटाळशील की काय?" मी उत्तर दिलं, "तुमच्या हातांचा नाही, पण लोकांच्या दृष्टीचा मला विटाळ वाटतो. या गोष्टी चारचौघांत करायला मला अगदी आवडत नाहीत. तेव्हा तुम्ही





अनुक्रमणिका

म्हणालीत, "लग्न झाल्यावर आपण या गोष्टी करणारच की नाही ?" तेव्हा मी उत्तर दिलं, "लग्न झाल्यावर जे करायचं ते लग्नाआधी करणं बरं नाही, आणि लग्नानंतरसुद्धा भर चव्हाट्यावर मी तुम्हांला हे असं वागू देणार नाही." माझं बोलणं ऐकून तुमचा विरस झाला. तुम्ही नुसतेच खांदे उडविलेत आणि दुरून चालू लागलात. पण प्रेमाच्या प्रदर्शनाची तुम्हांला सवयच असली पाहिजे. एकदा खळघरात तुम्ही माझ्या खांद्यावरून हात टाकलात आणि माझ्या अंगावर रेललात, एवढच नव्हे तर अंधार झाल्यावर तुम्ही मला जास्त जास्त खेटू लागलात, तेव्हा मी एकदम उठून उभी राहिले आणि म्हणाले, "तुम्ही असं वागणार असाल तर मी घरी जाते." त्याच वेळी मागून मोठ्यानं कुणी तरी ओरडलं, 'भली जिरली.' तेव्हा कुठं तुम्ही माझ्यापासून दूर झालात. मध्यंतर झालं तेव्हा माझ्या लक्षात आलं की 'भली जिरली' म्हणून ओरडणारा तुमचाच वर्गबंधू आणि मित्र होता. तुम्ही त्याच्याशी जणु काही काही झालंच नाही अशा रीतीने बोलू लागलात. मी मात्र लाजून चूर झाले आणि लांब उभी राहिले. तुम्ही दिलेलं आईस्क्रीमसुद्धा माझ्या घशाखाली गेलं नाही. मी ते फकून दिलं, तेव्हा तुम्हीं म्हणालात "अगदीच तू कशी ? चारचौघात तू आज माझा अपमान केलास." मी म्हणाले, "चारचौघात मागं तुम्ही माझा आणि आपल्या प्रेमाचा अपमान केलात. चारचौघात असं वागलेलं मला आवडलं नाही, हे मी तुम्हांला सांगितलं आहे."

आणि खरोखरच तुमचं ते वागणं मला मुळीच आवडलं नव्हतं. मला असं वाटलं होतं की स्त्री-पुरुषांचं प्रेम ही एक फार पवित्र आणि फार कोमल वस्तू आहे. तिचं सार्वजनिक प्रदर्शन करणं हे पाप आहे. ते चांगल्या संस्कृतीचं किंवा चांगल्या अभिरूचीचं लक्षण नाही. स्त्रीपुरुषांच्या प्रेमाला साक्ष त्या दोघांची आणि एकांताचीच पाहिजे. चारचौघात करण्याची ती गोष्ट नव्हे! काही गोष्टी तुमच्या माझ्यातल्याच



## जोगिण

रंगिल रस्ते बंद मला हे
मोह मुलायम धरू नका
त्या किनखापी स्वप्नपुराची
कनात वरती करू नका
मठ उभा करोनी मनात मी
राजसा
जोगिण जाहले हा जन्माचा
वसा
मज दिला भवाने शून्याचा
वारसा
काळोखाच्या तळघरात या
दिवा घेउनी शिरू नका
गर्भरेशमी जरिपटका या
निवडुंगावर चिरू नका.

—कुसुमाग्रज

आहेत आणि त्या तुमच्या माझ्यातच राहिल्या पाहिजेत. दुसऱ्या कुणाची दृष्टी पडता कामा नये. तो प्रेमाच्या भावनेचा अपमान आहे. ज्या गोष्टी एकांतात करायच्या, त्या चारचौघात करणं, म्हणजे एकापरीनं त्यांचा बाजार मांडणं, त्यांचं प्रदर्शन करणं. मला हे प्रदर्शन मुळीच मान्य नव्हतं. म्हणून पुढच्या खेपेस तुमच्याबरोबर बोलपटाला यायचं मी नाकारलं. माझ्या नकाराचं कारण आईबाबांच्या ध्यानात आलं. ते मला म्हणाले, "हे पहा, तो तरुण आहे. थोडा उच्छृंखलपणा करीत असेल. तू जरा संभाळून वाग म्हणजे झालं. त्याचं मन मोडू नकोस. बोलावतो आहे, तर जा सिनेमाला !"

मग मी तुमच्याबरोबर सिनेमाला आले. तुम्ही पुन्हा तसेच वागलात. मीही थोडीशी चाळवली गेले. पण मी स्वतःला वेळीच आवरलं. पुन्हा मी उठून उभी राहिले. आणि पुन्हा मागून तेच शब्द उमटले, 'भली जिरली.' तुमचा तो मित्र ते शब्द बोलला होता. मला रडू आलं. तुम्ही माझी समजूत काढलीत. 'त्यात काय आहे ?' म्हणालात. "एवीतेवी आपलं लग्नच व्हायचं आहे" म्हणून मला सांगितलंत. कशानंही माझी समजूत पटेना, तेव्हा तुम्ही माझी क्षमा मागितलीत, मला एक सुंदर साडी घेऊन दिलीत. मी झालं गेलं विसरले. तुम्ही आमच्या घरी येत राहिलात, माझ्याशी गोड बोलत राहिलात क्वचित एकटे असताना तुम्ही माझा हातही दाबत होतात. त्या स्पर्शाचा परिणाम माझ्यावर होत होता. मी धारेला लागल्यासारखी झाले, तुम्ही गेल्याबरोबर मी तुम्हांला लांब लांब पत्रं लिहू लागले. तुमच्या पत्रांतून तुम्ही मला 'यामिनी' म्हणत होतात. 'यामिनी'चं पुष्कळदा तुम्ही 'यामा'ही करीत होतात. माझं नाव यमुना. आईबापांनी ठेवलेलं माझं ते नाव मला फार आवडतं. पण तुम्हांला काही ते नाव आवडेना. तुम्ही एकदा मला म्हणालात, "तुझ्या आईबाबांनी तुझं कुठलं जुनाट नाव ठेवलं आहे ! म्हणे यमुना ! तुला हे नाव आवडतं का ?" "आवडतं" मी म्हणाले, "न आवडण्यासारखं त्या नावात काय आहे ?

"अग, आवडण्यासारखं काय आहे ते सांग", तुम्ही म्हणालात. "यमुना हे नाव घेतलं की माझ्या डोळ्यांसमोर हरिभाऊ आपट्यांच्या काळातली एक जुनाट बाई उभी राहते." त्यावर मी उत्तर दिलं, "यमुना या नावामुळे माझ्या डोळ्यांसमोर मात्र सारं गोकुळ उभं राहतं. कृष्णाचा पावा मला आठवतो. चांदण्या रात्री डोळ्यांसमोर दिसू लागतात. नंद, यशोदा, गाईंची खिल्लारं, एक की दोन गोष्टी सांगू ? यमुना हे नाव कधी जुनं वाटण्यासारखं नाहीच ! जसं सिंधु, कृष्णा, गंगा ही नावं जुनी वाटण्यासारखी नाहीत."

"पण मला नाही ते नाव आवडत !

(पृष्ठ २०८ वर)










TOM & BAY SK : 6757 M

# सतत ४१ वर्षे

## आपल्या सेवेंत!




**मे. एच्. साळवे, कदम आणि कं.**
**निपाणी (जि. बेळगांव)**



अंगावर घेतलेली अखेरची अवघड जबाबदारी आता पार पडणार होती. त्यांच्या मुलाचं लग्न हे आयुष्यातलं सगळ्यात अवघड नि तेवढंच आवश्यक कृत्य होतं....कलंक धुवून टाकणारं....पीळ शाश्वत ठेवणारं....

— अरविंद गोखले

पहाट फुटली तरी दिदींच्या डोळ्याला डोळा लागला नाही. सारी रात्र त्या सताड डोळ्यांनी देवघराजवळच्या शिसवी खांबाला टेकून सुन्न बसून राहिल्या होत्या. त्यांच्या पुढ्यात कितीक माणसं आपुलकीने, आर्जवाने बसून बोलून गेली. भाऊ, भावजया, लेक, सुना, भाची, भाचेजावई. पण कशानेच त्यांचं मन हाललं नाही की पापणी थरथरली नाही. लग्न समारंभानिमित्त आलेल्यापैकी अखेरचे पाहुणे परतले. न उलगडलेली लुगड्यांची जांगड नि न उघडलेल्या सामानांच्या पिशव्या परत करण्यात आल्या. चूल विझली, समई विझली. दिवसाचा कोलाहल रात्रीच्या निस्तब्धतेत विरून गेला, काळोखातली भूतं गोंधळ घालून गेली आणि परत उजेडाचं व अवाजाचं विश्व जन्म घेऊ लागलं. पण गेले आठ दिवस उसंत न घेता लेकीच्या लग्नाची तयारी करण्यात गर्क असलेल्या दिदी तिन्ही सांजच्या देवघराशी भकास होऊन बसून राहिल्या त्या तशाच! त्यांची वाचा खुंटली, आसवं आटली. अंगातलं बळ गळालं. आधीच उताराला लागलेल्या आयुष्याला आता चकवा लागल्यासारखं झालं. त्यापायीच दिदी जीर्ण, भग्न पुतळ्यासारख्या बसून राहिल्या.

दिदींची सताड दृष्टी बघवत नव्हती. सुरकुतलेली, पांढुरकी कातडी, पांढरे केस व पांढरं कपाळ नजरेतला फटफटीतपणा वाढवीत होता. फार पूर्वी दिदींचा वर्ण केतकीसारखा होता, केस काळेभोर

नि कुरळे होते नि कपाळावर मोठं कुंकू होतं. नंतर वय झालं व वैधव्य आलं; पण तरी त्यांच्या शेलाटच्या व पांढुरक्या आकृतीत तरतरी होती. रुपेरी केस नि सफेत कपाळ दृष्टीतलं तेज दाखवत होतं. पतीच्या पश्चात् सारा पसारा व तीन पोरं सांभाळतांना त्यांचं कर्तृत्व वाढत गेलं होतं. इस्टेटीचे व्यवहार ठेवायचे; भाईवंदांकडे व जमीन-जुमल्याकडे पहायचं, मुलांचं शिक्षण करायचं, दोन्ही मुलांचे संसार थाटून द्यायचे व सुनांना वळण लावायचं, सर्वांत छोटचा शेवटच्या, लाडक्या लेकीला..

छोटीने त्यांच्या उजळ चेहेऱ्याला आज काळं फासलं होतं. वैधव्य आलं तेव्हा ती पोटात वाढत होती. एकाकीपणे तिचं लालन पालन केलं, कॉलेजपर्यंत शिक्षण दिलं, नृत्य शिकायला उत्तेजन दिलं, अन् मग चांगलं स्थळ शोधून तिची नव्या आयुष्याची शिदोरी तयार केली. गोरा-पान, उंचनिंच मुलगा, इंजिनिअर होऊन नौकरीला लागलेला व लवकरच अमेरिकेला जाणारा. सधन सासर अन् घरात फक्त सासू. दिदींसारखी एकटी, मुलाला मोठं करणारी! असं दृष्ट लागणारं स्थळ मिळणं केवढं भाग्याचं !– छोटीच्या लग्नाने दिदींची आयुष्यातली अखेरची जबाबदारी संपणार होती. मग दोन्ही सुनांच्या हाती सारं सोपवून त्या स्वस्थ होणार होत्या. सुखासमाधानाने सगळ्या जंजाळातून अलग होणार होत्या. शवटच्या कार्यासाठी दिदींनी कंबर कसली. विवाह समारंभाचा मोठा पसारा घातला. कपडे दागिने, पैपाहुणे, मेजवान्या देणग्या....

अन् मग छोटी लग्नाच्या आदल्या दिवशी पळून गेली ! सकाळी मैत्रिणीकडे फ़राळाला जाते म्हणून गेली ती परतलीच नाही. लवकर परत येऊन तिला सासूबरोबर दागिने पहायला जायचं होतं. लवकर परत आली नाही म्हणून बोलावणं धाडलं तर कळलं की मैत्रिणीकडे ती गेलीच नाही. सगळ्या मैत्रिणी शोधून झाल्या, ओळखीच्या नात्यातल्या घरी पाहिलं, पण पत्ता लागला नाही. भरलेल्या लग्न घराला काळजीचं स्वरूप आलं; अन् पोलीसाकरवी शोधाशोध करूनही संध्याकाळपर्यंत ठावठिकाणा लागला नाही तेव्हा सर्वत्र अवकळा पसरली. दिदी स्वतःही शोध घेत होत्या, तशात पाहुण्यांचं पाहात होत्या, बिहीणीला निरोप धाडीत होत्या. काळीज खंबीर ठेवून दिंडी दरवाज्यापासून देवघरापर्यंत वावरत होत्या. मुहूर्त टळला–अन् मग कळलं की त्याच मुहूर्तावर छोटीने शेजारच्या गावी आपल्या प्रियकराशी विवाह केला !

नृत्यशिक्षकासारख्या हलक्या, भणंग इसमाशी आपल्या लेकीने विवाह केला ह्या वार्तेने दिदींचं काळीज फाटून गेलं. छोटी संस्कार विसरली, आईला विसरली. अगदीच झालं असतं तर आईने तिचं त्या इसमाशी लग्न लावून दिलं असतं. पण तिने चोरून प्रणय करावा, कुणाला विश्वासात घेऊ नये, घरच्यांनी लग्न ठरवेपर्यंत व मुहूर्त नक्की करेपर्यंत गप्प राहावं, आणि ऐन वेळी असं भ्याडपणे पळून जावं नि सगळ्यांच्या तोंडाला डांबर फासावं या घटनेने दिदी मूढ झाल्या. दुःखाने वेड्यापिशा झाल्या. हताश होऊन सुन्नपणे देवघराशी बसून राहिल्या.

दिदी कदाचित् कल्पांतापर्यंत तशाच भकासपणे बसून राहिल्या असत्या. भावाच्या, लेकाच्या, नातवाच्या – कुणाच्याच समजावणीला त्यांनी मानलं नाही. त्या आडव्या होतील तर बरं, असं सर्वांना वाटलं. झोपेचं औषध द्यायचं डॉक्टरनी ठरवलं. रडून मन मोकळं व्हावं म्हणून नातवांना पुढ्यात घातलं–पण त्या हालल्या नाहीत. त्यांचं हृदय शोकसंवदेना पार करून गेलं होतं. असंच कदाचित्.

तेवढ्यात धाकट्या सुनेने घाईने येऊन त्यांच्या कानात सांगितलं,

"जागं व्हा. .मां आल्या आहेत.

दिदींना इतका काळ कुणाची ओळख पटत नव्हती. काही दिसत नव्हतं, ऐकू येत नव्हतं. सगळं परकं, पारदर्शक झालं होतं. पण सुनेचे ओझरते चार शब्द त्यांना समजले व त्या एकदम सावरू लागल्या. डोळ्यांची उघडझाप झाली. जिवणी थरथरली. पदर सावरीत भुईला रेटा देऊन त्या उठू लागल्या.

"नको उठू. इथेच आणतो त्यांना.."
मुलगा म्हणाला.

त्या तशाच सरकून बसल्या. आपली अपराधी मुद्रा शक्य तितकी शांत ठेवीत त्यांनी डोईवरून पदर घेतला.

मांचा त्यांनी अपराध केला होता. छोटी नाहीशी झाल्यापासून मांची प्रसन्न मुद्रा सारखी डोळ्यापुढे येत होती. त्यांची उंचपुरी, जाडजूड, भव्याकृती समोर ठाकत होती. जीव काकुळतीला येत होता, भयाने थरथरत होता. छोटीने आपली फसवणूक केली आणि आपण मांची ! दैन्य दारिद्र्य सोसून त्या माऊलीने एकुलत्या एक मुलाला मोठं केलं. तो इंजिनिअर झाला, नौकरीला लागला, तरी त्याच्यासाठी सून निवडताना जराही लोभ धरला नाही. छोटीला क्षणात पसंत केली, हुंडा घ्यायचं नाकारलं, कसल्याच अटी अडचणी आणल्या नाहीत. थोर मनाची बाई ! आणि आपल्या लेकीपायी त्या एकाकी विधवा, मानधन मांना.

नवऱ्या मुलाची ती उंच, आडव्या अंगाची आई संयपणे आत आली. नवऱ्या-मुलीच्या शेलाटच्या, वाकलेल्या आईकडे गेली. न झालेल्या विहिणी विहिणींची दृष्टादृष्ट झाली. अपराधी मुद्रेच्या दिदी उठू लागल्या. मांनी घाईने त्यांना बसवलं. सावकाशीने त्याही समोर बसल्या.

क्षणकाल कुणी बोललं नाही. मांच्याबरोबर आत आलेल्या दिदींच्या सुना आवाज न करता मागे सरल्या. मांनी पदराने गळा पुसत खोलीवर नजर फिरवली. दिदींची दृष्टी जमिनीखाली जाऊ लागली.

जराशाने दिदींनी एकदम वर, मांकडे पाहिलं. विलक्षण काकुळतीने, अपराधाच्या जाणीवेने, क्षमेच्या याचनेने त्या म्हणाल्या,

"आम्हांला क्षमा करा. .तुमचा मोठा अपराध घडला आमच्या हातुन. तुम्हांला बट्टा...."








अनुक्रमणिका

"नका–" मां पुढे झुकून म्हणाल्या, "असं अगदी बोलू नका. . क्षमा कसली मागता ! –प्रसंग तुमच्यावर आला आहे. तुम्हांला धीर द्यायला, आधार द्यायला मी आल्ये आहे. ."

दिदींची काळवंडलेली मुद्रा एकदम बदलली. चमकून त्यांनी मांकडे पाहिलं. इतक्या मोठ्या मनाची ही स्त्री आहे ? हिच्या संसारावरही प्रहार झाला नाही काय ? एकुलत्या एक मुलाचं लग्न नियोजित वधू आधीच बेपत्ता. केवढी मानखंडना ! तरीही ही बाई सारं गिळून आपल्याकडे येते. आधार द्यायला ! हिला कुणाचा आधार ?

दिदींच्या सुन्न डोक्यात विचारांची गर्दी झाली व डोळ्यापुढे मांची मुद्रा ठळक होत गेली. त्यांना वाटलं, सांगावं– नाही, आम्ही खरोखरच अपराध केला आहे. पाप केलं आहे. तुमची, तुमच्या कुळाची मानखंडना केली आहे. आम्हांला हवं तें शासन करा. . पण त्यांच्या तोंडून शब्द फुटेना. कर्तृत्ववान, तडफदार दिदी नुसत्या चकीत होऊन बघतच राहिल्या.

मांनी आवेगांनी दिदींचे शिरांनी भरलेले पांढुरके हात आपल्या लठ्ठ पंज्यात घेतले. त्यावर थोपटत त्या पुढे म्हणाल्या,

"तुम्ही अगदी मनाला लावून घेऊ नका. अशा विचित्र वेळीसुद्धा मन शांत ठेवायचा यत्न करा. . ह्या लग्नाचं अगदी विसरा. आमच्याबद्दल अगदी काळजी करू नका की किंतु बाळगू नका. अशा परिस्थितीत तुम्हांला आम्ही समजून घ्यायला नको का ? माझ्यावर असा प्रसंग आला असता तर ? मीही नवऱ्यामागे मोठ्या धीराने आशेने मुलाला वाढवलं. त्याच्यासाठी नेकीने जगले. त्यानेच काही वेडंवाकडं केलं असतं तर ? असं चालायचंच. म्हणूनच याला संसार म्हणायचं ! ज्ञानेश्वरांनी म्हटलं आहे ना. . ."

दिदींची काया गदगदा हलली. काळजातून उमाळा आला. वाटलं, मांच्या पायांवर डोकं ठेवावं ! त्या पुढे सरल्याही. पण मांनीच पुढे होऊन त्यांना धरलं. मोठेपणाने थोपटलं. आपल्या आधाराने त्यांना धीर द्यायचा यत्न केला.

आणि मग दिदींचे इतका वेळचे सताड डोळे आसवांनी ओसंडू लागले.

* *

दिदी मग दोन दिवस सारख्या आसवं आवरीत होत्या. स्वतः साठी, मां साठी. स्वतःपेक्षा मांसाठी ! मांनी मोठं मन करून दिदींची भेट घेतली व धीर दिला– पण स्वतः ती मानधन स्त्री आतल्या आत दुःखाने पिचली असेल, काही अपराध नसताना झालेल्या अचानक वाराने उन्मळून गेली असेल, ह्या जाणीवेने दिदींचं काळीज काकुळतीला येऊ लागलं. मांच्या बदनामीपुढे दिदींचं दुःख किती वांझोटं ! दिदींची लेक सुरक्षित होती, कदाचित् सुखात होती. कसंही असो, दिदींची जबाबदारी अंगावेगळी झाली होती; पण काही चूक नसता मांची बेअब्रू झाली होती. कुजबुजणाऱ्यांना तोंड द्यायचं, किटाळ निवारत



अनुक्रमणिका

# आम्ही देखिली अतुल देखणी

आम्ही देखिली अतुल देखणी शेषफणेवर कुणि तरुणी
जिच्या द्युतीने मिटले तारे विटले सारे शशितरणी ॥ ध्रु ॥
नटरंगी ती सहज हासता चवदा भुवने रसरसली
आणि नाचता वने उपवने तारुण्याने मुसमुसली
नजर सांडता फुलुन चांदणे झाडे झाली कल्पतरू
श्वासासंगे वास वहरले, दरवळले चंदन अगरू
तिने आम्हा एकान्ति चुंबिले, किति सांगाव्या आठवणी ?
दूर-जवळचे म्हणती सारे अमुच्यावर झाली करणी
सुखदुःखाची तमा न उरली इथेच पुरली सर्व धणी
आम्ही देखिली अतुल देखणी शेषफणेवर कुणि तरुणी ॥१॥
तेहांपासुन हृदयी अमुच्या कडक डफावर वग झडतो
सहज बोलल्या बोला संगे रसवंतीवर नग चढतो
पडती टाळ्या झडती मुजरे फुले उधळिती किति युवती
कुणी घालुनी आडुन डोळे मिठीत दिठिच्या आवळिती
मख्ख आम्ही तरि सदा सदाशिव असून नसतो इथे जनी
लावण्याचे भोग भोगितो तिच्यासवे चवदा भुवनी
कामरूपिणी अशी लाभता वैभव इथले कोण गणी ?
आम्ही देखिली अतुल देखणी शेषफणेवर कुणि तरुणी ॥ २ ॥

— वा. भ. बोरकर



बसायच, मुलाला समजावायचं, पुन्हा नवी मुलगी पाहायची.

दिवसेंदिवस दिदींना मांची अधिकाधिक आठवण येऊ लागली. त्यांची धीरगंभीर आकृती सारखी समोर दिसू लागली. त्यांच्या प्रेमळ स्पर्शाच्या स्मरणाने हातांच्या शिरा थरथरू लागल्या. त्यांचं त्या दिवशीचं बोलणं पाहाणं वारंवार विद्ध करू लागलं. त्यांच्यामुळेच दिदी छोटीचं कृत्य विसरू लागल्या. छोटीला विसरल्या व घरच्या माणसांनाही बाजूला सारून मांची मानसपूजा करीत राहिल्या. सारखं वाटे, मां दिसाव्यात, मां भेटाव्यात ! आजवरच्या आपल्या कडवेपणाच्या वागण्यावर मृदु नि विशाल मनाने कडी करणाऱ्या त्या स्त्रीला भेटावं.

अन् मग एक दिवस देवदर्शनाला बाहेर पडलेल्या दिदी देवळाची वाट टाळून मां राहात असलेल्या कॉलनीकडे निघाल्या. कुठ रस्त्यात, भाजी बाजारात, बिऱ्हाडाच्या खिडकीत मांची मूर्ती दिसली तर दुरून पाहावं अशा ओढीने भरभर चालू लागल्या. त्यांचे रुपेरी केस चमकू लागले, पांढुरका चेहेरा जरा उजळला व इतक्या दिवसांचा यांत्रिकपणा झडून गेला. उजाड अन् उदास आयुष्यात मांची आठवण त्यांच्या काळजाला उजाळा आणी, आणि आता तर डोळ्यांनाच त्यांची मूर्ती दिसणार होती.

पण कॉलनीत पाय पडला अन् दिदींचं मन परत काळवंडू लागलं. मांना पाहून आपलं मन निवेल, देवदर्शनाचं पुण्य लाभेल. पण आपण दृष्टीस पडताच मांना काय वाटेल ? त्यांना नुकतीच घडलेली घटना तीव्रतेने बोचेल. जखमेवरची खपली निघाल्यासारखं होईल. अशुभ भेटल्यासारखं भासेल. . दिदी एकदम कावऱ्याबावऱ्या झाल्या. तशाच माघारी वळाल्या. स्वतःला सावरत घराकडे निघाल्या.

तेवढ्यात समोरून मांच येताना दिसल्या.

"इकडे कुठे ? आमच्याकडे गेला होतात ? चला ना—" मांनी त्यांना थांबवलं व आपलेपणाने विचारलं.

दिदी दचकल्या. मां भेटल्या म्हणून दचकल्या, त्यांनी बोलावलं म्हणून दचकल्या. त्यांच्या प्रेमळ स्वराने भारावून गेल्या.

"नको—कशाला ? उशीर झालाय.

"अंमळ बसा नि जा. मी पोचवीन हवी तर ! अहो, मला तुमची भेट हवी होतीच.

मंतरल्यासारख्या मांच्या मागोमाग दिदी चालू लागल्या. ह्या बाईने आपल्याला अशुभ मानलं नाही, उलट अगत्याने घरी बोलावलं, याचं त्यांना खोलसं समाधान वाटलं. आदराच्या भावनेत आता स्नेहाचे धागे विणले जाऊ लागले. मग मान खाली न घालता मांच्या बिऱ्हाडी दिदी आल्या. तो पाच खोल्यांचा प्रशस्त, सुसज्ज ब्लॉक बघून नकळत म्हणाल्या,

"छोटी किती मूर्ख आहे, केवढं सुख तिने दवडलंन्. "

"छोटी कदाचित् मूर्ख नाही. तिला हवं ते सुख मिळवलंन तिने—"

मां कोरडं हसून म्हणाल्या व पंखा सुरू करून दिदींच्या शेजारी कोचावर बसल्या. दिदींनी एकदम ओठ घट्ट मिटून घेतले. छोटीची तरफदारी त्यांना अगदी मानवत नव्हती. तिचं नातंच त्यांनी तोडून टाकायचं ठरवलं होतं. आता आपण अचानक तिच्याबद्दल बोललो हेच चुकलं असं त्यांना वाटलं.

"रागावलात ?—" मांनी मान वाकडी करून विचारलं व दिदींच्या हाताला स्पर्श केला. "मी तिची कड घेतेय, कारण तिनं मला पत्र लिहिलं आहे—"

"तुम्हांला ?" दिदींनी दचकून मांचा हात धरला. मां परत कोरडया हसल्या व उठत म्हणाल्या,

"दाखवते—"

"नको. मला तिचं अक्षरही पाहाणं नको. .तुम्हांला तिने. "

"तिने पत्र लिहून माझी क्षमा मागितली आहे. आधीच पळून जाऊन लग्न करायचं धैर्य झालं नाही म्हणून खंत दाखवली आहे. तुमची तर खूप आठवण काढली आहे





अनुक्रमणिका

मां बोलायचं थांबल्या. दूर बघणाऱ्या दिदींना निरखू लागल्या. लेकाचं लग्न ठरविण्याच्या वेळी ह्या मायलेकी भेटल्या तेव्हांच त्या मांना फार आवडल्या. छोटी मुलाला एकदम पसंत पडली ! सुनही मनपसंत असावी व विहीणही हवीहवीशी करावी ह्याचा मांना हर्ष झाला. दिदींच्या कर्तृत्वाच्या व करारीपणाच्या अनेक गोष्टी त्यांच्या कानावर आल्या होत्या. अशा घराशी सोयरीक. पण मग उत्पात घडली नि त्यांचं मन मोडून गेलं. त्या हवालदील झाल्या. तशातही स्वतःला सावरण्याआधी त्यांना हीनदीन दिदींची याद आली. यांनी धीर द्यावा असं तेव्हां वाटलं; अन् मग त्यांचा लेकीशी समेट करून द्यावा असं आता सुचलं.

दुसरीकडे पहात दिदी म्हणाल्या,

"मला वेडी म्हणा, वाईट म्हणा. पण लेकीबद्दल मला जराही माया उरली नाही. ज्या क्षणी तिने घराचा उंबरा ओलांडला त्याच क्षणी मला ती मेली. तिची आठवणही मी काळजातून काढून टाकली आहे. मी फार पिळाची आहे, मां ! एकदा नाव टाकलं की...माझं एकच दुखणं उरलंय ते तुमचा अपमान केला त्याचं. त्यासाठी...."

"शूः...तो विषय काढायचा नाही असं वचन घेतलंय ना मी..."

"तो तुमचा मोठेपणा. पण माझं मन खात राहातं. मला भरपाई करायला हवी ! माझ्या मुलीमुळे हे सारं घडलं. तिच्या पायी तुमच्या मुलाला. माझी मुलगी मला मेली, पण तुमच्या मुलाला मी जास्त जवळ करीन. तो जावई होणार होता. आता त्याला माझा मुलगा मानीन..."

"काय हे–" मां चकीत होऊन म्हणाल्या.

"हो...सख्या मुलाहून अधिक ! मां, त्याची मान उंच राहील, नांव उजळेल यासाठी..."

दिदी एकदम थबकल्या. परक्या ठिकाणी आपण अचानक काही वेगळं बडबडलो हे उमगून गांगरल्या. पण त्यांना एकदम


असत्यमेव जयते

शांत, निवल्यासारखं झालं ! छोटीच्या कृत्यापासून त्यांचं काळीज पोखरलं जात होतं–ते अचानक संपलं.

त्यांनी पाहिलं तो मां न बोलता प्रेमळ मुद्रेने दिदींकडेच बघत होत्या. तेवत्या समईसारख्या, विवेकाने वागणाऱ्या, अथांग समजुतीच्या, तृप्ततेत जगणाऱ्या मां ! दिदी परत भारावून गेल्या. मांच्या मुद्रेचा प्रकाश पडल्यासारख्या मंदशा हसू लागल्या.

त्या क्षणापासून दिदींचं मन निवल्यासारखं झालं. करारी चेहेऱ्यावर सूक्ष्म प्रसन्नता दिसू लागली. उंच, शेलाटी आकृती परत उभारी धरू लागली. केसां-कातडीची रुपेरी झाक निराळ्याच झळाळीने चमकू लागली. ती तडफेची, कर्तृत्वाची बाई घट्ट ओठ दाबून घरभर वावरू लागली. आपल्या मुला माणसातून त्यांचं मन अलग झालं. मांच्या व मांच्या मुलाच्या विचारांनी हेलावू लागलं.

दिदींच्यात झालेल्या बदलाने मुलं नि सुना बुचकळ्यात पडल्या होत्या. छोटीचं लग्न आटोपलं की यात्रेला जायचं म्हणणाऱ्या दिदी परत घरचं बघू लागल्या, देवदर्शनाला जाऊ लागल्या, चारचौघांशी पूर्वीच्या अगत्याने वागू लागल्या, हे बरंच झालं. पण–पण मध्येच त्या मांचं नाव घेत.

त्यांच्या घरी जात. लग्नाच्या सामानांची यादी चाळत. पंचांगात मुहूर्त बघत

"आई, आता कुणाचं लग्न काढलंस ?–

छोटी.

"चूप !–" छोटीचं नाव घरात घुमताच दिदी एकदम कर्कश म्हणाल्या, "पुन्हा बजावते. या घरात तिचं नावसुद्धा निघता कामा नये. "

सारे शरमून गप्प झाले. छोटीची आठवण काढली की आईचं पित्त भडकतं हे सगळ्यांना ठाऊक होतं. तिचं नावसुद्धा घ्यायचं नाही अशी दिदींची सक्त ताकीद होती. तिचे कपडे, पुस्तकं, फोटो–सारं घराबाहेर गेलं होतं. .तरीही कधी चुकून कुणी तिच्याबद्दल बोले. निदान नातवंडं नाव घेत. कधी तिची मैत्रिण दिसे, कधी.

छोटीबद्दलचा द्वेष दिदींच्या कडव्या वर्तनाशी सुसंगतच होता. म्हणूनच छोटीने आईला क्षमायाचनेचं पत्र लिहीलं ते मुलांनी दिदीला दाखवलं नाही. दोन एक महिन्यांनी धाकट्या सुनेला छोटी भेटली व पश्चात्तापाने ढसढसा रडली. छोटीच्या त्या हतभाग्याने भाऊ भावजया हळहळल्या. पण दिदींच्या दराऱ्यामुळे कुणाला काहीच हालचाल करता येईना. दिदींना दुखावणं शक्यच नव्हतं. अन् म्हणून दिदींनी मांशी ओळख वाढवणं विचित्र वाटूनही घरचे सारे गप्प होते.

दिदींना कुणाची पर्वा नव्हती. जितकं जीव एकवटून त्यांनी छोटीला वाढवली, तिच्या विवाहाची सिद्धता केली तितक्याच एकचित्ताने त्या मांच्या मुलाचं भलं बघू लागल्या. त्याच्यासाठी स्थळं बघू लागल्या. त्याने परत लग्नाला तयार व्हावं म्हणून मांना साकडं घालू लागल्या.

वधूवर मंडळातून, शेजारणीकडून, पूजेच्या भटजींकडून त्या मुलींची यादी मिळवीत, माहिती काढीत, योग्य स्थळांचे फोटो, पत्रिका मागवीत. एखादी पत्रिका जुळेलसं दिसलं, फोटो सुंदर वाटला की दिदींचे डोळे चमकत. मांच्या मुलाचं एकदा

अनुक्रमणिका

लग्न झाल. . . एकदा त्या अवेळीच मांच्या ब्लॉकमध्ये हजर झाल्या.

"मां, तुम्ही आता मनावर घ्यायला हवं ! मुली पाहायला हव्या"–– एका मोठ्या घराण्याची ती कर्तबगार मालकीण मांपुढे लीन होऊन म्हणाली.

मांचं मोठं शरीर नि गोल चेहेरा अधिकच भव्य वाटला. त्या संथपणे म्हणाल्या, "मुलगी एकदाच पाहिली–ठरवली होती, दिदी. "

दिदींचं हृदय पिचून गेलं. आपल्या घरी मोठ्या मनाने येऊन अभय देणारी, आधार देणारी ही विशाल हृदयाची बाई स्वतःमात्र एकाकी जळत आहे या जाणीवेने त्यांचं डोळे डबडबले. मांची समजूत घालणं, मांना परत. त्या अवसान आणून म्हणाल्या,

"ते सारं विसरायचं ठरवलंय आपण. "

मां मृदु हसल्या. दिदींची वेदना त्यांना उमगली. तीव्रतेने वाटलं, छोटीशिवाय दुसरी कुठलीही मुलगी आपल्याला नि लेकालाही पसंत पडायची नाही हे जरी खरं असलं तरी दिदींसाठी, दिदींच्या पसंतीचं कोणतंही स्थळ मान्य करावं.

मांच्या संथ हसण्यात संमती गृहीत धरून दिदी समाधानाने परतल्या. मांना सून कशी हवी ते त्यांना उमगलं. आणलेली स्थळं त्या तोलाची नव्हती. छोटीइतक्या त्या मुली लावण्यपूर्ण, घरंदाज, श्रीमंतीतल्या नव्हत्या. छोटीने दृष्ट लागण्यासारखे सुभाग्य लाथाडलं याचं त्यांना दुःख दाटलं. असा जावई, अशी विहीण आपल्याला दुरावली याचं दुःख दाटलं. हे सारं दैन्य विसरून मांसाठी मुलगी शोधायचं आपल्या नशिबी आलं याचं दुःख दाटलं. दुःखा-उमेदीच्या अशा घोळात त्या वाट चाचपडू लागल्या.

कितीतरी मुली पाहिल्या, पण मनासारखी कुणी आढळेना. मांच्या मनासारखी ! त्यांचं मन गेलेल्या छोटीसारखी. छोटीशीच तुलना होई. छोटीची अशी आठवण यावी याची दिदींना चीड येई. छोटीबद्दल संतापान, सूडाने त्या वेड्यापिशा होत. छोटीतच त्या मायलेकरानी काय एवढं पाहिलं, कळेना त्यांना ! वास्तविक आपल्यापेक्षा त्या दोघांनी छोटीचा द्वेष करायला हवा. आपला पीळ, तत्वनिष्ठा खरी की मांची क्षमाशीलता मोठी ? . दिदींना सगळं अतर्क्य, अथांग वाटू लागलं.

तशाच संभ्रमावस्थेत दिदी एकदा मांच्या विन्हाडी गेल्या. मोठ्या आसनावर बसून स्थूल देहाच्या व गोल चेहेऱ्याच्या मां संथपणे ज्ञानेश्वरी वाचीत होत्या. दिदी मुकाट्याने एका बाजूला बसून ऐकू लागल्या. त्यांचा पांढुरका चेहेरा काकुळतीला आला हातावरच्या शिरा थरथरू लागल्या. वाटलं, ह्या स्त्रीची मनःशांती आपल्याला कधीच लाभणार नाही. लाभणं नकोच ! आपलं मन वेगळं, मूल्यंच निराळी. आपल्याला क्षमा करून ह्या बाईने उपकाराचं ओझं दिलं आहे ते, एकदा फेडलं की.








मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



पाऊस वर पडतो आहे रात्र सख्या अंधारी
भिजते तुजसाठी केंव्हाची उभी मी रे द्वारी
कोठून तुसी केला स्नेहसंग सख्या पहिल्याने
होसी नित्य वेडा न्याहाळून मला पाहिल्याने

—शाहीर होनाजी






# आटोपशीर आणि सुखद प्रवासी वाहतुकीसाठी खास बनविलेली गाडी



# डॉज / फार्गो
## ४५-पीए ६

कर्मचारी वर्ग, विमान-प्रवासी, हौशी प्रवासी, अथवा शाळेतील विद्यार्थी इत्यादि कोणीही तुमचे प्रवासी असोत त्यांना आरामात व थाटात प्रवास करण्याचा आनंद ही छोटी बस देते ☐ याशिवाय रुग्णवाहिका, फिरता दवाखाना, एक्स-रे व्हॅन, प्रसिद्धी व प्रचार वाहन, डिलिव्हरी व्हॅन व अन्य कामासाठीही उपयुक्त.

**PAL** दि प्रीमियर ऑटोमोबाइल्स लिमिटेड,
कुर्ला, मुंबई-७०.

SISTA'S-PAL-568 MR

ज्ञानेश्वरीचं वाचन आवरून मांनी नेहमीच्या मृदुपणाने हसत दिदींना म्हटलं,

"किती दिवसांनी आलात. मी वाट पहात होते. मी येणार होते..."

मांच्या त्या वघण्या बोलण्याने दिदींच्या काळजावरची काळोखी जरा दूर झाली. आपला रुपेरी आंबाडा झटकत त्या म्हणाल्या,

"खरंच ? – खरंच यायचंत. आलाच नाहीत् या सात आठ महिन्यात अपण."

"चिरंजीव विलायतेला जाणार म्हणतात. दोन तीन महिन्यात–"

दिदींचे पांढुरके, लांब हात अस्वस्थपणे हालले. वरकरणी हसत त्या म्हणाल्या,

"छान झालं. त्याची खटपट फळाला आली. पण लग्न करून गेला तर वरं, नाही का ?–सून काही दिवस तरी तुमच्याजवळ राहील–"

"ते तुमच्या हाती आहे—" मां कधी नाही ते मोठ्यांदा हसल्या व उठल्या.

दिदींनाही एकदम वळ आलं. नेहमीच्या अभिजात मोठेपणाने त्या म्हणाल्या,

"होय. मी शब्द दिलाय ! एक मुलगीही आणलीय. एकदम पसंत पडेल अशी. छोटीपेक्षाही चांगली.

छोटीच्या नावाची कडू गोळी घशाखाली घातली व परत त्या हसल्या. पण मां एकदम गंभीर झाल्या. संथपणे म्हणाल्या,

"छोटीचं कळलं का ?–मागेच सांगणार होते. ती नवऱ्यापासून वेगळी झाली म्हणे. पुरी फसली विचारी..."

दिदींच्या अंगावरून एकदम गूढतेचे लोट गेले. वाटलं, दुःखाचे कढ आले; पण आजवरचा त्वेषच उफाळून आला. विचित्र हसत त्या म्हणाल्या,

"योग्य धडा मिळाला...अन् याच वेळेला तुमच्या लेकाचं लग्न जमण्याचा योग यतो आहे..."

त्याच नादात मांचा निरोप घेऊन दिदी निघाल्या. ठरवलेल्या मुलीची पत्रिका, फोटो लगेच पाठवून द्यायचं कबूल करून लगोलग मुलगी पाहण्याचा समारंभ, मग साखरपुडा, देण्याघेण्याची बोलणी, मुहूर्त. त्यांचा न झालेला जावई नि आता मानलेला लेक अखेर नवरदेव म्हणून मिरवणार !–मांचा अपमानाचा घाव भरून निघणार. दिदींच्या हातून !

आपल्या लेकीच्या आयुष्याची वाताहत झाल्यावद्दलची वार्ता हट्टाने विसरून पहात दिदी मांच्या मुलाच्या लग्नाचे बेत करू लागल्या. उपकाराची फेड होणार ह्या जाणीवेने सुखावल्या. त्यांचं पीळ असलेलं हृदय नि पांढुरकं पडलेलं शरीर परत लग्नाचा पसारा मांडायला झपूर्झा घालू लागलं.

* *

दिवस उलटले आणि दिदींनी साखरपुड्याच्या समारंभाची सिद्धता केली. अंगावर घेतलेली अखेरची अवघड जबाबदारी आता पार पडणार होती. दिराशी इस्टेटीसाठी कोर्टकचेरी करताना, मुलांना शिक्षण देऊन मोठं करताना, सुना निवडताना, खुद्द छोटीचं लग्न ठरवताना देखील त्यांनी एवढा आटापिटा केला नसेल. मांच्या मुलाचं लग्न हे आयुष्यातलं सगळ्यात अवघड नि तेवढंच आवश्यक कृत्य होतं. कलंक धुवून टाकणारं, पीळ शाबूत ठेवणारं.

पसंत केलेल्या मुलीला आई वडीलं नव्हते नि समारंभ दिदींच्या घरी आयोजिला होता. .छोटीला तरी वडील कुठे होते ? आणि मुलीची आई आता दिदीच होणार होत्या. दिदींना अशा आडवळणाने अखेर जावई मिळणार होता. पूर्वीचाच; मध्यंतरी मुलगा मानलेला; परत आता... अशा जगावेगळ्या भाग्याचा दिदींना स्वतःलाच हेवा वाटला. त्यांची हौस अशी पुरविली जाणार होती. त्या मुलीची आई म्हणून मिरविणार होत्या. मुलीला छोटीचे दागिने घालणार होत्या. मांना अखेर विहीण म्हणून म्हणणार होत्या. जिद्दीने अखेर एक लोकविलक्षण...

दिदींची ही उठाठेव घरच्या कुणालाच पसंत नव्हती. पण कुणाला दिदींना अडवायचं धैर्य नव्हतं. बेअब्रू करणाऱ्या लेकीचं नाव टाकावं हे एक समजण्यासारखं होतं. पण त्या आघातावर फुंकर घालणाऱ्या एका बाईचं एवढं स्तोम माजवलं जावं, ताठ मानेच्या धारदार दिदींनी मांसारख्या स्त्रीचं मिंधं व्हावं, एवढ्याशा चांगुलपणाची फेड करण्यापायी इतकं अवसान आणावं हे लेकांना नि सुनांना खुळेपणाचं वाटत होतं. त्या घराशी आता काय कर्तव्य ?–ती बाई कुठे उपकार मानत होती ? तो मुलगा.

दिदींना घरची नाराजी दिसत होती. पण त्यांचा नाईलाज होता. त्या जिथे जाणार होत्या, तिथवर इतरांची नजरही पोचू शकणार नाही हे त्यांना माहीत नव्हतं. एकुलत्या एक मुलाचं लग्न ठरल्यावर ऐन वेळी वधूने पळून जाण्यात काय बेअब्रू होऊ शकते, तरुण मनाचा केवढा मनोभंग होईल व त्याच्या आईला केवढी मानहानी वाटेल हे एक दिदीच समजू शकत होत्या. ते दुःख दूर सारून त्या स्त्रीने...बस, दिदींना तिथे पोचायचं होतं ! मांइतकं विशाल, खोल काळीज नसेल, पण त्या तोडीची, जिद्दीची, पिळाची वागणूक त्यांना आचरणात आणायची होती.

दिदींचे रुपेरी केस अधिक चमकू लागले व शलाटी, वाळलेली यष्टी गंभीर दिसू लागली. मां रस्त्यावर दिसतात का ते पाहण्यासाठी त्या दिंडी दरवाजापर्यंत दोनचारदा जाऊन आल्या. थोरल्या मुलाने बैठकीची तयारी केली आहे की नाही ते पुन्हा पाहिलं. थोरल्या सुनेने चहापानाची व्यवस्था केली आहे की नाही तिकडे लक्ष दिलं. मग धाकट्या मुलाला व सुनेला मांना आणायला पाठवलं.

आणि मग काहीच करायचं उरलं नाही म्हणून त्या रिकाम्या मनाने देवघराजवळ जाऊन बसल्या.

मांना बोलवायला गेलेला धाकटा मुलगा धावतच घरी परतला व म्हणाला,

"आई–"

"काय रे ? .मां येताहेत ना ?






'होयं! मागाहून येताहेत. मला मुद्दाम पुढे धाडलं. निरोप देऊन.

मां येत आहेत अन् निरोपही धाडला आहे! . दिदींना समजेना. भुईला रेटा देऊन उठणारं त्यांचं शरीर परत शिसवी खांबाला टेकलं. थरथरणाऱ्या शिरांनी भरलेला हात नाचवत त्यांनी भुवया उंचावूनच मुलाकडे बघितलं.

मुलाने आंवढा गिळला. आईजवळ तो हलकेच बसला. हलकेच म्हणाला, " . तुला सांगायचा धीर झाला नव्हता आम्हाला. आई, छोटी काल मांना भेटली! तिला घटस्फोट घ्यायचा आहे. मां तिला मदत करणार आहेत. अन्, अन् मां तिला मग सूनही करून घेणार आहेत. "आत्ताच मां तिला भेटून शब्द देऊन आल्या. आता त्या आपल्याकडे.

उकळत्या तेलाच्या थेंबासारखा एकेक शब्द दिदींच्या मस्तकात पडला. त्यांचं काळीज पिळवटून गेलं. काय घडलं ह्याचा अंदाज त्यांना तात्काळ आला अन् त्या हल्लक पडल्या. छोटीने दावा साधला. कीं समेट साधला? मां कशाला आपल्याकडे येत आहेत? पूर्वीसारखा मोठेपणा दाखवून समजूत घालायला? आपण त्यांच्या भेटीने परत भारावून जायचं? त्यांचं मानायचं? म्हणजे छोटीचा उथळपणा नि मांचा संभावितपणा खरा नि आपला पीळ, आपण मानलेली मल्यं फुकट?

दिदींना सारं घर फिरत आहेसं वाटलं. हाताच्या शिरा ताडताड उडू लागल्या. आंवाडा ओघळून रुपेरी बटा उधळल्या. पांढुरकं, शेलाटं शरीर थरथरलं. ओठ घट्ट चावत त्यांनी ठरवलं की मांचं मानायचं नाही. त्यांनी छोटीला पत्करली तरी आपण तिला जवळ करायची नाही. मांनाही नाही! मां आता आपण ठरवीत असलेलं लग्न मोडायला निघाल्या... मांनी हा सूडच उगवला! तेव्हा आपल्याला धीर देऊन व आता आपल्या लेकीला आधार देऊन मां जगावेगळा थोरपणा मिरवतील. पण आपल्या लेखी...

तेवढ्यात धाकटी सून पुटपुटली, "मां आल्या..."

दिदींचं शरीर एकदम ताठर झालं. त्यांना सगळं परकं, पारदर्शक झालं. अफाट, अथांग भासू लागलं. मांची मोठाड, मृदु आकृती दिसण्याआधी त्यांचं यष्टीसारखं पीळ पडलेलं शरीर देवघराच्या शिसनी खांबाला टेकलं. सुन्न मनाने व संताड डोळ्यांनी दिदी नुसत्या बसून राहिल्या.

●●●



## 'तोडी'ची लावणी

थंडिची भरे हुडहुडी, स्मरे घडि घडी, व्याकळुनि सोडी
राया, तुझ्या मिठीची गोडी
गंगथडिचा सुटला वारा गहू-हरभरा शिवारी पिकला
दंवाचा मोतिचुरा लुटला
आंगणी सायली फुले गंध घमघमतो
अंधार रात्रीचा तलम पोत थरथरतो
जरतार रात्रिची घडी, करुन तातडी, कोण ग मोडी
राया, तुझ्या मिठीची गोडी
झोपल्या वृक्ष वल्लरी, जागते वरी शशिविणा रैना
सुखामधि निजल्या राघू-मैना
अर्धीच झोप डोळ्यात बावऱ्या खुपते
भलतेच स्वप्न अन् त्यात जिवाला डसते
मी घाबरूनी एकांति कापऱ्या हाति आपुलीच चादर ओढी
राया, तुझ्या मिठीची गोडी
ऐकिलं युद्ध जिंकुनी 'फीत' मिळवुनी तुम्ही परतला
राघु मग कोणीकडे झुकला
तळमळत रात्रभर उगी कूस बदलिते
हे पान केतकी श्वासाने चुरगळते
किति कवळुनि उरि उशी धरु, जीवनास पडते थोडी
राया, तुझ्या मिठीची गोडी
पाडवा सख्या वरसाचा सुना जायचा काय हो असा
आण कि हो चंद्राची राजसा
फुंकुनी उशाचा दिवा जरी विझविला
अधिकची मनामधि जाळ सख्या भडकला
चालली कलुनिया रात विव्हळुनी गात चांदणे 'तोडी'
राया, तुझ्या मिठीची गोडी

—कान्त



भर दुपारच्या वेळी म्हातारी गौरा आपली म्हसरं घेऊन गावाकडे येत होती. गावच्या वेशीपासून मावळतीला पसरलेला काळाभोर शिवार नजरेत भरत होता. वाळल्या गवताची काडी हुंगत जनावरे उतरणीवरून चालत होती. मागून म्हातारी काठीचा आधार घेत उतरत होती. टेकडी उतरून म्हातारी गावच्या रस्त्यावर आली. टेकडीच्या वळणावरची घरे दिसू लागली आणि म्हातारी चालायची थांबली. तिची नजर नदी काठावरच्या शिवारावर स्थिरावली. तेथे तीन-चार ट्रक उभे होते. पहिल्या पावसात आळंबी उगवावी तशी एक मोठी छत्री त्या शिवारात उभी होती. म्हातारी आपल्या नादातच उभी होती. मागून आलेल्या एका पोराने तिला साद घातली.

"आज्ये ! काय बगतीयास ? ढोरं गेली न्हवं ?"

त्या पोराकडे न पहाता म्हातारी म्हणाली,

"लेका, शिवारात काय चाललंय ?"

"म्हातारे, सर्कस आलिया न्हवं !"

"सर्कस !" म्हातारी उद्गारली.



र ण जि त दे सा ई

" येवढं भ्यायला काय झालं ? एकानं हात सोडला तर दुसरा येऊन धरतोच की ! न्हाईच जमलं तर खालच्या जाळ्यात पडायचं "— किसननं गौराला धीर दिला ....



"न्हय ! लई मोटी हाय." ते पोर सांगत होतं. "घोडी हाईत. हत्ती हाय. माकडं, कुत्री, माणसंबी हाईत. म्या सारं बघून आलो न्हवं का ?"

"खरं म्हंतोस ?"

"न्हय म्हातारे ! लई मोटी सर्कस हाय बघ. त्यांचचं सगळं हाय. मशिनवर चालणारं इलेक्ट्रीचं दिवंबी हाईत. अगदी शहरावानी सर्कस हाय."

म्हातारी सारं ऐकत होती. समोरचा सर्कशीचा उभारणारा तंबू पहात होती.



अनुक्रमणिका

मागचे पोर केव्हा पुढे गेले ते तिला कळलेही नाही. धऱ्याच वेळाने ती भानावर आली. आणि काठी टेकत गावाकडे चालू लागली.

म्हातारी घरात गेली तेव्हा तिचा मुलगा रामू शेतावरून आला होता. म्हातारी आतल्या सोप्यात जाऊन बसली. बसल्या जागला घाम टिपू लागली. रामूला राहवले नाही. त्याने विचारलं,

"कुठं थांबली व्हतीस ?"

"वेशीत !"

"जनावरं म्होरं आली. तुझा पत्त्या न्हाई. लई घाबरलो. म्हटलं ठेच लागून पडली बिडलीस काय कोण जाणं."

म्हातारी हसून म्हणाली, "न्हाई लेका. दिवसा उजजे पडायला काय झालंय ?"

"चल जेऊया ! लई भूक लागलीया बघ."

म्हातारी उठली. रामू आत जाण्यासाठी वळला. म्हातारीने हाक मारली,

"रामू !"

"काय ?"

म्हातारी धीर करून बोलली, "गावात सर्कस आलिया. बघावं वाटतीया."

"तुला ?" रामू म्हातारीकडे पहातच राहिला.

"व्हय !" त्याचीं नजर टाळीत म्हातारी म्हणाली.

"बघू सांजचं !" म्हणत आपलं हासू लपवत रामू आत गेला.

म्हातारीची सून सीता वाढत होती. म्हातारीच्या ताटात सहा वर्षाचा नातू भैरू जेवत होता. नातू बोलत होता पण म्हातारी उत्तर देत नव्हती. नीट जेवत नव्हती. कसंबसं जेवण आटोपून म्हातारी परत कट्टयावर येऊन बसली. रामू शेताकडे गेला. सून घरात रमली. म्हातारी सोप्यात बसून पेंगत होती.

'ढम् ! ढम् ! ढम् !'

म्हातारीने दचकून डोळे उघडले. रस्त्यावरून काहीतरी वाजत जात होते. भैरू वाऱ्यासारखा पळत गेला. काही वेळाने परत आला तेव्हा त्याच्या हातात तांबडा कागद होता. म्हातारीजवळ बसत तो म्हणाला,

"आज्ये ! गावात सर्कस आलिया बघ. ह्यो बघ जारात."

"बघू !" म्हणत म्हातारीने आधाशासारखा तो कागद घेतला. दरवाजातून आलेल्या उजेडाकडे सरकून ती जाहिरात पाहू लागली. म्हातारी त्या जाहिरातीवरचं चित्र पाहण्यात दंग झाली होती.

"आज्ये ! सर्कस म्हंजे ग काय ?"

"हं !"

"लई मोटी असतीया ?"

"हं !"

"आपून जाऊया ?"

"हं !"

"वाघ असत्यात ?"

"हं !"

भरू कंटाळला. तो म्हणाला,

"दे माझी जारात."

जाहिरात छातीशी घत म्हातारीने भैरूकडे पाहिलं. क्षणात ती हसली. त्याच्या पाठीवरून हात फिरवत ती म्हणाली,

"सोन्या माझा ! तू दुसरी घेऊन ये. ही राहू दे मला."

"घे तर ! आत्ता दुसरी आंतो बघ."

भैरू परत बाहेर वाऱ्यासारखा धावला. घर परत शांत झालं. म्हातारी जाहिरातीवरचं चित्र पाहू लागली. त्यावर वाघाचं तोंड होतं. तंबू होता. विदुषक होता. झोपाळ्यावरची माणसं होती. म्हातारी फिरून फिरून ते चित्र पहात होती.

भैरू धावत आला. त्याच्या हातात हिरवी जाहिरात होती.

"बघ आज्ये ! हिरवी."

"चांगली हाय."

"वावडी करनार मी."

"कर लेका."

"तुला येती ?"

"आईकडनं घ करून."

भैरू घरात पळाला. म्हातारीने परत जाहिरात बघितली आणि जाहिरातीची घडी करून चोळीत ठेऊन दिली.

सांज झाली. किनीट पडलं तरी रामूचा पत्ता नव्हता. म्हातारी वाढत्या अंधाराबरोबर बेचैन होत होती. सुनेनं चिमणी आणून ठेवली.

"अजून कसा ग आला न्हाई ?"

पण सुनेनं काही उत्तर दिलं नाही. ती तशीच निघून गेली. भैरू यताच म्हातारीने त्याला थांबविलं.

"पोरा, एक काम करशील ?"

"सांग की."

"तुझा बा अजून आला न्हाई. येशीत बसला असल बघ."

भैरू रामूला हुडकायला बाहेर गेला. पण दारातच त्याची रामूची गाठ पडली. रामू आलेला पाहून म्हातारीला बरं वाटलं.

"रातीचं पोराला कुठं पाठवीत व्हतीस?" रामूनं विचारलं.

"तुलाच बघायला पाठवलं."

"आता काय न्हान हाय व्हय मी ?"

"येळ वरं केलास ?"

"घरला आलू नशिब समज. आज मारामारीच हुईती. वर्साला बांध सरकवत्यात. मानसं मधी पडली नसती तर आज खूनच पडीता."

"मी सर्कशीला जाऊं न्हवं ?" म्हातारीनं विचारलं.

"आँ ! रामूनं टाळा वासला. त्याचा संताप एकदम वाढला.

"इकडं जीव जात व्हता आणि तुला सर्कस सुचतीया !"

म्हातारीच्या चेहऱ्यावरच्या सुरकुत्या ताठरल्या. तिच्या सदैव पाणावलेल्या डोळ्यातलं पाणी आटलं. आवाज रुक्ष बनला.

"रामू ! लई बोलूं नगस. आजवर म्या कधी काय मागितलं काय ? म्या सर्कस बघनार."

"बघ तर !" म्हणत रामूने कनवटीचा रुपया काढला. आणि म्हातारीच्या समोर फेकला. चिमणीच्या उजेडात रुपया बदकन् पडला. म्हातारीने काही न बोलता तो रुपया उचलला. भैरू ते सारं पहात होता.



अनुक्रमणिका

म्हातारी उठली. तिने आपली पेटी उघडली. ठेवणीचं सावलं काढून ती नेसली. भैरू सर्कशीला येणार म्हणून तिच्या भोवती फेर धरीत होता. पण म्हातारी काही बोलत नव्हती. हे पाहून भैरू रडू लागला. तरीही म्हातारीचं लक्ष त्याच्याकडे गेलं नाही. ती आपलीच आवराआवर करीत होती. भैरूचं रडणं वाढलं. सीता संतापाने बाहेर आली. आज्जीच्या पायाला चिकटलेल्या पोराला ओढत ती म्हणाली,

"लहान पोरांनी सर्कस बघायची नसती. म्हाताऱ्यानीच बघायची."

सीता रडणाऱ्या पोराला ओढत घेऊन गेली. पण त्याचाही काही परिणाम म्हातारीवर झाला नाही. ठेवणीतलं लुगडं नेसल्याचा आनंद तसाच तिच्या चेहऱ्यावर होता. म्हातारीची सारी तयारी झाली. तिने पेटी बंद केली. आणि ती सर्कशीला जायला निघाली. आतून आलेल्या रामूची नजर आईवर गेली. तो तिच्याकडे बघतच राहिला. ठेवणीतल्या जरीकाठी लुगड्यात आईचं रूप निराळंच भासत होतं. गोऱ्या चेहऱ्यावरच्या सुरकुत्या लोपल्याचा भास होत होता. साऱ्या चेहऱ्यावर एक निराळाच उजाळा आला होता. म्हातारीने एकवार मुलाकडे नजर टाकली. ती म्हणाली,

"येती रं."

"येवढ्यात कुठं निघालीस ?" रामू भानावर येत म्हणाला. "सर्कशीला अजून मायंदाळ टाईम हाय. जेवान करून तरी जाशील का न्हाई ?"

जेवण ! खरंच ते विसरूनच गेलं की !

म्हातारी हसली. लाजली. म्हणाली,

"इसरलेच बघ. चल !"

म्हातारी जेवत होती. पण जेवणाकडे तिचे ध्यान नव्हते. म्हातारी सर्कशीला जायला निघाली तेव्हा रामू पोहोचवायला येतो म्हणाला. पण म्हातारीनं सांगितलं,

"रस्त्यावर दिवं हाईत. जाईन म्या."

म्हातारी अलगद चालत गावच्या वेशीत आली. तिने हातात काठीही घेतली नव्हती. सर्कशीच्या बाजूने उजेड फाकला होता. गाणं ऐकू येत होतं. त्या वाटेनं माणसं जात होती. म्हातारी त्यात मिसळली.

मोठा तंबू उभा केला होता. जिकडे तिकडे विजेच्या दिव्यांचा प्रकाश फाकला होता. खूप गर्दी जमली होती. कोणीतरी म्हातारीला विचारलं,

"म्हातारे ! सर्कस बघनार ?"

"व्हय लेका !" म्हातारीने पाहिलं. विचारणारा गावचाच होता.

"पैसं आनलंस ?"

म्हातारीने रुपया काढला. त्याच्या हातावर ठेवत तिने विचारलं,

"पुरं न्हवं ?"

"रेट झालं." तो इसम म्हणाला. "ही काय शहरातली सर्कस हाय व्हय ? पयल्या खुर्चीवर बसलीस तर आठ आणं. आणि मागच्या पिटाचं दोन आणं. कुठं बसणार ?"

"आता लांबचं दिसंतय व्हय लेका ! समोरच बसव मला."

तो इसम गर्दीत नाहीसा झाला. म्हातारी गर्दी पहात होती. कपबशांचा आवाज ऐकत होती. तो इसम तिकीट काढून घेऊन आला. पण त्याने अधेली परत दिली नाही. म्हातारीनंही विचारलं नाही.

"चल तुला बसवतो. लई गर्दी हाय बघ."

म्हातारी त्याच्या पाठोपाठ गेली. तंबूच्या दाराजवळच्या माणसाच्या हातात तिकीट देत त्यानं सांगितलं,

"आमच्या गावची म्हातारी आहे बाबा. अगदी पयल्या खुर्चीवर बसव."

आणि खरच त्या माणसानं म्हातारीला पहिल्या खुर्चीवर बसवलं.

तंबूत माणसांचा एकच आवाज फेर धरीत होता. समोरचं मातीचं रिंगण मोकळं होतं. त्या रिंगणाच्या पलिकडे पायाडावर तांबड्या भडक कपड्यावर रूपेरी पट्टे लावलेले बँडवाले बसले होते. तंबू चिक्कार भरला. तंबूची सारी दारं बंद झाली. पोलिसाच्या शिटीचा आवाज घुमला. बँड वाजू लागला. तंबूच्या छतावरनं रिंगणावर उजेड पडला. सारा तंबू शांत झाला. बँड वाजत असतानाच काळ्या गळपट्टीचा कोट आणि तशीच पाटलोण घातलेला, हातात चाबूक घेतलेला एक इसम धावत रिंगणात आला. मागे परतवलेले केस मानेवर उतरले होते. त्याने एकवार आपली मान तुकवली. चाबकाचे दोन आवाज उठले. बँड थांबला. थोडा वेळ तो काहीतरी बोलला. टाळ्यांचा कडकडाट झाला. चाबकाचे परत आवाज उठले. बँड सुरू झाला आणि रिंगणात आलेली चार घोडी फेर धरून पळू लागली.

बँडच्या तालावर नादावलेली म्हातारी आपल्या पाणावलेल्या डोळ्यांनी पहात होती. साऱ्या अंगावर काटा उभा राहिला होता. तिला समोरची घोडी दिसत नव्हती. टापांचा आवाज येत नव्हता. टापांबरोबर उडणाऱ्या रिंगणातल्या मातीच्या चकांद्या तिला जाणवत नव्हत्या. तिला दिसत होतं तिचं माहेरचं गाव. आंब्याच्या राईत दडलेलं. लाल मातीनं माखलेलं.

गौरा न्हाती-धुती झाली होती. दोन प्रहरची वेळ होती. परड्यात शेणी थापून गौरा परसदारी आली. पायरीजवळ ठेवलेल्या बारडीत हात धुतले. तोच तिच्या आईचा शब्द कानावर आला.

"पोर का सोंग ! दारात पावनं बघाय आलं आणि ही शेण थापत बसलिया."

"कोन आलया ?"

"तुझा दाल्ला !"

"वसू दे."

"तुला येळ असल पन तेला न्हाई. पसंत पडलीस. देणे-घेणं जैमलं तर अक्षत टाकून जायचं हाय मुंबईला."

गौरा रंगानं उजळ, देखणी. तिला विघून किसन हरकून गेला. देण्याघेण्याचा विचार त्यानं केला नाही. लगीन ठरलं. अक्षता पडल्या. आणि गौरासह किसन मुंबईला आला. अंगावरच्या पिवळ्या लुगड्यात आणि हिरव्या चुड्यात गौरा नव्या नवलाईची मुंबई वघत होती. किसनकडून समजाकून घेत होती. किसनने तिला ट्रॅम, वसमधून फिरवली. नाटक सिनेमा दाखवला. राणीचा वाग तिने कौतुकाने पाहिला. किसनवरोवर चौपाटीवर भेळ खाल्ली. मुंबईच्या दर्शनाने वावरलेली गौरा चाळवाल्या गावकऱ्यांच्या मायेत सुखावली. सारे दोघांचं कौतुक करीत होते. किसनला गाळा मिळाला. गौराचा संसार दहा हातांनी उभा राहिला

चावकाच्या आवाजाने म्हातारी भानावर आली. समोरच्या रिंगणात चारी घोडी दोन्ही पायांवर उभे राहून पुढे येत होती. बॅंडचा आवाज ताल धरीत होता. म्हातारीच्या डोळ्यासमोर मोर नाचत होता.

एके दिवशी किसन लौकरच चाळीत आला. त्याला वघून गौराला आश्चर्य वाटले. तिने विचारले,

"लौकर आलासा !"

"तुझ्यासाठी."

गौरा लाजली.

"तू सर्कस वघीतलीयास ?"

"न्हाई वा !"

"आज सर्कशीला जाऊ. कालच तिकीटं काढून ठेवल्यात. रजेची सारी भानगड मिटवली आणि सरळ घरला आलू. लौकर आटप. टायमात सारं व्हायला पायजेत."

गौराची कोण धांदल उडाली. किसनने कौतुकाने घेतलेले चिंचपाकळी लुगडं ती नेसली. हिरवी चोळी घालत असताना तिची नजर वर गेली. किसन तिच्याकडेच पहात होता. गौराने हाती धरलेला पदर चटकन सुटला. किसन मोठ्याने हसला. उसन्या रागाने गौरा म्हणाली,

"वाहीर जातायसा न्हवं ?"

म्हातारी वसल्या जागेला खुद्कन हसली. शेजारच्या खुर्चीवरचा वापय टवकारून पहातोय हे लक्षात आलं. म्हातारी हसायची थांवली. ती समोर वघू लागली. समोरचं रिंगण मोकळं होतं

मुंबईची सर्कस केवढी मोठी होती. असले दहा तंवू घातले तरी कमीच. किसनने सर्कशीचा सारा शिकारखाना गौरीला फिरून दाखविला. ते वाघ, सिंह, उभ्या जागी झुलणारे हत्ती, फुरफुरणारी उमदी घोडी. सारं कौतुकानं गौरा पहात होती. किसनही मोठ्या हुरपात सारं दाखवीत होता. त्याला सर्कशीचं वेडच होतं. तो म्हणाला,

"मला सिनेमा, नाटक, तमाशा कायवी आवडत न्हाई. कुस्त्या आणि सर्कस. माणसानं वघावं तर तेवढंच. तुला सर्कस आवडली तर ईल ती सर्कस आपण वघू."

"न आवडाय काय झालं ? तुमास्नी आवडल ते मला वी."

"खरं ? मग दाततनं पदर सुटला तर डोळं कां वटारलंस ?"

गौरा त्या भरगर्दीतही लाजली.

सर्कस वघताना तर गौराचे डोळे भिरभिरले. सूर्यासारख्या दिव्यांचा उजेड तंवूभर खेळत होता. वळवाच्या पावसात डग घुमावेत तसा बॅंड वाजत होता. मध्येच वीज कोसळावी तशी झांज अंगावर काटा मोडीत होती. तारवटलेल्या डोळ्यांनी गौरा सर्कस पहाण्यात गुंग झाली होती. घोड्या-हत्तींचे खेळ पाहून ती सुखावली. विदुषकांच्या करमणुकीने पोटभर हसली. रिंगणाला लावलेल्या गजांच्या पिंजऱ्यात जेव्हा एका मागोमाग सिंह शिरले तेव्हा वसल्या जागेला गौरा थरारली. चावकांचे फटके, सिंहाचे ओरडणे, उघडलेल्या जवड्यातून दिसणारे सुळे पहात असता लोकांची पर्वा न करता जोराने किसनच्या हाताला घट्ट धरून ठेवलं होतं.

रिंगणात जाळं लावल गेलं. तंग चड्ड्या आणि काचोळ्या घातलेल्या गोऱ्यापान सात-आठ वाया रिंगणात आल्या. त्यांच्या मागोमाग तंग चड्ड्या आणि नुसती गंजी घातलेले तेवढेच पुरुष आले. त्यांनी सर्वांना वाकून अभिवादन केलं. किसनने गौराला कोपरखळी मारली. किसनने तंवूच्या छताकडे वोट दाखविले. सोडलेल्या झोपाळ्याच्या दांड्या हेलकावे घेत होत्या. पहाता पहाता त्या झोपाळ्या-

**आणखी एक ल्योकनाट्योत्सव**



**"बाईचं ऐका, गाडीभर पैका".**

वरून सोडलेल्या चिंचोळ्या दोरशिडीवरून ती माणसे भरभर वर चढली. सारे वर जाताच शिड्या सोडण्यात आल्या. जाळी-भोवती विदुषक माकड चेष्टा करीत होते. पण गौराला त्यात आनंद नव्हता. खालून बोटाएवढ्या दिसणाऱ्या माणसांकडे ती पहात होती. छातीची धडधड वाढली होती.

एक बाई झोपाळ्यावर हेलकावे घेत होती. झोपाळा उंचावत होता. साऱ्या तंबूत भयाण शांतता पसरली. बँडवर टिपरी घुमत होती. अचानक झांजेचा मोठा आवाज झाला. आणि त्या बाईने स्वतःला सरळ खाली झोकून दिले. गौराच्या तोंडून न कळत अस्पष्ट किंकाळी बाहेर पडली. ती किसनला बिलगली. किसनने दाखविले.

"बघ."

धीर करून गौराने मिटलेले डोळे उघडले. दुसऱ्या झुल्यावरून आलेल्या, उरफाटे लोंबकळणाऱ्या इसमाने त्या बाईचे हात पकडले होते. झोका चालूच होता. मोकळ्या झालेल्या झुल्यावर एक पुरुष आला. नुसत्या पायाच्या आधाराने तो त्या झोपाळ्याच्या दांडीला लोंबकळू लागला. त्याचाही झोका वाढत होता. दोन्ही झोपाळे जवळ जवळ येत असता अचानक त्या बाईने हात सोडले आणि ती समोरून आलेल्या दुसऱ्याच्या हाताला लोंबकळू लागली. टाळ्यांचा मोठा आवाज झाला. घाम पुसत गौरा उद्गारली,

"अग्गो वया !"

"येवढं भ्यायला काय झालं ? एकानं हात सोडला तर दुसरा येऊन धरतोच की !"

"आणि न्हाई जमलं तर–"

"तर खालच्या जाळ्यात पडायचं."

"लागत न्हाई ?"

"लागतं. कवा कवा जाळं चुकून बाहेर पडलं तर मरत्यात बी."

गौरा घरी गेली तरी रात्रभर तिच्या डोळ्यासमोरून झोपाळा हालत नव्हता. दचकून ती जागी होत होती. त्यानंतर मुंबईला आलेली प्रत्येक सर्कस दोघांनी बघितली होती.

तंबूत एकच हसणं उठलं. म्हातारीने पाहिलं. क्षणभर आपण कुठं आहो हेही तिच्या ध्यानी आलं नाही. समोरच्या रिंगणात दोन पोरी सायकलचा खेळ करीत होत्या. काठ्यांचा आवाज करीत विदुषक त्यांच्या मागून धावत होता. त्या मुली उरफाटी, सरळ, सायकलच्या हव्या त्या भागावरून बसून रिंगणाचे फेर घेत होत्या. म्हातारीही हसली.

गौराला दिवस गेले तेव्हा किसनला केवढा आनंद झाला. चाळीतल्या बायकांच्या कौतुकात गौराला जास्त भारावल्यासारखं झालं. रामूचा जन्म झाला आणि गौराचे हात आकाशाला लागले. रामू दोन महिन्याचा असताना किसन गौरासह गावाला आला. देवीची खणानारळानं ओटी भरली. दोघा दीरानी, भावजयांनी तिला, मुलाला कपडा केला. किसनला पोराचं भारी कौतुक. चाळ गाठली की, रामूला खेळवत बसवायचा. रामू बापाच्या खांद्यावर गेला की, मग गौरानं बोलवलं तरी यायचा नाही. किसनला त्याची खूप गंमत वाटायची.

"गौरा, ह्यो मोठा झाला की, गावात हेला जमीन घेऊन देणार."

"जमीन !"

"न्हाईतर काय गिरणीत रावल ? माझी हाडं मोडली तेवढी रेट झालं. बघ तरी ह्याला घरं बांधून देतो. झकास शेताची पट्टी घेऊन देतो."

"त्याच्या बापवडलाचं काय न्हाई वाटतं ?" गौरा बोलून गेली.

"ते असतं तर मुंबईला कशाला आलू असतो ? दोन एकराचं शेत. एक पडकं घर. दोघं भाऊ-भावजया. त्यांची पोरं. दोन दिवस आपूण गेलो तर बसायला तर जागा व्हती ?"

गौरा त्यावर काही बोलली नाही.

पिंजऱ्याच्या आवाजाने म्हातारी दचकली. समोरच्या रिंगणात पिंजरा लावला जात होता. पिंजरा जोडून झाला. एका सिंहाने आत प्रवेश केला. सिंहाची सारी हाडं दिसत होती. गाई मागे वासरू चालावं तसा तो त्या काळ्या कपड्याच्या माणसामागून जात होता. पण तो पिंजरा, सिंह पाहून म्हातारीला कापरं भरलं. तिच्या अंगाला दरदरून घाम आला. हाताच्या बोटांना कापरा सुटला. तिने डोळे मिटून घेतले. पण डोळ्यासमोरचे हालत नव्हते..

आपल्या गाळ्यात दोन प्रहरच्या वेळी गौरा तांदूळ नीट करीत होती. अचानक चाळीतल्या चार-पाच बाया, पुरुष, गौराच्या गाळ्यात शिरले. बायांच्या डोळ्यात पाणी होतं. गौराने घाबरून विचारले,

"काय झालं ?"

"धीरानं घे वो बये !" एक म्हातारा तिच्याजवळ बसत म्हणाला.

त्याचा हात झिडकारून गौरा बाहेर धावली. गाळ्याच्या गॅलरीच्या कठड्याशी ती थांबली. तिचे पाय तेथेच खिळले. सारी चाळ गॅलरीला लपेटली होती. चाळीच्या चौकात एक टॅक्सी उभी होती. सभोवार माणसे गोळा झाली होती. कुणाला तरी बाहेर काढत होती. रक्ताचे डाग... कोण तरी बोलत होतं—

आता
**नव्या स्वरूपांत!**




## स्वस्तिक परफ्यूम्ड कॅस्टर ऑइल

वेड्यावाकड्या इतस्तत: पसरलेल्या केंसांना छानदार वळण लावतं; इतकंच नव्हे तर दिवसभर आपल्या केंसांचा भांग नीटनेटका ठेवतं.

मऊशार राहण्यासाठी, वेड्यावाकड्या केंसांना ठाकठीक बसविण्यासाठी... चमकदार बनण्यासाठी, सुरेख केंसांसाठी... आरोग्यदायी, सुवासिक केंसांसाठी... दिवसभर नीटनेटक्या नि सुव्यवस्थित राहणाऱ्या केसांसाठी स्वस्तिक परफ्यूम्ड कॅस्टर ऑइल.

स्वस्तिक ऑइल मिल्स,
मुंबई

Shilpi SOM 17/69 MAR










"ॲक्सिडेंट झाला...सरळ पट्ट्यातच सापडला..."

म्हातारीनं गडबडीनं तोंडाला हात लावला. हुंदका बाहेर फुटायचा तो आत गुदमरत होता. म्हातारीचे गाल डोळ्यातल्या अश्रूनी भिजत होते. समोरच्या रिंगणात एका चाकाच्या सायकलीवर बसलेली मुलगी आपला तोल सावरीत फिरत होती...

दहा हातांनी उभारलेला मुंबईचा संसार आवरून तान्ह्या मुलांसह गौरा सासरी आली. दोन वर्षात सारा संसार आटोपला. हळदीच्या पावलांनी मुंबईला गेलेली गौरा पांढऱ्या पायाची ठरून सासरी आली. उलटणाऱ्या दिवसावरोवर किसनने राखलेले पैसे संपत होते. तान्हं पोर असलेल्या बाईला शिवारात कोण काम देणार?

गावच्या सावकाराच्या घरात गौरा भांडी घासू लागली. पाणी भरू लागली. धुणं धुवू लागली. पाळण्यातला रामू रांगू लागला. चालू लागला. त्याच्या बोलण्याने गौराचा सारा थकवा नाहीसा होई. रामूकडे पाहिलं की, तिला जगण्याचं बळ यई.

रामू पाच वर्षाचा झाला. गौराला सावकाराची नोकरी सुटली नाही. सावकार-सावकारीण तिला घरच्या सारखं वागवीत. पगार, कपडालत्ता सारं देत. गौरा रूपानं देखणी होती. तरणी होती. पण कुणाची तिच्याकडे पहाण्याची छाती होत नव्हती. स्वतःला सांभाळून, सासरच्या आधारातून गौरा दिवस काढीत होती. रात्री रामूला कुशीत घेऊन ती झोपली की आपोआप तिचे डोळे भिजू लागत. किसनच्या साऱ्या आठवणींनं तिच्या चोळीचा काठ भिजून जाई...

तो विचार म्हातारीला असह्य झाला. ती परत सर्कस पाहू लागली. रिंगणांत एक हत्ती लहान स्टुलावर चारी पाय जुळवून उभा होता. आपल्या अवजड शरीराचा तोल सांभाळीत उभ्या जागी सोंड हलवीत होता. ते पाहून म्हातारी हसली. क्षणात तिचं हासू मावळलं...

सावकाराची नजर केव्हा गौरावर पडली हेही गौराला कळलं नाही. तिच्या वयानं तिला फसवलं की उपकारानं! कसं कळायचं? ...आणि आता कळून तरी काय करायचं...?

चोरून होणाऱ्या भेटी उघडकीला आल्या. थोडे दिवस कुजबूज झाली. पण सावकारानच धीर दिला. गावात हव्या त्या अफवा उठल्या. दीर भावजयासमोर जाण्याचं बळ गौराला राहिलं नाही. मोर आवळा टोचावा तशी बोचणी साऱ्या बाजूनी सुरू झाली. सावकार शहाणा होता. त्यानं सारं ओळखलं. गौराला त्यानं गावात स्वतंत्र घर करून दिलं. गौरानं परत प्रपंच थाटला. कधीमधी रात्री चोरून येणारा सावकार आता उजळ माथ्यानं दिवसा उजेडी गौराच्या घरी येऊ लागला. वसू लागला. साऱ्या गावाला ते सरावाचं झालं. गौरानं सावकाराला खूप सुख दिलं. घतलं. दहा वर्षात नदी काठची काळीभोर आठ एकराची पट्टी गौराच्या मालकीची झाली. घरात बैलाची जोडी आली. गौराच्या नावानं बोटं मोडणारी दीर-भावजया सणासुदीला गौराच्या घरात जेऊ लागले...

"हां! हां!"

म्हातारीनं समोर पाहिलं. एक भले मोठे अस्वल दोन पायावर उभे होते. त्याच्या वेसणीला लावलेली काठी धरून एक माणूस उभा होता. नाकाला बसणाऱ्या हिसक्यांनी अस्वल ओरडत होते. आपली थुंकी उडवीत मान उंचावत होते. म्हातारीला त्या अस्वलाची भारी कींव आली. तिने नजर वळवली...

सावकाराने जसा नकळत गौराचा हात पकडला तसाच एके दिवशी तो सोडूनही दिला. सावकाराच्या आजारीपणात मनात असूनही गौराला त्याची काही सेवा करता आली नाही. सारं उघड्या डोळ्यांनी तिला पहावं लागलं. सावकार मेला तेव्हा तिला मोकळेपणाने रडताही आलं नाही. घरात एकटेपणाने ती मनसोक्त रडली. जाणत्या झालेल्या पोरानं जिथं डोळ्यात आलेली आसवं पुसली नाहीत तिथं परकं कोण विचारणार? चार दोन बाया आल्या. समजावणीचं बोलल्या. पण त्या माघारी काय बोलणार हे समजून गौराला रडायचा देखील धीर झाला नाही. गौरानं सारं मुकाट्यानं सोसलं. गिळलं.

रामू मोठा झाला. कर्तासवरता झाला. घरची शेती करू लागला. गौराचा कितीतरी भार हलका झाला. बसल्या जागी चार जागी चार पैसे लावून गौराच्या अंगावर दागिने चढत होते. पुतळ्या, बोरमाळ, पाटली घातलेली गौरा मुलाबरोबर शेतावरनं आली की, सारे कौतुकानं मायलेकरांच्याकडे पहात. संध्याकाळी कट्ट्यावर गौरा पान खात बसली की, कोणीतरी म्हणे:

"नशिब तुझं. रामूसारखा पोरगा तुला मिळाला. ह्या दिसात आईला जपणारं पोर दिसायचं न्हाई."

असं कोणी म्हणलं की, गौराला किसन आठवायचा. ती चट्कन म्हणायची,

"मी काय जन्माला पुरलेय? आता तेचं लगीन कराया होवं!"

ते एकलं की एकणारा गप्प बसे.

गौराला सुरवातीला काही वाटलं नाही. एकादी पोरगी सांगून येईल म्हणून तिने खूप वाट पाहिली. पण जशा दोन लगीन सराया उलटल्या तशी ती बेचैन बनली. तिनं दिरांना सांगितलं. विश्वासातल्या माणसांना सांगितलं. ज्यांनी तिच्याकडून कर्ज घेतलं होतं, त्यांनाही तिनं शब्द टाकला. पण सोयरीक जमेना. एक दोन जागा जमत होत्या. त्याही ऐन वेळी मोडल्या, गौरा धावरून गेली. तिला जेवण गोड







अनुक्रमणिका

वाटेना. ती सावकाराजवळ राहिली. म्हणून तिची जात बाटली ? रामू कुणाचा मुलगा हे साऱ्या गावाला माहित होतं. मग त्यांची दातखिळी कां बसली ?

गौरा ईर्षेला पेटली. चार गाव ती फिरू लागली. आणि एके दिवशी सारं-गाव आश्चर्यचकीत झालं. गौरानं मुलाचं लग्न ठरवलं होतं. कुळाशिलाच्या घरातल्या मुलीला सून म्हणून गावात घेऊन आली. रामूचं लग्न केव्हा ठरलं. अक्षत केव्हा पडली हे सुद्धा तिनं गावाला कळू दिलं नाही. पण जेव्हा वरात आली तेव्हा मात्र सारा गाव रातभर झोपला नाही. पाच गावची वाजप लावून गौरानं वरात काढली. रात्री वेशी-पासून निघालेली वरात घरी येईपर्यंत उजाडलं होतं. दोघा भावजयींनी भरल्या कपाळानं नवरा नवरीला ओवाळलं. लिंब भात उतरून रामू बायकोसह घरी आला. गौराचं घर रामा-सीतेच्या पावलानं भरून गेलं. गौरानं आपल्या हातानं आपले सारे दागिने सीतेच्या अंगावर चढवले. पोराच्या लग्नात वय विसरून रावलेली गौरा लग्नाचा भार हलका होताच पडल्या जाते-वरून महिनाभर उठली नाही...

"बघ बावा ! बाबा बघऽऽ"

म्हातारीनं दचकून मागे पाहिलं. मागे बसलेलं एक पोरगं आपल्या बापाला समोर बघायला सांगत होतं. म्हातारीने समोर नजर वळवली. रिंगणात एक माकड छोटया सायकलीवर बसलं होतं. सायकल चालवीत होतं. म्हातारीच्या चेहऱ्यावर समाधानी हास्य उमटलं. तिने मागे नजर वळवली. ते पोरगं आनंदात टाळ्या पिटत होतं. हसत होतं. म्हातारीला भैरूची आठवण झाली. तिच्या मनात आलं. भैरूला आणलं असतं तर त्यानं अशीच टाळी वाजवली असती.

पण क्षणात तिचा विचार बदलला.

बगल उद्या ! सांगू त्याच्या बापालाऽऽ नवसानं हाती लागलेलं पोर. त्यो काय म्हाई म्हणणार !

नवस ! खरंच भैरू हाती गावेपर्यंत जीवाला कोण काळजी लागली होती.



॥ बिरबलायन ॥

## सत्कार नि श्रद्धांजली

**बादशहा** :–बिरबल, सत्कार व श्रद्धांजली यातील साम्य आणि फरक काय ?

**बिरबल** :–खाविंद, दोन्ही प्रसंगी अफाट स्तुतीची भाषणे होतात. सत्कार प्रसंगी खुष-मस्करी करणाऱ्यांचे फावते तर श्रद्धांजलीच्या वेळी मृत व्यक्तीच्या कट्टर शत्रूलाही त्याचा गौरव करण्याची संधी मिळते. सत्कार प्रसंगी प्रत्यक्ष व्यक्ती व त्यांचे हितचिंतक हजर असतात तर श्रद्धांजली प्रसंगी शत्रू-मित्र दोन्ही हजर असतात व मृत व्यक्तीचा आत्मा सभोवार वावरत असतो असे म्हणतात. सत्कार हेतूपूर्ण असतात तर श्रद्धांजलीमागे कर्तव्याची भावना असते.

## आधी कोण ? पक्ष की पुढारी ?

**बादशहा** :–बिरबल, आधी पक्ष की आधी पुढारी ?

**बिरबल** :–खाविंद, आधी पुढारी तयार होतो, मग तो पक्ष काढतो. कधी पक्षाची पिले बाळसे धरू लागली की ती वेगळी होतात.

## विद्यार्थी दंगल

**बादशहा** :–बिरबल, आजचे विद्यार्थी सर्वत्र दंगल करीत आहेत याला जबाबदार कोण ?

**बिरबल** :–खाविंद, आजच्या परिस्थितीची जबाबदारी नेते, बुद्धीवंत, अधिकारी, प्राध्यापक यापैकी कोणीच स्वीकारत नाहीत त्याअर्थी स्वातंत्र्यात ज्या पालकांनी या विद्यार्थ्यांना जन्म दिला ते जन्मदाते आईबापच आजच्या विद्यार्थ्यांकडून होणाऱ्या दंगलीला सर्वस्वी जबाबदार आहेत.

रामूचं लगीन करून दिलं. सूनपण चांगली मिळाली. रामूच्या संसारात गौरा समा-धानी होती. पण ते समाधान फार काळ टिकलं नाही. सुनेला दिवस गेले. बाळंतपण सुखरूप पार पडलं. पण पोर हाती लागलं नाही. सीतेला चार मुलं झाली. पण एकही टिकलं नाही. गौरानं देवधर्म केला. देवरशी बघितले. नवस केले, पण एकाला यश आलं नाही. पाचवा भैरू झाला. देवाला दया आली. पोर टिकलं. भैरूला पाच वर्षे पार पडली आणि म्हातारी स्वतःच्या पावलानं जोतीबाचा डोंगर चढली. देवाचं आवार तिनं दंडवतानं भरून काढलं...

म्हातारी समोर बघत होती. रिंगण मोकळं होतं. साऱ्यांची नजर तंबूच्या छताकडे वळली होती. म्हातारीने तिकडे पाहिलं. छताचे झोपाळे हेलकावे घेत होते. दोर धरून झोपाळ्यावरच्या पोरी बँडच्या तालावर हेलकावे घेत होत्या. झांज वाजली. एक पोरगी झेपावली. साऱ्यांचा श्वास दबला. पण म्हातारीला त्याचं काही वाटलं नाही. तिला माहित होतं की, कोणी तरी तसाच झेपावत येईल. त्या पोरीचा हात धरून घेऊन जाईल. सहज सहजी पोर पडायची नाही.

आणि घडलंही तसंच. ●










प्रभाकर पेंढारकर

गर्डरमधला शेवटचा बोल्ट हातावरच्या शीरा तटतटून फुगेपर्यंत बहादूरनं घट्ट केला आणि मला इशारा दिला.

जवानानी श्वास घेतला आणि ते तयार होऊन उभे राहिले.

चीफ इन्जीनिअर कर्नल गिल, कॅप्टन वहल, मेजर बंबा सर्वांच्याच॒नजरा माझ्याकडं लागल्या.

उगीचच मला पुण्याच्या आर्मी इन्जीनिअरींग कॉलेजची आठवण झाली. जणु आताही माझी परीक्षाच चालली होती.

फरक एवढाच होता की पुण्याच्या परिसरात आतासारखी सतलज मी उभ्या असलेल्या गर्डरखालून वाहिली नव्हती. आम्ही पुण्याला शिकत॒असताना बांधलेल्या पुलापेक्षा इथं सतलजचं पात्र अरुंद होतं; पण पाण्याला ओघ विलक्षण होता. वाटायचं, ही सतलज पात्रात उभे असलेले हत्तीसारखे काळे मोठाले पत्थर, मनात आणेल, ॒तर सहज ओढून घेऊन जाईल. ह्यात जर कोणी पडला तर. . . !

बहादूरनं मला परत इशारा दिला तसा मी भानावर आलो. शिटी वाजवली आणि हात वर करून खूण केली.

साऱ्यांचा मिळून एकच हुंकार सतलजच्या सतत चाललेल्या धोकारांत मिसळला आणि लोखंडी चाकावरून इंचाइंचानं पुलाचा सांगाडा पुढे सरकू लागला.

पुलाला आधार देण्यासाठी बांधून काढलेल्या कठड्याजवळ कॅप्टन वहल उभे होते ! खुणेपर्यंत पुलाचा सांगाडा पुढे सरकताच त्यानं हात उचलला. त्याच्या हाताच्या इशाऱ्याबरोबर पूल ढकलणारे जवान थांवले.

अनुक्रमणिका

....कशी कोणाला ठाऊक पण पडता पडता गर्डरची कड माझ्या हाती आली नि मी लोंबकळत राहिलो. खाली सतलजचं पाणी रोरावत होतं नि खडकावर आपटून तुषार उडत होते....लौकरच मीही एक तुषार होणार होतो....

इतका वेळ बाजूस उभे असलेले जवान पुढं धावले. अवजड गर्डर्स त्यांनी वाहून पुलाच्या सांगाड्याजवळ आणले. भराभर बोल्ट घातले गेले. फिरून बहादूरच्या हातावरच्या तटतटून फुगलेल्या शिरा मला दिसल्या. आणि मग "तयार!" म्हणून उचललेला खुणेचा हात!

पुलाच्या पुढे सरकणाऱ्या पहिल्या गर्डर-वर मी उभा होतो. पुढे सरकणारा पुलाचा सांगाडा तोल जाऊन पाण्यात पडू नये म्हणून पुलाच्या जमिनीकडच्या बाजूवर वजना-करिता दगड, वाळूची पोती, डिझेलचे ड्रम ठेवले होते.

पण प्रत्येक खेपेला हे वजन उतरवा-यचे, मागे सरकवायचे, ह्यात जाणारा वेळ वाढू लागला तशी माझी अस्वस्थताही वाढू लागली. ह्या पुलाची बांधणी ही मी बॉर्डर रोडवर आल्यापासून मला मिळालेली पहिली मोठी कामगिरी! इन्जिनिअरींग कॉलेजमध्ये असे पूल कितीदा तरी आमच्याकडून बांधवून घेत-लेले! मोठ्या आत्मविश्वासाने मी प्लॅन काढला होता. पुलाची लांबी, त्याकरिता लागणारे सामान, ते वाहून आणण्याचा आणि जोडण्याचा वेळ....सगळे तपशील मी विचारपूर्वक ठरवलेले होते.

त्यातल्या चुका आता दिसू लागल्या होत्या. कितीतरी अनपेक्षित गोष्टी आयत्या-वेळी पुढं येतात. पुलापर्यंतचा रस्ता अद्याप चांगला तयार झाला नसल्याने गर्डर वगैरे सामान माणसानाच वाहून आणावे लागत होते. आमचे अगोदरच मर्यादित असलेले मनुष्यबळ हे असे ह्यात अडकून पडले होते.

त्यातच पुलाचा तोल कायम ठेवण्या-साठी दुसऱ्या बाजूला पुरेशी जागा नस-ल्याने अधिक वजन थोडक्या जागेत ठेवणे भाग पडले. सोईचे, हवे तसे हालवता येणारे वजन म्हणून मी काही जवान वापरायचे ठरवले होते. त्यामागे त्यांना थोडी विश्रांति मिळावी आणि आलटून पालटून त्यांना कामावर पाठवता यावे व थकलेल्यांना विश्रांति देणे शक्य व्हावे हाही हेतू होता.

पण हा माझा हेतू अंशतः बरोबर ठरला. लांब उतरवलेले गर्डर वाहून आणण्यासाठी मनुष्यबळ कमी पडू लागले तशी त्यातली चूक माझ्या ध्यानात आली.

एक वाजला. जेवणाची सुट्टी झाली. माझ्या अपेक्षेप्रमाणे पुलाची बांधणी अर्धीही झालेली नव्हती.

डिझेलच्या ड्रमवर पुलासाठी वापरण्या-करिता आणलेल्या फळ्या टाकून 'डाय-निंग टेबल' चीफ इन्जिनीअर ह्यांच्या-साठी बनवण्यात आले. बसायला अर्थातच खुर्च्या नव्हत्या. त्यामुळे ह्या उभ्या उभ्या 'बुफे पार्टी'चा बेत छान जमला. पण माझे त्याकडे लक्ष नव्हते. मी घाईघाईत जेवण संपवलं आणि मी पुलाकडे जाणार इत-क्यात कर्नल गिलनी मला विचारलं की पुल किती वाजता पूर्ण होईल.

वास्तविक हे काम सातपूर्वी संपायला हवे अशी मी आखणी केली होती; पण आतापर्यंतच्या कामाचा वेग पहाता दहापर्यंत संपेल असे मी मोघम सांगितले.

कर्नल गिल म्हणाले, "Consider yourself lucky if you could complete it by midnight."

मी बोललो नाही. घाईघाईनं तेथून निघालो. अद्यापही काही जणांचे जेवण संपायचे होते. ते तसेच उभ्या जेवत होते. त्यांना घाई करीत मी पुलाच्या सांगाड्या-पर्यंत पोहोचलेल्या लाकडी फळ्यांच्या आडोशानं सहा सात गुरखे चक्क झोप-लेले! माझं डोकं तडकलं. बाजूलाच बहादूर सिगरेट ओढत बसलेला दिसला! हा त्या गुरख्यांचा मुख्य! गुरख्यांच्या बरोबर आमचा सगळा कॅम्प बहादूरला 'सरदार' म्हणत असे. मी नुकताच कॉले-जातून आलेलो! ऑफिसर आणि जवान ह्यांच्यामधल्या अंतराबद्दल माझ्या डोक्यात अद्याप कॉलेजमधल्याच कल्पना होत्या. त्यामुळे मी बहादूरला सरदार कधीच म्हणत नसे. आज मी त्याच्यावर जवळ-जवळ ओरडलोच.

"क्या चला है?"

"कुछ नहीं!"

"वह तो मैं देख रहा हूं! ये तुम्हारे लोग सो रहे हैं जगाओ उनको! चलो जल्दी करो!"

बहादूरनं एक वेळ माझ्याकडं पाहिलं आणि तोंडातल्या तोंडात तो पुटपुटला, "यह तो खाना खानेका वक्त है!"

"आज वक्त सिर्फ काम का है!" मी गुरकावलो. एव्हांना गुरखे उठले होते. गर्डर वाहून आणण्याकरता ते तेथून निघून गेले. बहादूर मात्र तेथेच उभा होता

मी त्याला म्हणालो, "आपभी मदद करो उनको!"

बहादूर त्यांचा 'सरदार' होता. त्यांच्या-बरोबर काम करायची आज्ञा त्याला कमी-पणाची वाटली असेल. तो बोललाही नाही आणि गेलाही नाही.

आज कर्नल गिल आणि इतर वरिष्ठ मंडळी नसती तर मी त्याला चांगलेच सुना-वले असते. 'पुढे केव्हा तरी' एवढेच मी स्वतःशी म्हणालो.

गर्डर वाहून आणायचे काम चार वाजे-पर्यंत चालले होते. जादा गर्डर ठेवायला जागाच नव्हती. इतक्यात झिमझिम पाऊस सुरू झाली आणि आमच्या कामाचा वेग अधिकच रेंगाळला.

मी पहात होतो. आता बहादूरही त्याच्याबरोबरच्या गुरख्यांबरोबर सामान वाहून आणत होता. हवेत थंडी एकदम वाढली होती. त्यातच झोंबणारे वारे! पण जवान घामानं निथळून निघत होते. त्यांच्या कपाळावर चमकणारे थेंब पावसाचे की घामाचे हे सांगणे मुश्कील झाले होते. पण थांबता येणे शक्य नव्हते. अर्धवट पूल सतलज आधांतरी ठेवून काम बंद करता आले नसते. कितीही रात्र झाली तरी पूल पूर्ण करायला हवा होता.



॥ बिरबलायन ॥

### यशस्वी नाटककार

**बादशहा :**—यशस्वी नाटककार कोणता ?

**बिरबल :**—नाटकाला आकर्षक नांव देऊन प्रत्येक गावी एकच प्रयोग करतो व प्रेक्षकांना तोंडघशी पाडतो तो!

### यशस्वी टीकाकार

**बादशहा :**—बिरबल यशस्वी टीकाकार कोण ?

**बिरबल :**—जो स्वतःला सोडून सर्वांवर टीका करतो व दुसऱ्याने आपल्या केलेल्या टीकेला केराची टोपली दाखवितो तो !

### यशस्वी पुढारी

**बादशहा :**—यशस्वी पुढारी कोण ?

**बिरबल :**—जो निवडणुकीनंतर एकदाच पाच वर्षांनी आपल्या मतदारांना भेटून पुन्हा निवडून येतो तो !"

पुढच्या जोडणीची तयारी झाली तसा मी पुलाच्या सांगाड्यावर चढलो. मध्ये फळ्या टाकलेल्या नसल्याने एका गर्डरवरून दुसऱ्यावर उड्या घेत मी सावधगिरीनं चाललो होतो. आणि नेमकी एक उडी चुकली. पहाणारे ओरडले, "देखो देखो लेफ्टनंट गिर गया !"

सरळ खाली सतलजमध्येच मी पडायचा; पण कशी कुणास ठाऊक माझ्या हातात गर्डरची कड आली. मी गर्डरला लोंबकळू लागलो. बरोबर माझ्याखाली सतलजमध्ये एक मोठा खडक दिसत होता. पाण्याचा प्रवाह त्यावर जोरान धडकत होता. शुभ्र रुपेरी तुषार जोराने उसळत होते. बोटे कमालीची कचू लागली होती. हाताची पकड सैल होत चालली होती. काही सेकंदाचाच अवधी होता. त्यानंतर त्या दगडावर उसळणाऱ्या तुषारांतील मी एक झालो असतो.

"पुलावरील कोणीही जवानाने जागा सोडायची नाही !" कर्नल गिल पुलाचा समतोल राखणाऱ्या जवानांना बजावत होते. ह्यानंतर काय झाले हे मला आठवत नाही. सतलजच्या आवाजात इतर काही ऐकू येईनासे झाले. माझी बोटे सुटलीच. एवढ्यात एका बळकट हाताने माझे मनगट पकडले आणि अलगद वर खेचले.

तो बहादूर होता !

मी पुलावर उभा राहिलो तशी खूण करून कर्नल गिलनी मला जवळ बोलावलं.

"How are you ?"

"OK Sir !"

"Let Capt. Bahl take over !"

"No Sir, I am fine. Let me complete it."

"All right. Go ahead !" कर्नल म्हणाले.

मी फिरून पुलाच्या शेवटच्या गर्डरवर उभा राहिलो. बोल्ट लावले गेले. घट्ट केले गेले. बहादूरच्या हातावरल्या तटतटलेल्या शिरा, त्यानंतरची "तयार !" ची खूण ! मी शिटी वाजवली. इंचाइंचानं पुल पुढं सरकू लागला.

मग आम्ही थांबलोच नाही. पहाता पहाता अंधार झाला. आकाश ढगाळलेले असल्याने चांदण्या दिसतच नव्हत्या. पण खाली पाण्याचे तुषार त्यावर पडणाऱ्या गॅसबत्तीच्या उजेडात चांदण्यासारखे चमकत होते.

जेवायची सुट्टी दिलीच नाही. त्याऐवजी प्रत्येकाला जागेवरच मगभरून गरम चहा देण्यात आला. घड्याळाकडे पहायला फुरसत होती कुणाला ?

पुलाचे पुढे पुढे सरकणारे टोक पलिकडच्या काठड्यावर टेकले तेव्हा मी घड्याळ पाहिले. पुरे बारा वाजले होते !

आम्ही सारेच थकलो होतो. पण काम पूर्ण झाल्याचा आनंद आगळाच होता.

या आनंदातच आम्ही मेसमध्ये जमलो. मेस तंबूतच होती. ऑर्डर्ली छोटेखानानं लालभडक निखाऱ्याची शेगडी आत आणून ठेवली आणि आम्ही सारे त्याभोवती गोल करून बसलो. हातात रमचे ग्लास होते. कर्नल गिल उद्या पहाटेच जाणार होते. झालेल्या कामाबद्दल गप्पा चाललेल्या होत्या.

मध्येच कर्नल माझ्याकडे वळून म्हणाले, "I appreciate your courage. I am glad, you didn't leave it halfway."

मी थँक्स म्हणालो.

मग कर्नल सांगू लागले, "सैन्यातल्या इतर भागांपेक्षा 'इंजीनियर्स'मध्ये काम करण्यात, मला तरी वाटतं, वेगळा आनंद आहे. आपण आपल्या नजरेसमोर काही निर्माण करीत असतो. आता इतक्या हालअपेष्टा सहन करून तू पूल बांधतो आहेस. ह्या त्रासाच्या आठवणी पूल पुरा होईल तेव्हा बुजतील आणि आपण काही निर्माण केले हा आनंद आणि अभिमान तेवढा शिल्लक उरेल !"

आणि मग ते एकदम म्हणाले, "हे पहा, ह्या रमच्या दोन बाटल्या त्या गुरख्यांना पोहोचत्या कर. It may be against the rules. But I am not bothered."

मला बहादूरची आठवण झाली. माझा जीव वाचवलेल्या त्या गुरख्याचे मी आभारही




मानले नव्हते. रमच्या दोन बाटल्या मी उचलल्या आणि बाहेर आलो. छोटेखानचा पत्ता नव्हता. तो बहुधा रमबरोबर खाण्यासाठी पापड किंवा पकोडे आणण्यासाठी गेला असावा.

मी रमच्या बाटल्या घेऊन तसाच निघालो. सैन्यातल्या जवानांची आणि जनरल इंजीनिअर्स रिझर्व्ह फोर्समधल्या लोकांची रहाण्याची सोय कम्पमध्ये केलेली होती. आजूबाजूच्या खेड्यांतून कामावर घेतलेले 'लोकल-लेबर' काम संपले की आपापल्या घरी परतत असे. अडचण असे त्या गुरख्यांची ! त्यांना लोकल लेबर समजले जाई पण त्यांची घरे दूर नेपाळात ! इथं बिचारे दगडांच्या आडोशाने रहाण्याची जागा बनवत.

बहादूर आणि त्याच्या गुरख्यांची रहाण्याची अशीच आडोशाची जागा मला माहीत होती. तेथे जाऊन मी हाक मारली. उत्तर नाही. आत डोकावले सहा सात गुरखे मेणबत्तीच्या मिणमिणत्या प्रकाशात पत्त्यांचा जुगार खेळण्यात मग्न झालेले. अन्न खायला पैसा नाही ह्यांच्याकडे आणि पैशाचा जुगार चालूच !

मी काहीशी घुश्यातच परत हाक मारली. ह्यावेळी आतली कुजबूज थांबली. कुणी तरी बहादूरला उठवलं. तो अंगावरची चादर घट्ट लपेटत बाहेर आला; आणि मला पहाताच त्यानं चादरीबाहेर हात काढत सलाम ठोकला.

मला त्याचे आभार मानायचे होते, पण शब्दच सापडेनात. इंग्लीशमध्ये 'थँक्स' हा सर्वकाळ उपयोगी पडणारा उत्तम शब्द आहे. पण हिंदीत काय म्हणायचं समजेना. शेवटी मी त्याला पुढं बोलावलं आणि म्हणालो,

"हे घे !"

मी पुढं केलेल्या रमच्या बाटल्या पाहून तो चकित झाला.

"यह क्या सर ?"

"दिनभर तुम लोगों ने खूब काम किया, लो, अभी मजा करो !"

एव्हांना बाकीचे गुरखेही बाहेर आलेले होते. बहादूरनं बाटल्या घेतल्या आणि त्यांच्या स्वाधीन केल्या. ह्या अनपेक्षित भेटीचा आनंद त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्ट प्रकटला. दोन दोनदा मला सलाम करून ते आत पळाले. मी आणि बहादूर दोघेच उरलो.

"सर, ह्याची गरज नव्हती !" तो म्हणाला.

"तू माझा जीव वाचवला आहेस." असं काही मला त्याला सांगायचं होतं. पण तेही जमलं नाही. "अच्छा, कॅरी ऑन !" नेहमीप्रमाणं मी एवढंच म्हणालो आणि जायला वळलो; पण मनात मळमळ होती. मी थांबलो आणि बोलून टाकलं.

"बहादूर अभी क्या चला था ?"

"कुछ नही सर. पत्ते खेळत होते !"

"पैसे लावून--?"

बहादूर बोलला नाही.

"ह्याला जुगार म्हणतात. सैन्यात परवानगी नाही ह्याला !" मी कडवटपण म्हणालो.

"सर मला समजतं. पण घरादारापासून दूर येतात हे लोक. रहायला जागा नाही. अंगावर एक चादर, तीच पांघरायची, भिजली की अंगावरच सुकवून वापरायची. सकाळी घाईघाईत स्वतःच्या हातानं काही बनवायचं, दोन्ही वेळ तेच खायचं ! काही-तरी हवं जीवाची करमणूक करायला. खेळतात ! माझ्यावर जबाबदारी आहे त्यांची ! सर काही वाईट घडायचं नाही त्यांच्या हातून ! सरदार आहे ना मी त्यांचा !"

मी काही बोललो नाही. चार दोन क्षण तसेच निघून गेले. 'अच्छा' म्हणून मी बहादूरचा निरोप घेतला आणि मेसकडे चालू लागलो.

दुसऱ्या दिवशी पहाटे कर्नल गिल, मेजर बंबा वगैरे वरिष्ठ अधिकारी एच्. क्यू. कडे रवाना झाले. जाताना कर्नलनी परत येण्याची तारीख सांगितली. तोवर पुलापलिकडील रस्ता पूर्ण झाला पाहिजे म्हणून त्यांनी बजावले. तीन महिन्यानंतर ह्याच तारखेस ते परत येणार होते.

कर्नल गिल गेल्यावर परत तंबूत जावेसे वाटेना. मला एकदम पुलाची आठवण झाली. एका अनामिक ओढीनं माझी पावलं पुलाच्या दिशेने पडू लागली. कॅम्पमधून बाहेर पडून डाव्या बाजूस वळलो. खाली दूरवर पूल दिसू लागला आणि मी एकदम थबकलो. लांबून नीट ओळखता येणं शक्य नव्हतं; पण एक व्यक्ती पुलावर उभी होती. त्या मोठ्या पुलावर तेवढा एकच ठिपका पडावा तसं वाटत होतं. मी निरखून पाहू लागलो. तो माणूस सैन्यातला नक्कीच नव्हता.



शवसाहित्याचा राम बोले महिसम् !







अनुक्रमणिका

सरळभांग वेणीचा झुबका
मालेच्या मिशीसीं
अनार दाणेदार तुझ्यागे
मासुक मुखड्यामधिं
बसलें
तंगचोळी छातिवर
जोबन कवळें रसरसलें
तू रत्नाची खाण,
तुझे गुण बहुत दिसले
शरम तुझ्या नैनात,
पाहुनिया
मन आमुचें
तुजवर बसलें
—शाहीर प्रभाकर




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



माझ्या हृदयाचा ठोका चुकला. सरहद्द येथून केवळ आठ मैल ! जवळपासच्या खेड्यातले लोक चोरून लोकर आणण्यासाठी पलिकडे तिबेटला जात आणि चिन्यांना आमच्या हालचालींची इत्थंभूत बातमी समजे. पैशाकरिता कोण काय करील ह्याचा नेम नाही. माहिती विकणे हे काही आम्ही थांबवू शकत नव्हतो; पण घातपाताचा प्रकार झाला तर–!

मी पुलाकडे धावत सुटलो. त्या थंडीत मला घाम फुटला. आणि तो निव्वळ धावण्याच्या श्रमामुळे आलेला नव्हता.

मी पुलाजवळ पोहोचलो तेव्हा त्या व्यक्तीचं माझ्याकडे लक्ष गेलं. मला पाहून पळून जाण्याऐवजी ती माझ्याकडंच येऊ लागली आणि मी एकदम ओळखलं– बहादूर होता तो !

"इथं काय चाललंय् ?" मी काहीशा कठोर शब्दात विचारलं.

"काही नाही. पूल पहातोय् !"

"ह्या वेळी ?"

"होय !" एक दोन क्षण तसेच स्तब्धतेत गेले.

मग बहादूर स्वतःशीच बोलल्यासारखं सांगू लागला.

"आमच्याही मुलखात अशाच डोंगरदऱ्या. असेच ओढे-नाले अन् नद्या ! फार अडचण होते प्रवासाची !" आणि खाली सतलजच्या पात्राजवळ गावकऱ्यांनी बांधलेल्या जुन्या लाकडी पुलाकडे बोट दाखवून तो म्हणाला, "तो खालचा पूल पाहिलात. एका वेळी एक माणूस कसावसा जाऊ शकतो त्यावरून ! पाऊस पडला की लाकडावरून पाय घसरतात. ह्या पाण्यात पडलेली माणसं. नखही सापडत नाही त्यांचं ! हा पूल तयार झाला ना, मोठं समाधान वाटलं मला !"

ह्यावेळपर्यंत मला कोणताही गुरखा काहीसा निर्बुद्ध वाटायचा. सैन्यात लढण्याखेरीज त्यांचा काही उपयोग असेल असं मला वाटलं नव्हतं ! त्यापैकी एकाच्या डोळ्यात 'उगवत्या सूर्याच्या' प्रकाशात चकाकणारे आनंदाश्रू पाहून मी चकीत झालो.

त्यानंतरचा जवळजवळ एक तास मी व बहादूर पुलावरच होतो. पुलाचे काय काय काम राहिले आहे, पुढचा रस्ता कोठून काढायचा वगैरे पहाणी मी करीत होतो. बहादूर माझ्याबरोबर होता.

पलिकडच्या बाजूस नितळ उभा पत्थर होता. अशा पत्थराला 'ढांग' म्हणतात ह्या भागात ! हा ढांग फोडून रस्ता तयार करायचा म्हणजे महा कठीण काम ! प्रथम ह्या पत्थराच्या वरच्या बाजूस मेखा मारून दोरावरून माणसे खाली सोडायची. ह्या लटकत्या माणसांनी छन्नी आणि हातोड्याने रस्ता तयार करायच्या जागेवर रेघ कोरायची. मग हळु हळू ही रेघ रुंद करत जायचं !

आमची जणू रस्सीखेचच चालू होती. एका बाजूला आम्ही, दुसऱ्या बाजूस हा ढांग ! मध्ये होती कर्नल गिल परत येण्याची तारीख ! मागची चूक परत होऊ नये म्हणून मी जागरूक होतो. येथे ओव्हरटाईमचा प्रश्नच नव्हता. कित्येकदा संध्याकाळी उशीरापर्यंत गॅसबत्त्यांच्या प्रकाशात आमचे काम चालत असे. सर्वांच्याच मनात आता काम वेळेत पूर्ण करण्याची ईर्षा लागली होती.

पहाता पहाता तीन महिने संपत आले. आता पत्थराचा थोडासाच भाग फोडायचा राहिला होता. त्यामध्ये एकाच दिवशी आम्ही पंचवीस सुरुंग उडवले. ह्यानंतर दोन दिवस काम बंद ठेवण्यात आले. असे मोठ्या प्रमाणावर सुरुंग उडवले जातात तेव्हा बाजूचे दगडही हाललेले असतात. हे दगड सुरुंग उडवल्यानंतर एक-दोन दिवस पडतच असतात. अशा वेळी दोन दिवस काम बंद ठेवण्यावाचून गत्यंतर नसते.

ह्या दोन दिवसाच्या सुट्टीत मी कसाबसा दम धरला. त्यानंतर अगदी सकाळीच मी साईटवर दाखल झालो. बुलडोझरचा ऑपरेटर गिनाथ आणि बहादूर ह्यांच्या काही गप्पा चाललेल्या होत्या. बहादूरचे सात आठ लोक हातात कुदळी, पहारी, फावडी घेऊन तयार होते. इतर जवान अद्याप यायचे होते. आम्ही पुढे झालो. सुरुंग उडालेल्या जागेची पहाणी केली. सुरुंगांनी आपले काम चोख केले होते. आता हे दगड खाली ढकलले की रस्ता झालाच ! ठरलेल्या दिवसापेक्षा चारएक दिवस अगोदरच !

बुलडोझर सुरू झाला. बहादूर माझ्याजवळ उभा होता. त्याचे गुरखे पुढे झाले आणि दगड बाजूस करू लागले. आणि एकदम मोठा आवाज झाला. समोरचं दृश्य पाहून माझं एकदम बर्फच झालं. जागच्या जागी मी थिजून गेलो.

दगडाचं छप्परच एकदम खाली आलं. ते सातआठ गुरखे त्याखाली पहाता पहाता गाडले गेले. बहादूर मटकन खाली बसला. गुढग्यात डोकं खुपसून तो रडू लागला. त्याच्या सांत्वनासाठी मला एक पाऊल टाकता येईना. सारी शक्तीच संपली.

एवढ्या वेळात जवान धावले. त्यांनी दगड बाजूला करायला सुरुवात केली. डॉक्टरांना आणण्यासाठी जीप पाठवण्यात आली. पण हे एवढे मोठे दगड अंगावर कोसळल्यावर डॉक्टर काही करू शकणार नाहीत हे उघड होतं ! विच्छिन्न झालेली, डोकं, हात पाय छाती सगळीच हाडं ठेचली गेलेली सात प्रेते दगडाखाली मिळाली. त्या गुरख्यांपैकी एकही जगला नाही !

रणांगणावर सुतक पाळता येत नाही. तो दिवस तसाच गेला. दुसऱ्या दिवशी दुःख गुंडाळून ठेवून सर्व कामास लागले. मी मात्र उदास होतो. कॅप्टन बहलला मी सांगितलं की मी आज साईटवर येत नाही. रिकाम्या कॅम्पमध्ये मी माझ्या तंबूत विमनस्क बसून होतो. अद्यापही कानांत तो दगड कोसळण्याचा आवाज घुमत होता. नजरेसमोर, ते सात जीव दगडाखाली जिवंत समाधी घेण्याचा क्षण, दगडात कोरल्यासारखा स्पष्ट दिसत होता.

वेळ जावा म्हणून हेड क्वॉर्टर्सला पाठवायचे प्रोग्रेस रिपोर्ट मी काढले आणि ते भरत बसलो. ते भरण्याचाही कंटाळा आला. उठलो, तंबूबाहेर आलो. साऱ्या कॅम्पवर






अनुक्रमणिका

मरणाची छाया पसरल्यासारखी सगळीकडे शांतता होती. त्यानं मन अधिकच खिन्न झालं. मी कॅम्पबाहेर पडलो. पाय नेतील तसा चालत राहिलो. एकदम लक्षात आलं, ह्या बाजूस मी एकदा आलो होतो. रात्रीचा ! बहादूरला रमच्या वाटल्या देण्यासाठी !

एका मोठ्या दगडाच्या आडोशाने केलेली त्या सात गुरख्यांची रहाण्याची जागा आता रिकामी असणार ! क्षणभर करमणुकीसाठी मांडलेला तो पत्त्याचा डाव आता अपुराच पडलेला असेल ! मी आत डोकावून पाहिलं, अंधार होता. सूर्य प्रकाशातून एकदम आत पाहिल्यानं प्रथम काही दिसेना. डोळे सरावले तसा ह्या अंधाराचाच एक भाग बनून बसलेला बहादूर मला दिसला. चादर लपेटून गुडघ्यात डोकं घालून तो स्तब्ध बसला होता. इतका स्तब्ध होता की मला वाटलं ह्या शरीरात चेतनाच नसावी. शंकाकुल होऊन मी हाक मारली, "बहादूर– !"

बहादूरनं वर पाहिलं. तो उठला, बाहेर आला आणि मला सलाम करून स्तब्ध उभा राहिला.

त्याचे डोळे शुष्क होते. चेहऱ्यावर निर्बुद्ध दुःख गोठलेले होते. काय विचारायचं मला सुचेना.

"काम पर नही गया ?"

"नहीं सर ! अभी तो कोई जरूरत भी नहीं !"

माझ्या अर्थशून्य प्रश्नाला त्यानं असंबद्ध उत्तर दिलं ! अशा दुःखावर काळ हाच उपाय असतो. सिमल्यापासून इथपर्यंतच्या प्रवासात दर पाच दहा मैलावर रस्त्याच्या बाजूला अशा अपघाती मृत्यूकरिता कृतज्ञतेनं बांधलेली किती तरी स्मृति चिन्हे दिसतील. पण त्याला इलाज नव्हता ! देशाच्या संरक्षणाकरिता साध्या–अर्धशिक्षित पोटार्थी लोकानी दिलेली किंमत होती ती ! बहादूर तसाच उभा होता. मी म्हणालो, "जाओ आराम करो !"

"सर, अभी आराम कैसा ? जो मरते है वह छूट जाते हैं, जो बाकी रहते हैं, मुश्कील तो उन्ही के लिए होती है !"

ह्या एकाकी माणसाला त्याचं दुःख व्यक्त करायलाही माझ्याव्यतिरिक्त कोणी नव्हतं.

मी म्हणालो "तुझं दुःख मी जाणतो– पण– !"

"मेरी बात जाने दीजिए सर–"

मला मध्येच थांबवत बहादूर काहीशा चिडक्या सुरात म्हणाला,

"माझ्याबद्दल नाही मी म्हणत– ! ह्या गुरख्यांच्या घरी त्यांच्या बायका आहेत, कच्ची बच्ची आहेत. म्हातारे आई बाप आहेत. त्यांना मी शब्द दिला होता. माझ्या जबाबदारीवर त्यांनी ही माणसं पाठवली. मी. . मी सरदार आहे ना त्यांचा ! आता परत जाऊन त्यांना काय सांगू ?"

ह्या प्रश्नाला उत्तर नव्हतं ! मी गप्प उभा राहिलो. एक चमत्कारिक शांतता पसरली. तिने मला अस्वस्थ केलं. न बोलताच मी बहादूरला सोडून परतलो.

ह्या सर्वाचा विसर पडावा म्हणून फिरून ते रिपोर्ट पुरे करण्याच्या मागं लागलो. किती वेळ मी लिहीत होतो. वेळेचं भान राहिलं नव्हतं. रिपोर्ट पूर्ण होत आले इतक्यात माझा ऑर्डर्ली छोटेखान धावतच माझ्या तंबूत आला. धाप लागल्याने त्याच्या तोंडून शब्द फुटत नव्हता. कसंबसं तो म्हणाला,

"सर, वह सरदार मर गया– !"

मी दचकलो. त्या शब्दांचा मला अर्थच समजेना. श्वास घेत छोटेखान सांगू लागला, "सरदार–वह अपना बहादूर. पूल से नीचे सतलज में गिर गया !"

मी तंबूबाहेर धावलो. दूरवर पूल दिसला, तशी पायातली शक्तीच गेली. खाली दूरवर सतलज घोंकार करत पिसाळून धावत होती. पात्रातल्या मोठमोठ्या खडकांवर प्रवाह आदळत होता. रुपेरी तुषार उसळत होते नि परत त्या प्रवाहात लुप्त होत होते. काही दिवसांपूर्वी मी त्या सतलजच्या प्रवाहात पडता पडता वाचलो. आज मला वाचवणारा ह्या सतलजचा बळी झाला होता. बॉर्डर रोडच्या जवानांनी पुलावर, खाली पात्राशेजारी गर्दी केली होती. मी पुढं गेलो नाही. स्वतःहून ज्यानं मृत्यूला कवटाळलं होतं, त्याला घेऊन सतलज वहात होती. बहादूरचा शोध आता व्यर्थ होता.

कर्नल गिल यांची जीप पुलावरून ढांग ओलांडून रस्ता पुरा करायचं ठरलं होतं त्या जागेपर्यंत पोहोचली. कॅप्टन बहलची आणि माझी पाठ थोपटीत कर्नल म्हणाला, "I am glad, you have completed the work in time." आणि मग ते म्हणाले, "हीच ना ती जागा I mean where that unfortunate accident took place ! Very sad !"

आम्ही परतलो. दुपारी कर्नल तंबूमध्ये विश्रांती घेत होते तेव्हा मी त्यांच्यासमोर जाऊन उभा राहिलो.

'सर एक काम होतं.'

'बोल.'

'मला बदली हवीय'

'कां ?'

'मला इथं राहायचं नाही.'

"तुझी मनःस्थिती मी जाणतो, पण कुठंही गेलास तरी दुःख पाठपुरावा करीतच राहातं. त्याला सामोरं जाण्यातच खरं शूरत्व आहे !"

मी उत्तर दिलं नाही. सर्वांगावर चादर लपेटलेल्या आणि पुलावर एकाकी उभ्या असलेल्या सरदारची आकृती माझ्या डोळ्यांपुढून हलतच नाही. ● ● ●



# पोराचे सुर्वे

— रवींद्र पिंगे

गॅस कंपनी सहाला सुटायची. तावडतोब दोन मिनिटात माणसं खाली उतरून सामसूम व्हायची. फक्त सुर्वे तेवढे मागे रेंगाळायचे. कंपनीच्या मागच्या–पुढच्या दोन्ही दरवाज्यांवर हंटरवाले पठाण साडे सहा, सातपर्यंत ठाण देऊन उभे असायचे. ते निघून गेल्याची पुरती खात्री झाली की सुर्वे कंपनी सोडत. मग इराण्यांच्या दुकानातल्या केकसपुडींगांचे घमघमाट थेट पोटापर्यंत हुंगत सुर्वे पायीपायीच गिरगांवच्या रस्त्याला लागायचे. वाटेत मच्छी मार्केटात मासळी घ्यायचे. तिथे पोहोचेपर्यंत बहुतेक मासळी संपलेलीच असे. उरलेले कपटे येईल त्या भावाने फुंकायला कंटाळलेल्या कोळणी बसलेल्याच असत. सुर्व्यांना त्या सगळ्याच ओळखायच्या. ते दिसले की कावकाव करायच्या. चार आठ आण्यात सौदा पटायचा. बहुतेक मांजाळीचं मिळे. कधी ढोमे मिळत. कधी पेडवे असत. कधी कधी सुरमईचं फेरही असायचं. ते घेऊन शिकार मारल्याच्या आनंदात सुर्वे काळोखातून घरी यायचे.

तोपर्यंत सुर्व्यांचे पांचही लेक घरी आलेले असायचे. सर्वात थोरला पांडू पंधराव्या वर्षी कसाबसा इंग्रजी दुसरीपर्यंत आला होता. त्याच्या मागच्या प्रत्येकाने प्रत्येक वर्गात खा-खा गचांड्या खाऊन सुर्व्यांना जीव नकोसा केला होता. थोरला चोरून विड्या ओढतो हे मागच्या एकनाथाला पक्कं माहीत होतं. एकनाथ शाळेला बुट्टी मारून दुपारी चौपाटीवर भटकतो हे मधल्या काशीनाथाला ठाऊक होतं. टांग्यांच्या मागे लटकून काशीनाथ सगळा भुलेश्वर पालथा घालतो आणि कबुतरखान्यातले चणे खातो हे मागले दोघेजण चाळीतल्या पोरांकडून ऐकायचे. पहिल्या तिघांनाही माहीत होतं की शेवटच्या दोघांना चाळीतले कोणीही खोलीत पाय टाकू देत नाहीत–ते आले रे आले की त्यांच्या खोलीतल्या वस्तू नाहीशा होतात.

दिवेलागणीपासून सुर्वीण पोरांच्या नावाने ठणाणा करू लागायची. "घरां नायतका तुम का ? शेजारच्या शेणव्यांची पोरां बघा" पाचही भाऊ ढिम न करता चाळीमागच्या मोकळ्या जागेत धिंगाणा घालीत असत. "इलय ग", "पैक इलय", असं करीत करीत काळोख पडेपर्यंत ते वेळ काढीत. इतर पोरं घरोघर पांगली तरी ते एकमेकांची कळ काढत, ढकला-ढकली करत, काळोखात हुंदडत असत. खेळता खेळता एकजण काळोखात कुजबुजे, 'अरे, बाबा आले.' मग शेपटचा घालून पाचही भाऊ निमुटपणे घरात घुसत. हात पाय धुतल्यासारखे करून बत्तीसमोर पर्वचा ओरडत. पर्वचेनंतर रामरक्षा ओरवाडली जाई. तोपर्यंत मासळीची पिशवी घेऊन सुर्वे हजर होत. त्यांनी घरात पाऊल टाकलं रे टाकलं की पाचही पोरं चेवाचेवाने तोंडाला येतील ते पाढे घोकू लागत.

कुणाशीही चकार शब्द न बोलता सुर्वे हातपाय धुवत. चहा घेत. तोपर्यंत पोरं कंदिलाभोवती पुस्तकं उघडून बसलेली असत. सर्वांच्या नजरा चोरून बापाकडे लागलेल्या असत. सुर्व्यांनी हाशहुश् केलं की सुर्वीण सांगे,

"आज पांडून् माका गाळी घातल्यान."

"नाय बाबा, मी ताईला नाय दिली. रायकरांच्या बाबूनं मला शिवी दिलीन अगोदर म्हणून मी त्याला दिली." पांडू सांगे.

"खोटां सांगतस ? बोलांव रायकरांच्या बाबूक ?"

"एकनाथाला विचारा."

"म्हणजे बोको उंदराक साक्षी ! आज एकनाथ घरातली नारळाची आख्खी कवड घेऊन पळालो." सुर्वीण फणफणत सांगे.

"छडी आण." सुर्वे फर्मावीत. डोक्यात वेणी माळावी त्या आनंदाने सुर्वीण खुंटीवर आडवी ठेवलेली छडी काढी. काढता काढता सांगे,

"ह्या काशीनाथान नव्यो बुक धापू केल्यान."

"हो काय् रे गाढवा ?" सुर्वे अवसान आणीत.

"मी नीट ठेवलंवतं." रडवेला होत काशीनाथ सांगे.

"मग गेलं कसं ? पीसं फुटली बुकाला ?"

"मी नीट ठेवलंवतं."

"नि सांबारीन सांगत होत्यो, ह्या दोन झिलांनी त्यांचे सुकत घातलेले सांडगे पळवल्यानी नि आगाशीत टाक्यांच्या पाठी बसान खाल्ल्यानी हांवऱ्यासारखे."

"होय रे कार्ट्यांनो ?"

कार्ट्यांच्या उत्तरांची वाट न बघता कासेटा घट्ट करीत सुर्वे उठत. पाचही पोरं हात पुढे करून रांगेने गुपचूप उभी रहात. सवयीनं तोंड रडवेली करत. मग चहा पिऊन तरारलेले सुर्वे खुषीत आलेल्या सुर्वीनी समक्ष वाळलेल्या अंगातलं सगळं बळ एकवटून प्रत्येक लेकाच्या हातावर सपासप छड्या मारीत. शिव्या हासडत. त्या पचवून पाचही पोरं पुन्हा कंदिलाभोवती पुस्तकं घेऊन बसत.

सुर्वे नवी विडी शिलगावीत. सुर्वीण स्वैपाकाला लागे. छड्यांचा सिनेमा बघायला चाळकरी मिनीटभर सुर्व्यांच्या दारात थांबत. पाहीलेलं घरी बायकांना मीठमसाला लावून सांगत. बायका म्हणत, "सावत्रपण असलं म्हणजे असंच असायचं. हे जर पाच पांडव सुर्वीणीच्या पोटचे असते तर असा सिनेमा ती दाखवती काय रोजच्या रोज ? सोदी मेली !"

सुर्वीण मासळी एकदम फर्मास शिजवायची. पोरांची पंगत प्रथम व्हायची. पोरं वचावचा करीत जेवायची. जेवणारांनी पानं लख्ख केली पाहिजेत असा सुर्वीणीचा कटाक्ष असायचा. कुणी काही टाकलं तर ते दुसऱ्याला खावं लागे. पोरंही गुपचूप खाऊन परत कंदिलाभोवती पुस्तकं घेऊन बसत.

नंतर सुर्वे-सुर्वीणीची अंगत-पंगत होई. सुर्व्यांच्या पानात मासळीचे दोन कपटे जास्त पडत. सुर्वे त्या फोडी न चुकता परत उचलून सुर्वीणीच्या ताटात टाकत. सुर्वीण "नको–नको" म्हणे. तरीही सुर्वे बळेच तिला खायला लावीत. म्हणत, "हिंदळेकरांना मासळी नको असं कधी झालंय ?" सुर्वीण फुरंगटल्याचा अभिनय करून मुद्दामच सुर्व्यांनी उष्टावलेला तांब्या तोंडाला लावे. सुर्व्यांना धन्य धन्य होई. मध्येच पाठ ताठ करीत ऐकवीत,

"आज साहेबाला जाम करून टाकलं !"

"अगोबाई !" सुर्वीण थक्क होऊन म्हणे.

"मग काय डरतोय की काय ? युनियनवाल्यांना घेऊन सरळ साहेबाकडे गेलो नि विचारलां, " ह्या गरीबांचे पगार वाढवणार की नाय त्याचा खुलासा द्या. नायतर आम्ही समदेजण चाललो संपावर ! बस्स."

"संभाळून करा हां कायतां." सुर्वीणीचा आवाज कातर होई.

"आमी देवबागकर सुर्वे असाच सामना करणारे. आठ दिवसांत जबाबी तो असां झक्कत सांगायला लावलां साहेबाला तेव्हांच बाहेर पडलो. हां; युनियनचा कचका काय असतो त्याची याद येईल साहेबाला."

कधी कधी फॉर्मात असले की सुर्वे सांगायचे,

"आज नाय उद्या आमचां कामवाल्यांचा नि गरीबांचाच राज्य होणार. तिकडे पार लंडनला रशिया नावाचा मोठ्ठा गाव आहे तिथे असांच गरीबांचा राज्य चाललांय. राजा पण गरीब आणि प्रजा पण गरीब ! सगळ्यांचे पगार सारखे. सगळ्यांनी सारखाच खायचां प्यायचां. सोंवळां-ओवळां काय नाय. सगळ्यांनी काम करायचां नि भावाभावांसारखा राहायचां. सगळ्यांची सगळी पोरां राजाच्या मालकीची. राजाच त्यांना शिकवणार. मनाशी यईल तिच्याशी सोयरीक करायला तुम्ही मोकळे ! हा पायजे तर हा. ही पायज तर ही. सगळां काम खुल्लं खुल्ला."

"खरां की काय ?"

"मग ?कामकऱ्यांचे राज्य ना ते ? तिथे सगळा खुषीचा मामला. कंटाळा आला, वांधा झाला की सोयरीक मोडून नवी सोयरीक करायची. नवऱ्याची माघारणीवर मालकी नाय की माघारणीची नवऱ्यावर जबरदस्ती नाय. ज्याला जसां मनाला येईल तसा त्यान वागायचा. बरीक राजाच्या विरुद्ध कुणी काय कारस्थान रचलान् रे रचलान् की तिथल्या तिथे त्याचा गोळी घालून मुडदा ! तिथे अपिल नाय. राजावर प्रेम ह्यां केलाच पायजे."

सुर्वीण हे अगदी मन लावून ऐके.

जेवणं उरकल्यावर सुर्वे पानाचा पितळेचा डबा पुढे ओढीत. जेष्टीमधवाला सुरेख विडा करून तो सुर्वीणीसाठी ठेवीत. सुपारीचं

**" .... तां तकडे कोणीतरी राजीखुषीनं नवरानवरीसारखा ऱ्हायचा, नि मज्जा करायची हे खरां असां काय ? सगळो खुषीचा वेव्हार असतला तर मज्जा अशा गावांत ऱ्हवाक, नाय मा ?.... " सुर्वीण विचारी.**









अनुक्रमणिका

पाव खांड त्यांना स्वत:ला पुरे. ते तोंडात विरघळण्यच्या आत ज्ञातीच्या फंडाचं लेजर घेऊन, केसाला पोमेड लावलेला कोचरेकर हजर होई. सफेत लेंग्याशर्टातला, गुळगुळीत दाढी घोटलेला कोचरेकर पांढऱ्या फेटचावर निळंकाळं पीस शोभून दिसावं, तसा हसताना दिसे. खिळयाला अडकवलेली बत्ती सुर्वे खाली काढीत आणि तिच्या समोर लेजर उघडून बसत. एकाग्र चित्ताने बेरजा मारू लागत. मधूनच म्हणत, "काय समजलेत कोचरेकर, ही संस्था आपुन अशी करून दाखवूया की शेणव्यांच्या नि ब्राह्मणांच्या सभा झक् मारतात !" विडीचे दोन झुरके मारण्यासाठी सुर्वे मध्येच कवजाचे खिसे चाचपडत. कोचरेकर लख्ख पांढरी सिगरेट त्यांच्यापुढे करत. तिचे दिलखुलास झुरके मारीत सुर्वे पुन्हा हिशोबांच्या वह्यांमधली ज्ञातीबांधवांची खरकटी उरकण्यात दंग होत.

बत्तीच्या प्रकाशात नेम धरून बसलेले कोचरेकर सुर्वीणीकडे बघत तरणं हसत. सुर्वीण पुढे येऊन बसे. म्हणे,

"ह्यांका जगाचां कल्याण तितक्या दिसतां. आपल्या मानसांवेरोवर चार गोष्टी करूक नको. ह्यांका शिकवा तरी."

"सगळयांनी गप्पा करून कसां चालणार ? काहींनी पुढारीपण ह्यां केलांच पाहीजे. खरां की खोटां ? नायतर सगळेच मागे पडणार." सुर्वे कोंबड्यासारखी मान उंचावून सांगत.

"पण युनियनचा पुढारीपण पुरां नाय झाला ?"



"आता आम्ही अशी पुढारपणां करीतचं झिजायचें !"

"ह्यांच्याविगर पान हालायचां नाय कुठलां! हे वर्षी तर सुर्वेशेठना आम्ही वारूळकर ग्रामस्थ सोसायटीचे पण प्रेसिडेन्ट करणार. तुम्ही नाय म्हणता कामा नये." कोचरेकर किल्ली मारे.

"हे ढींग नाय म्हणतले; पण तुमी ह्यांका सोडतलास ? कोचरेकर असास; कुणाक हार नाय जातलास !"

सुर्वीणीची प्रशस्ती खतावणीत डोकं घालून बसलेल्या सुर्व्यांच्या काळजाला भिडे. नजर वर न करता ते गालातल्या गालात हसत. पुढे येऊन बसलेली सुर्वीण कोचरेकराबरोबर गोड हसे. डोळे फुलांसारखे विस्फारी. कंदिलाभोवती चोपड्या चाळीत बसलेल्या पोरांना ते तसलं हसणं दिसलं की त्यांच्या कपाळाला आठी पडे.

"ह्यांका चोपड्यो तपासूक अर्धो कल्लाक तरी लगात. तितक्यात आपुन लाडीसचो एक डाव तरी टाकूया." सुर्वीण सुचवी. सुर्वे नि:शब्द चुळबूळ करीत.

"दोघात लाडीस काय खेळणार ?" कोचरेकर म्हणे.

कंदिलाभोवतालच्या पाच पोरांपैकी दोन भिडू तरी मिळतील काय ते सुर्वीण अजमावून पाही. पाचही पोरांचे संत्रस्त चेहरे पाहून विषय सोडी. कोचरेकराला हसत विचारी,

"आयतवारी खंयचो सिनेमा बघतलास ?"

"आपल्याला काय, नाचगानेवाला कुठलावी चालतो."

"मजा असां तुमची ! ह्यांका तरी शिकवा तुम्ही मजा कशी करूंची ती."

सुर्वे वह्यात बुडून रहात. कोचरेकर त्यांना तसेच बुडलेले ठेवत. कोचरेकराशी डोळयांनी हसत सुर्वीण गौरीसारखी बसून राही. कधी कधी कंदिलाच्या प्रकाशातलं तिचं हसरं स्थिर रूप पालटताना कोचरेकराला दिसे. अचानक ती चांदीचा मुखवटा घातलेल्या देवीसारखी एकटक नजरेने रोखून पाहू लागे. मग नजर भिडवणं कोचरेकराला अशक्य होई. कधी कधी ती स्थिर, टोकदार नजर त्याच्या अंगाला पायलीभर घाम फोडे. तो मुक्काम आवरे. दुसऱ्या दिवशी येण्याचं कबूल करून घाईघाईने निसटे. सुर्व्यांना हलकं वाटे.

"आता पुरे करां तुमचां." सुर्वीण सांगे. सुर्वे लेजर मिटून ठेवत. कंदिलासभोवतीची पाचही पोरं सुटकेचा निश्वास टाकून झोपण्यासाठी आडवी होत.

सुर्वीण आटपाआटप करी. दत्ताच्या तसबिरीसमोर हातपाय धुवून उभे राहीलेले थकलेले सुर्वे हळूहळू टाळया वाजवीत एकट्यानेच भजन म्हणत,

तो हा दत्त चिद्घन आला रे
नेटें भक्तांच्या अनुसूयाविचा पुत्र त्रैमूर्ति झाला रे
पायीं पादुका शोभति ज्याच्या, कंठी रुद्राक्ष माला रे
कापायांवर धारी तुंबर, नारद गाती ज्याला रे









[अनुक्रमणिका]








औदुंबरी वास रक्षी भक्तांस, जो वश गायनाला रे
तारक भवहारक सुखकारक हा जिवाला रे
श्रीविष्णु गुरुच्या कृपें कृष्ण जगन्नाथ निवाला रे
तो हा दत्त चिद्घन आला रे

एका लांबलचक जाजमावर पाचही गोळे रांगेने निजवून झाले की चिमणी मालवली जाई. वाम लावून सुर्वे कानशीलं चोळीत. पोरांच्या निजेसा कानोसा घेऊन सुर्वीण पडल्या पडल्या दवलेल्या आवाजात विचारी,

"तुम्ही तां मगाशी म्हणलांस तां खरा ?"

"काय म्हणालो मी ?"

"तीं तकडे कोणीतरी राजीखुषीनं नवरानवरीसारख्या रव्हा-यचा, नि मजा करायची ?"

"आहेसां म्हणतात वापडे."

"सगळो खुंपीचो वेव्हार असतला, तर मज्जा अशा गावांत न्हवाक ! नाय मा ?"

ह्यावर सुर्व्यांकडे उत्तर नसे. थंड स्वरात ते सांगत,

"माझी पाठ उसवल्याय. जरा निळगिरीचां वोट लाव बघू."

कधी कधी बराच वेळ निघून गेल्यावर सुर्वीण चोरट्या आवाजात सांगे,

"कोपऱ्यावरच्या वाण्णिणीकडे त्यांचो गुरु इलो होतो. त्या गुरुक म्हणतत नागव्यान् जेऊंक घालुचा लागतां !"

"म्हणतात खरां."

"खरांच असतलां. गुरु इलो नि वाण्णिणीन् अर्धो कल्लाक दारांखिडक्यो ओड करून घेतल्यान."

सुर्वीणीचं असलं दबक्या आवाजातलं हसत बोलणं बराच वेळ चालत राही. काळोखात अंग घुसळत राही. कधी कधी अनावर हसण्याचा आवाज हळूहळू वाढू लागे. वाढता वाढता घुमटीत मंत्र घुमावा, तसा काळोखात घुमायला लागे. सगळी खोलीच सुर्वी-णीच्या फिदीफिदी हसण्याने उचंबळून जाई. सुर्वे कावरेबावरे होत. हसण्याच्या लाटा हटण्याची वाट बघत बसत.

वलयदार हसणं पार आटोक्याबाहेर गेलं की गोंधळलेले सुर्वे चिमणी पेटवत. कोपऱ्यातला नारळ उचलून त्याच्यावर पिंजरेचं बोट टेकत. नंतर अंथरूणात डोळे मिटून हसत, घुसळत पडलेल्या सुर्वीणीच्या अंगावरून तो नारळ तीन वेळा तोंडाने पुटपुटत उभा ओवाळत. मग शर्ट अडकवत. टोपी घालत. आणि दाराला बाहेरून कडी घालून घऊन थेट समुद्रावर अनवाणी जात. तिथे वाळूची पिंडी करीत. तिच्या समोर नारळ ठेवीत. वेतोबाला लांबलचक गाऱ्हाणं घालत आणि गुडघाभर पाण्यात शिरून नारळ दूरवर झुगारून देत.

मध्य रात्री पेंगत पेंगत ते परत येत. तोपर्यंत थंड वाऱ्याच्या झुळका खाऊन खाऊन सुर्वीणीचा डोळा लागलेला असे आणि पाचही पोरं कानात बोटं घालून गार झोपलेली असत.

• • •



अनुक्रमणिका







# स्वप्नांच्या सावल्या

प्रौढपणांच्या
प्रेमाच्या
आविष्कारांचे
आगळे दर्शन घडविणारी
आजच्या तरुण पिढीचे
श्रेष्ठ लेखक

**जयवंत दळवी**

यांची
वेगळ्या धर्तीची
कादंबरिका



अनुक्रमणिका

# [ १ ]

स्टेशन जवळ आलं. गाडीचा वेग मंदावला. तसे बाबूराव आणखीनच अस्वस्थ झाले. ठिसूळ झालेल्या हाडांना आतनं कंप सुटावा तसं त्यांना वाटलं. एकाच जागी बसून आणि झोपून त्यांचे सगळे स्नायू आंबले होते. दोन्ही बाजूंना वळून कण्याला दोन हिसके द्यावेत असं त्यांना सारखं वाटत होतं. पण धीर होत नव्हता. सांध्यातनं प्रत्येक हाड निखळून पडेल अशी भीती वाटत होती. त्यांच्या अंगात आणि मनात कसलाच त्राण उरला नव्हता. स्वतःवरचा विश्वासच पार उडून गेला होता.

पॅंट सडपातळ पोटावरनं कमरेपर्यन्त खाली घसरली होती. ती त्यांनी बसल्या-बसल्याच वर ओढली. पोटापाठीकडनं बाहेर आलेलं खमीस आत सारलं. आणि हाताच्या मुठीवर हनुवटी टेकवून ते तसेच बाहेर बघत बसून राहिले.

जीव जिगजिगला होता. रात्रभर झोप नव्हती. फर्स्ट क्लासचा डबा. शिवाय खालचा बर्थ. शान्तपणे झोपायला कसलीच हरकत नव्हती. कदाचित सोबतीला नंदा असता तर झोप लागली असती; पण अगदी ऐन वेळेला त्याचं पत्र आलं.....रजा नाही. नागपूरला येता येत नाही. तुम्ही या. बोरीबंदरवर न्यायला येतो.....! पत्र वाचल्यापासूनच बाबूरावांचं चित्त विघडलं होतं. मुंबईला येणं त्यांना नेहमीचं नको वाटे. गेल्या पंचवीस तीस वर्षांत ते दोन-तीनदा मुंबईस आले होते. त्यावेळी त्यांची तब्येतही ठणठणीत होती. तरी सुद्धा एकाएकी शक्ती विरल्यासारखी होई. अशक्तपणा येई. आता तर प्रकृतीच पोखरली गेली होती. चार महिन्यांपूर्वीच त्यांना दुसरा हार्ट अ‍ॅटॅक आला होता. इंद्रियांवरला ताबा उडाला होता. संडासाची आतनं कडी लावताना सुद्धा भीती वाटत होती. कळ आली आणि जीव गेला तर आठ दहा तास कुणाला कळायचं सुद्धा नाही!

रात्री थर्मासमधलं एक कप दूध पिऊन ते बर्थवर आडवे झाले. रग छातीवर ओढला, तर त्यांना छातीवर दाब आल्या-सारखं वाटलं. त्यांनी तो रग छातीवरनं पोटावर ओढला तेव्हा त्यांना बरं वाटलं. पण झोप आली नाही....नंदानं सोबत यायला हवं होतं. दोनदा अ‍ॅटॅक आला होता. दुसरा अ‍ॅटॅक येऊन चार महिने झाले म्हणून काय झालं? माणसाचं काय सांगता येतं?... पण अलिकडली पोरं! आई-बापाचं काही सुद्धा नाही! सावित्री हयात असती तर सोबत झाली असती!.....वेळ आली की माणूस मरणार हे खरं! पण मरताना तरी आपलं माणूस जवळ हवं! जीव जाता जाता काही बोलायचं झालं तर निदान ते ऐकायला तरी.....! गिधाडाच्या जड सावलीसारखा तो एक विचार पुनः पुनः त्यांच्या डोक्यावरनं झाकळून जात होता.

चुकून छातीवर राहिलेली हातांची घडी त्यांनी पोटावर ठेवली आणि नुसते डोळे मिटून ते रात्रभर पडून राहिले.

शेजारचा ढेरपोट्या माणूस भयानक घोरत होता. त्याचा त्यांना खूप संताप आला. थेट साठी उलटून गेलेला माणूस! रात्री जेवणाचा डबा उघडून बसला. चक्क चौघाना पुरेल इतकं सुकं मटण खाल्लं, पुऱ्या खाल्ल्या. चार पुऱ्या आणि पसाभर मटण त्यानं बाबूरावांना देऊ केलं. नो, थॅंक्स म्हणताना त्यांच्या जिवावर आलं. खूप दिवस झाले, असलं खाणं त्यांनी खाल्लं नव्हतं. पण इलाज नव्हता. त्यांना तेलकट, तुपकट काही खायचं नव्हतं. दिवसचे दिवस दोन फुलके आणि फक्त उकडलेली पालेभाजी. तीत धड मीठ सुद्धा नाही. सगळं कोरड्या तोंडानं चावायचं, चघळायचं....सावित्री असती तर तिनं ते तेवढे दोन फुलके जरा लुसलुशीत तरी केले असते!



थर्मासमधलं दूध पिताना ते त्या ढेरपोट्याला बघत राहिले. चोरानं मोजून चौदा पुऱ्या खाल्ल्या. तासभर नळ्या चोखल्या. बाबूरावांच्या तोंडाला पाणी सुटलं. त्यामुळे खूप दिवसांनी दुधाला तरी थोडी चव आली.

डॉक्टर म्हणतात, अंग सुटलं म्हणून हार्ट अ‍ॅटॅक आला! मग या ढेरपोट्याला कां नाही अ‍ॅटॅक आला? त्याची साठी उलटून गली होती! आणि आपल्याला मात्र छपन्नाव्या वर्षीच सिव्हीयर अ‍ॅटॅक! मरता मरता पुनर्जन्म.....! सावित्री आधी सुटली. नाही तर आपल्या नवऱ्याची स्थिती बघून ती अर्धमेली झाली असती; पण सुटली!

ढेरपोट्याच्या घोरण्यानं त्यांना संताप येत होता. आपण संतापता नये, डोकं थंड ठेवायला हवं, ते पुनः पुनः स्वतःला बजा-वीत होते; पण आपण जागे, तो ठार झोपतो आणि पुनः वर घोरतो हे त्यांना सहन होत नव्हतं! मुद्दाम घोरून तो त्यांना खिजवतो आहे असं त्यांना सारखं वाटत होतं!

डोळे मिटून ते तसेच पडून राहिले. पलिकडल्या बर्थवर सावित्री असती तर आपण शान्त चित्तानं झोपलो असतो, कदा-चित घोरलो सुद्धा असतो असं त्यांना पुनः पुनः वाटलं. झोप आली नसती तर उठून बसलो असतो. सावित्रीला हाक मारली असती. तीही उठून बसली असती. शेजारी आली असती. नंदाचं लग्न ठरलंय. लग्नासंबंधी बोललो असतो. आपले कुठले दागिने

मोडायचे, कुठले नवीन करायचे, किती तोळे सोनं घ्यायचं, सुनेला काय काय करायचं... ती खूप खूप बोलली असती.. बोलता बोलता रात्र कधी गेली ते कळलं सुद्धा नसतं !

ते नशिबात नाही. त्याऐवजी हा माणूस उताणा पडून ढराढर घोरतोय्....! एकदा तर संतापानं ते उठून बसले. त्यांना वाटलं, याला चांगलं हालवावं. जागं करावं. आणि सांगावं– मिस्टर, धिस् इज नॉट अलौड...हे चालायचं नाही.....यू आर डिस्टरबिंग....पण त्यानं तोंडात मारलं तर त्याच्याशी मारामारी कोण करणार? पूर्वीचे दिवस राहिले नाहीत....हात उगारला तर तो हृदय बंद पडल्यामुळे गळून खाली पडायचा !

त्याचं भेसूर घोरणं ऐकण्यात रात्र गेली. डोळ्याला डोळा लागला नाही. शान्त झोपेसाठी जीव नुसता तळमळत राहिला.

थोडं उजाडलं का पाहाण्यासाठी त्यांनी डोळे उघडले. ढेरपोटया बर्थवर नव्हता. पहाटेच कधी तरी तो कुठल्या तरी स्टेशनवर उतरला होता. बाबूरावांना कळलं सुद्धा नाही. पण तेवढा वेळ तरी झोप लागली होती हे त्यांच्या मनानं मानलं नाही. त्याच्या घोरण्यामुळे रात्रभर झोप लागली नाही हे ते मनातल्या मनात घोकत राहिले.

गाडी स्टेशनच्या जवळ आली. दोन्ही बाजूंच्या इमारती पाहाता पाहाता त्यांच्या लक्षात आलं. चौवेचाळीस साली गोदीत स्फोट झाला तेव्हा या इमारती कोसळल्या होत्या. मुंबई सोडून नागपूरला जाताना ते भयानक दृश्य दिसलं होतं. बरोबर सावित्री होती. गाडीतनं जाता जाता दोन्ही बाजूना झालेला विध्वंस बघत तिनं छातीवर हात घेतले होते. तिचं तोंड आपोआप उघडं पडलं होतं. त्यावेळी तिच्या पोटात नंदा होता. अवघे तीन महिनेच झाले होते......आता सारं डागडुजीनं पुन: उभं झालं होतं !

धन्य ही गायनी कळा !!

DONGRE

"दीप"

पण आता बरोबर सावित्री नव्हती. नंदानं आपणच आपलं लग्न ठरवलं होतं. तिला बघायला सावित्री उत्सुक झाली असती. तिनं नंदाला असं परस्पर लग्न ठरवायला दिलं नसतं. हेमाला बघायला ती नागपूरहून मुंबईला आली असती. तिनं पसंतीचा शिक्का मारल्याशिवाय काही झालं नसतं. फोटोत हेमा बरी दिसते; पण आई-बापानं पुढाकार घेऊन सारं केलं की त्याला शोभा असते. मुंबईत साखरपुडा झाला. बाप हजर नाही. सावित्री असती तर कसली अंगठी विकत घ्यावी इथपासून तिनं सगळ्या गोष्टीत लक्ष घातलं असतं. आता उद्या त्याचं लग्न करायचं तर बरोबर सुपारी घेऊन !

साखरपुड्याची तारीख सुद्धा लक्षात नव्हती. दुसरे दिवशी टाईम्समध्ये एंगेजमेंटच्या जाहिरातीत वाचलं. नंदा एंगेज झाला. त्याच्याच खाली डेथ कॉलममध्ये आप्पा रांगणेकर मेल्याची बातमी. ती बातमी वाचून त्यांना बरं वाटलं होतं! तरी खूप उशिरा मेला. हा भामटा यापूर्वीच मरायला हवा होता असंही त्यावेळी त्यांना वाटलं होतं.

एकदम साबट आलं. तेव्हा बाबूरावांच्या लक्षात आलं की गाडी स्टेशनात शिरली. त्यांची छाती धडधडली. नंदा आला नाही तर काय करायचं ! ठाकुरद्वारचा पत्ता माहीत होता. पण सगळं सामान बरोबर घेउन बिल्डींग कुठं शोधत बसणार? एका क्षणी वाटलं, खिडकीतनं डोकावून पाहावं, नंदा कुठं दिसतोय् का? ते उठणार होते. पण उठले नाहीत. आपण मुलावर फार अवलंबून आहे असं नंदाला वाटायला नको. ते तसेच बसून राहिले. तेवढ्यात त्यांच्या लक्षात आलं, अजून त्यांनी दात लावले नव्हते. शेजारचा डबा उचलून त्यांनी कवळ्या तोंडात बसवल्या. डब्यातलं पाणी बाहेर फेकलं. आणि डबा पिशवीत टाकून ते स्वस्थ बसून राहिले. खिडकीकडे तोंड वळवून त्यांनी फलाटाकडे सुद्धा पाहिलं नाही.

गाडी स्थिर झाली. लाल डगलेवाले हमाल डब्यात घुसले. तेवढ्यात नंदाही आला. त्यानं बाबूरावांच्या पायांना वाकून स्पर्श केला. बाबूरावांना जरा बरं वाटलं. पण त्यांच्या मानेतला ताठरपणा अद्याप कायम होता. ते फलाटावर उतरले. तिथं हेमा उभी होती. फोटोवरनं बाबूरावांनी तिला बरोबर ओळखलं. पण तसं दाखवलं नाही. हेमानं ओणव्यानं नमस्कार केला. काकणांचा आवाज त्यांना गोड वाटला. त्यांनी तिला कुशीत घेतली आणि डोक्यावरनं हात फिरवीत तिचे उडणारे केस नीट केले. फलाटावरनं जाणारे लोक, विशेषत: बायका वळून बघत होत्या. ते बघून बाबूरावांना थोडं बरं वाटलं.

नागपूरला हेमाचा फोटो त्यांनी पाहिला, तेव्हाच त्यांना नंदाची निवड आवडली होती. प्रत्यक्षात त्यांना ती अतिशय आवडली. विशेषत: तिचा अंबाडा. अंबाड्यावर गजरा होता फुलांचा. केसांना

पिंगट झाक होती. शिवाय केस विपुल होते. त्यामुळे अंबाडा छान दिसत होता. नेसणं पाच वारी असलं, पोट थोडं उघडं असलं, तरी नोकझोक अतिरेकी नव्हता. त्यांना हे सगळं आवडलं. नंदा नशिबवान आहे, त्याला प्रथमच आवडलेल्या मुलीशी लग्न ठरवता आलं, या विचारानं ते काहीसे मनातल्या मनात सुखावले. अशी सून आपल्या भोवती असणार, फुलके करणार, पालेभाजी करणार, जेवणाला नवी चव येणार....या विचारानं त्यांना थोडी तरारी आली. रात्री दातांच्या कवळचा धुवून त्या पाण्यात घालून ठेवायचं काम हिला नेमून दिलं पाहिजे असाही विचार त्यांच्या मनात येऊन गेला. नागपूरचा आचारी हे काम मुद्दाम टाळायचा.

नंदानं सामान चढवलं आणि टॅक्सीचा दरवाजा उघडला. बाबूरावांनी आधी हेमाला बसवलं. नंतर त्यांनी नंदाचा हात ओढला. पण नंदा बसला नाही. त्यांनी "तुम्ही बसा–" असं सांगून बाबूरावांना बसवलं. मग तो बसला. बाबूरावांनी आपले दोन्ही हात दोघांच्या पाठीवर पसरले आणि ते नीट टेकून बसले.

बराच वेळ ते स्वस्थ बसले. आणि मध्येच एकदम म्हणाले,

"नंद्या, आय् मस्ट कॉंग्रॅच्युलेट यू––"

"कां?" नंदाला कल्पना आली नाही.

"पोरगी फार सुरेख निवडली आहेस....आय् ॲम रिअली ग्लॅड.........!"

नंदा आणि हेमा–दोघंही एकदम लाजली. त्यांच्या माना खाली वळल्या.

त्या लाजवट चेहऱ्याकडे पाहाता पाहाता बाबूरावांना खरं बरं वाटलं. पण थोडसं हुरहुरल्यासारखंही झालं. असा लाजण्याचा प्रसंग आपल्या आयुष्यात कधी आला नाही याची त्यांना जाणीव झाली. मनासारखी मुलगी मिळवता आली नाही. त्यांनी खूप लांब श्वास घेतला आणि तो पूर्ण करून सोडला. त्यांना एकदम हलकं वाटलं. असा पूर्ण श्वास टाकता आला की त्यांना बरं वाटायचं.

"हिचे वडील काय करतात?"

"एल्. आय्. सी. मध्ये आहेत–माझ्याच ऑफिसात...." नंदा म्हणाला.

"हो...हो! तू म्हणाला होतास. भावंडं किती?"

"एक धाकटा भाऊ आहे, सोळा वर्षाचा––" हेमा म्हणाली.

"आई?"

"सावत्र आहे." चटकन् नंदाच बोलला.

"त्रास देते ना?" असं विचारीत बाबूराव हसले आणि त्यांनी हलकेच हेमाचा खांदा दाबला. हेमा पटकन् हसली.

"नाही. फार छान आहे. कुणाला खरं वाटत नाही. सावत्र आहे हे सांगावं लागतं. आम्हाला तिनं कधी जाणवू सुद्धा दिलं नाही."

"अस्सं?"

"ती दिसते सुद्धा हेमासारखी!" नंदा आपल्याशीच हसला.

"दुसरं लग्न कधी केलं?"

"मी सहा वर्षाची होते."



**धबधबा व कारंजे**



अध:पात उत्पाताचे हे त्रैराशिक रोकडे
लिंगप्प्या आदळे खालती गिरिसप्पा वर उडे
उलटी वाहे आता गंगा, चढे गिरीच्या शिरी
जोग जोगवा मागत फिरता उडे फवारा वरी
जगजीवन गीत संजीवन दे बसता धरुनी दवा
कोसळला धबधबा वाढला दिल्लीचा दबदबा.

— कोंडबा



"तुझ्या वडिलांचं वय किती आहे?"

हेमा गोंधळून गप्प राहिली. तिला अण्णांचं वय ठाऊक नव्हतं. तिनं मान वाकडी करून नंदाकडे पाहिलं.

नंदा म्हणाला, "असेल बावनेक......."

ठाकुरद्वारला टॅक्सी थांबली. सामान उतरून घेईपर्यंत बाबूराव हेमाच्या वडिलांच्या वयाचा हिशोब करीत होते. हेमा बावीस वर्षाची आहे....सोळा वर्षापूर्वी वडिलांनी लग्न केलं...... त्यावेळी त्यांचं वय छत्तीस वर्षाचं होतं......आणि सावित्री गेली तेव्हां आपलं वय चाळीस वर्षाचं होतं. आपण पुन: लग्न केलं नाही की लग्न करायचं नव्हतं ?...पहिलं लग्न करायला तरी आपण कुठं उत्सुक होतो! .....आईनं हट्ट धरला म्हणून ते लग्न झालं! .....पण खरोखर दुर्गासाठी आपण आजन्म अविवाहित राहिलो असतो का?... विचार करता करता ते फेऱ्यात अडकले.

विचार करीतच ते आत आले. कदाचित् बराच वेळ ते त्या विचारात गुरफटले असते; पण लिफ्टकडे येताच त्यांना धक्का बसला. लिफ्ट बिघडली होती. एवढ्या लांबच्या प्रवासानंतर पुन: दोन जिने चढायचे. नुसत्या विचारातच ते गोठल्यासारखे झाले. हाताचा पंजा छातीवर पसरून ते गप्प उभे राहिले.

**[ २ ]**

* *

बराच वेळ झाला. बाबूराव खाटेवर पडून राहिले. दोन जिने चढण्याचा तसा त्यांना फार त्रास झाला नव्हता. पण जिने चढता चढता दम लागेल, श्वास कोंडेल, पूर्ण श्वास घेणं जमणार नाही, मग कळ येईल या भीतीनंच ते खंगले होते. हेमानं गरमागरम चहा करून दिला. तो ते प्याले. पण हेमानं चहात साखर घातली होती. ते आधी सांगायला विसरले होते. पुन: दुसरा चहा करायला सांगणं बरं दिसत नाही म्हणून प्याले. अशा वेळी सावित्री हवी होती. आपल्या हक्काच्या माणसाला काय हवं ते सांगता येतं. मुलगा काय, सून काय...ही हक्काची माणसं नव्हेत. खरं हक्काचं माणूस म्हणजे आपली बायको. उगाच नाही हेमाच्या वडिलांनी पुन: लग्न केलं!

त्यातल्या त्यात त्यांना एका गोष्टीचा आनंद झाला. हेमा कष्टाळू दिसली. पदर खोचून तिनं सगळं सामान मांडून ठेवलं. आंघोळीसाठी पाणी तापवलं. इतकंच नव्हे, तर दातांचा डबा स्वच्छ घासून, त्यात पाणी घालून तो बाबूरावांच्या उशीपाशी आणून ठेवला.

"वा:! सगळी माहिती दिसत्येय—"

"अण्णांचे सुद्धा लावलेलेच दात आहेत!"

असं म्हणून ती तरतर चालीनं आत गेली. तिच्या काकणांचा आवाज बाबूरावांच्या कानांना भुरळ पाडीत होता. दुर्गाची आठवण करून देत होता. दुर्गा सुद्धा अशीच सुंदर होती. अशीच उंच. पण बांध्यानं थोडी अधिक स्थूल होती. त्या काळात फॉर्म टिकवण्याची कल्पनाहि नव्हती. अशीच बांगड्या वाजवीत फिरायची. पदर खोचून कामात दंग असायची.

आंघोळ केल्यावर त्यांना अधिक बरं वाटलं. धोतराच्या निऱ्या काढीत असताना एक नोकर डबा घेऊन आला.

"कुठल्या खाणावळीतनं आणतोस?"

"खाणावळीतनं नाही."

"मग?"

"हेमाच्या घरून येतो."

"रोज?"

"होय!"

"पूर्वी पलिकडल्या बोरभाट गल्लीत शाणूची खाणावळ होती. आता उठलीही असेल. मी शाळेत आणि कॉलेजात होतो तेव्हा तिथं जेवत होतो. महिन्याला अकरा रुपये. भरपूर जेवण!"

"आता सत्तर सत्तर रुपये द्यावे लागतात."

"सगळंच बदलून गेलंय्....खाणावळीचं तरी रोजच्या रोज कुठं जेववतं? कंटाळा आला की......" बाबूराव एकदम बोलायचे थांबले. कंटाळा आला खाणावळीच्या जेवणाचा की दुर्गाची आई आग्रहानं जेवायला वाढायची. पोटाला तडस लागेपर्यंत. दोन दोन दिवस हाताला मासळीच्या आमटीचा वास यायचा. अंबोळ्या करायची. आणि बटाटे घालून कोलंबीचं मसाल्याचं धबधबीत! ...नंतर सावित्रीनं खूपदा केलं; पण ती सर आली नाही....खूप बटाटे खाल्ले... आता बटाटा सुटला......!

जेवण झाल्यानंतर बाबूरावांनी खोलीतल्या खोलीत मोजून पंधरा फेऱ्या मारल्या. हेमाच्या घरचं जेवण रुचकर होतं. पण घडीच्या चपात्या. तूप फासलेल्या. दुसऱ्यांना आपण

सांगायचं? विनतुपाचे फुलके पाठवा म्हणून! दोनाऐवजी एकच चपाती खाऊन ते उठले होते. नंदाचं लग्न होईपर्यंत हे असंच रेटलं पाहिजे, मग हेमा करील—असा विचार करीत ते खोलीतल्या खोलीत फिरले. आणि मग बाल्कनीत येऊन त्यांनी थोडा वेळ विचार केला, आणि नंदाला हाक मारली.

"अरे नंदा......"

"आं?"

"ही कुणाची प्रॉपर्टी?"

"आमच्या ऑफिसची! एल्. आय्. सी. ची!"

ते क्षणभर विचारात मग्न झाले.

—ही पूर्वीची सॉलिसिटर साखरदांडेंची प्रॉपर्टी असली पाहिजे. आता इथं खूप बदल झालाय. पण साखरदांडेंचीच प्रॉपर्टी ही असं ते मनातल्या मनात बोलले.

"इथं डावीकडे पोस्ट ऑफिस आहे ना?"...आणि पलिकडे रामाचं देऊळ?"

"हो!"

"छान बैठं घर होतं इथं. इथल्या ओटचावर रामनवमीला पसापसाभर सुंठवडा खाल्लाय!"

हिरव्या-तांबड्या लाद्यांतले सफेत ठिपके बघत बाबूराव गप्प राहिले.

"पूर्वी म्हणे इथं ट्रामचा खडखडाट असायचा—"

"माहीत आहे." असं म्हणून ते गुदगुल्या झाल्यासारखे तोंडातल्या तोंडात हसले.

चाळीसेक वर्षं झाली. बाबूराव विल्सन हायस्कूलात शिकत होते. त्यावेळी त्यांचा नेहमीचा छंद म्हणजे हाच! मॅट्रिकचा अभ्यास. कंटाळा आला की पँट चढवून बाहेर पडायचं. ऑपेरा हाऊसकडे ट्राम टर्मिनसवर थांबायचं. डबल डेकची ट्राम आली की वरच्या डेकवर चढून उजवीकडल्या खिडकीकडे बसायचं. ठाकुरद्वारचं नाकं सुटलं की काळजावर मुंग्या हुळहुळायच्या. खडबडीत भिंती आणि गोल खांब असलेली ती बैठी इमारत. देवळासारखी दिसायची. तळमजल्यावर मोठा ओटा होता. त्या ओटचावर गाद्या आणि लोड होते. त्या ओटचावरूनच माडीवर जायचा जिना होता. ट्राम-मधून जाताना जिन्याच्या खालच्या दोन पायऱ्या दिसायच्या. रस्त्याच्या कडेनं सहा फूट उंचीची सफेत भिंत होती. त्यामुळे रस्त्यानं जाताना किंवा एकमजली ट्राममधून त्या घराचा ओटा दिसत नसे. म्हणून दोनमजली ट्राम घ्यावी लागे. वरून घराचा ओटा दिसे. माडीवर खिडकीत कुणी उभं असलं तर नजरेस पडे. विशेषतः संध्याकाळी पाचाच्या सुमारास! त्यावेळी ओटचावर खांबाला टेकून दुर्गी उभी असायची. कधी वेणी घालत किंवा ताटातले तांदूळ निवडत. नऊ वारी पातळ नेसून. डावीकडे खांबाला कललेली. उजवा पाय डाव्यावर मोडलेला. अंबाड्यावर उंचशी वेणी. ती तशी दृष्टीस पडली की खूप बरं वाटायचं. मग मनातल्या मनात स्वप्नांचा गोफ विणण्यात दिवस जायचा.

एकदा ठाकुरद्वारच्या नाक्यावर एकटीच दिसली. घरी चालली होती. बाबूरावांनी चालत्या ट्राममधून खाली उडी टाकली. तिच्या समोर आले. तिच्याशी काही तरी बोलावं म्हणून त्यांनी धाडस करून विचारलं, "काळ्या रामाचं देऊळ कुठाय हो?"

दुर्दैवानं देऊळ समोरच होतं. देवळात जाणारे लोक घंटा वाजवीत होते.

तिनं फक्त समोर बोट दाखवलं आणि ती खाली मान घालून चालत राहिली. त्यामुळे तिच्याशी बोलण्याची संधीच हुकली. दुसरा कुठला तरी पत्ता विचारायला हवा होता. म्हणजे विचार करीत तरी थांबली असती; पण रामाच्या देवळासमोरच उभं राहून त्यांनी देवळाचाच पत्ता विचारायचा मूर्खपणा केला होता.

त्या आठवणीनं बाबूरावांना हसू आलं. ओठ मुडपीत ते गुपचुप हसले. ती घरी जाईपर्यंत आपण तिच्या मागनं मागनं रस्त्यावरून जात आहो असा त्यांना भास झाला. आणि तेवढ्या कल्पनेनेसुद्धा त्यांना दम लागला. त्यांनी पुनः एकदा पूर्ण श्वास घेतला आणि गळ्याकडून आवाज करीत सोडला. ते सगळं विसरण्यासाठी ते उठले आणि बाल्कनीचा कठडा धरून मागं पुढं फिरू लागले.

* *

## [ ३ ]

नागपूरहून आणलेल्या सगळ्या ट्रंका नंदानं कॉटखाली रेटून ठेवल्या होत्या. पाच पाच मिनिटं थांबून बाबूरावांनी एक एक ट्रंक बाहेर ओढून काढली. चिकित्सक शाळेचं एक जुनं मासिक त्यांना शोधून काढायचं होतं. खूप जुनं. सगळी पानं पंच्यासारखी पिवळी झाली होती. प्रत्येक ट्रंकेतलं सामान त्यांनी विस्कटलं. नंदा परत घरी येण्याच्या आधी त्यांना ते मासिक शोधायचं होतं. नाही-तर मग नंदा आल्यावर ट्रंका ओढल्या म्हणून चिडणार. शिवाय एवढं तावडतोबीनं ट्रंकेतलं काय हवं होतं ही चौकशी सुरू होणार. चिकित्सकचं जुनं मासिक शोधतोय हे त्याला कसं सांगायचं? एकतर त्याला ते खरं वाटलं नसतं. कदाचित हसलाही असता. तोच का? कुणीही हसला असता. साठीकडे आलेला म्हातारा कुठल्या तरी शाळेचं चाळीस वर्षांपूर्वीचं मासिक शोधतोय हे ऐकून कुणालाही हसूच आलं असतं.










मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






......अर्थात लोकशाहीचा खेळ (खंडोबा)






**आपले 'लोक'प्रिय आणि अद्भुत खेळ.....**






**धुमधडाक्याने सुरू............ अपूर्व संधी दवडू नका**




अनुक्रमणिका

त्यांना एकदम हसू आलं. हिरव्या ट्रंकेच्या तळाशी त्यांना ते मासिक सापडलं. पानं पापडासारखी मोडत होती. पण आर्ट पेपरवर छापलेली पानं मात्र शाबूत होती. मासिक चाळता चाळता त्यांची छाती जराशी धडधडली. त्यांनी मासिक उघडून धरलं आणि गुळगुळीत आर्ट पेपरवर आपले गाल घासले. त्यांनी हे असं पूर्वी अनेकदा केलं होतं. विशेषतः सावित्री माहेरी गेली की! आणि तिच्या मृत्यूनंतरही! बराच वेळ ते उघडलेलं मासिक हातात धरून ते तसेच जमिनीवर बसून राहिले.

त्या मासिकात दुर्गीचा छोटासा फोटो होता. शाळेत असताना तिनं कॅरमच्या टुर्नामेंटमध्ये बक्षीस मिळवलं होतं. फोटो तेवढासा बरा नव्हता. पुसट आला होता. पण तो बघता बघता त्यांना ती छबी अधिकाधिक ठळक दिसायची. फोटोच्या खाली नाव होतं–कुमारी कुसुमावती मनोहर साखरदांडे. तिचं नाव कुसुमावती. म्हणायचेत दुर्गी!



कॅरमसारख्या बैठ्या खेळात का होईना, कुसुमावतींनी प्रावीण्य मिळवले, बक्षीस मिळवले हे जरा नवलच होतं. तिनं कधीकाळी कशात प्रावीण्य मिळवलं असतं तर ते छानसा संसार करण्यात! तिनं घरकाम छान सांभाळलं असतं, स्वैपाक उत्तम केला असता. दर वर्षी एका मुलाला जन्म दिला असता. मुला-बाळांचं कौतुकाने संगोपन केलं असतं. पण खेळ . . . अभ्यास छे! कॅरममध्ये एकदा कधी चुकून पारितोषिक मिळालं तेवढंच. मॅट्रिकला दोनदा बसली आणि मग घरीच राहिली.

पण ती शिकत होती, तेव्हा कधी कधी आपली शाळा चुकवून बाबूराव सायंकाळी साडे चार वाजता चिकित्सकसमोर येऊन उभे राहायचे. शाळा सुटली की, मुला-मुलींच्या घोळक्यातून कुसुमावती डुलत डुलत यायची. नऊ वारी नेसणारी अशी तीच एकटी दिसायची. ती दिसली की त्यांचा ऊर धपापत राहायचा. तिनं मान वर उचलून आपल्याकडे पहावं असं त्यांना खूप वाटायचं. पण तसं कधीच घडलं नाही. तिच्या मागोमाग तिचा थोरला भाऊ यायचा. बाहेर चपट्या बॉनेटची मोटर उभी असायची. कधी कधी मोटरीत तिची स्थूल अंगाची लालबुंद गोरी आई बसलेली असायची. जाड काचांचा चष्मा नाकावर ठेवून! बाहेर उभा असलेला ड्रायव्हर दरवाजा उघडायचा. कुसुमावती आणि तिचा भाऊ पटकन् मोटरीत बसायचे. झटकन् मोटर निघून जायची. बीएमेस् ४०४२! अजून तो नंबर त्यांच्या लक्षात होता. बाबूराव अनेकदा त्या मोटरीवरून हात फिरवायचे. कधी कधी मोटरीच्या डिकीवरल्या धुळीच्या थरावर ते बोट फिरवायचे आणि त्यावर विश्वास सबनीस असं आपलं नाव कोरायचे. एक वेड!

असं वर्षभर झालं!

बाबूराव मॅट्रिक झाले. विल्सन हायस्कूलमधून ते विल्सन कॉलेजमध्ये गेले. तिथं फर्स्ट ईयरच्या वर्गात कुसुमावतीचा भाऊ दिसला तेव्हा बाबूरावांच्या आनंदाला पारावार राहिला नाही. मुद्दाम त्यांनी मंगूशी दोस्ती केली. इतकी, की पुढं पुढं दोघांनाही एकमेकांशिवाय करमेनासं झालं. तो बाबूरावांच्या खोलीवर यायचा. बाबूराव त्याच्या घरी जायचे. अधिक करून बाबूरावच त्याच्या घरी जायचे. मंगूला अभ्यासासाठी स्वतंत्र खोली होती. त्या खोलीत बसून दोघेही अभ्यास करायचे. मंगूची आई–माई फार प्रेमळ होती. "बाबू, तू दर रविवारी सकाळी आमच्याकडे ये हं जेवायला. कसं तू रोजच्या रोज ते खाणावळीचं जेवण जेवतोस, परमेश्वर जाणे!" असं ती म्हणायची. त्यामुळे बाबूराव त्या घरात रूळून गेले होते. मंगूचा एक लांबचा आतेभाऊ मोरेश्वर नाडकर्णी तोही सारखा तिथंच असायचा. रविवारी जेवायला सुद्धा! बाबूराव मंगूकडे रोजच्या रोज येतात, रविवारी जेवतात हे मोरोबाला आवडत नसे आणि मोरोबा तिथं येतो, माईंना भाजी-मासळी आणून देतो हे बाबूरावांना आवडत नसे. पण बाबूरावांचं एकच सुख होतं. मोरोबा मॅट्रिकसुद्धा झाला नव्हता. दुर्गीच्याच शाळेत, पण तीन चार वर्षं पुढं होता. तीन चारदा मॅट्रिकला बसला. पण सुटला नाही. मोठमोठ्या उद्योग-








पतींची चरित्रं आणून वाचायचा. "धंद्याला शाळा-कॉलेजचं शिक्षण कशाला ? मी मोठा इंडस्ट्रिआलिस्ट होतो बघ ! सर जमशेठजी. मोफ़तलाल. लक्ष्मणराव किर्लोस्कर आणि शेठ मोरेश्वर नाडकर्णी. !" असं तो मिजाशीनं बोलायचा.

माई म्हणायच्या, "अरे मोरोबा, आज बाजारातून थोडी खाडीची कोलंबी आण हं. बाबूला मसाल्याचं धवधवीत करून घालते. त्याला फार आवडतं. आणि अंबोळ्या. !"

बाबूरावांच्या तोंडाला पाणी सुचायचं.

पण मोरोबा मुद्दाम हात हालवीत परत यायचा.

"अख्खा बाजार धुंडाळला. चिरा बाजारात गलो, ग्रांट रोडला गेलो. .कुठ्ठं म्हणून खाडीतली कोलंबी नाही !" असं म्हणायचा.

हे दुर्गीच्या सुद्धा बहुधा लक्षात आलं होतं. कारण एकदा ती म्हणाली, "तो जाळं घेऊन खाडीत सुद्धा जाऊन आला. पण तिथं सुद्धा कोलंबी नाही."

एकदा कोलंबी नाही असं मोरोबानं सांगताच बाबूराव गुपचुप बाजारात गेले आणि टपटप उडणारी हिरवीगार कोलंबी पिशवी भरून घेऊन आले.

ती बघून मोरोबाचा चेहरा पडला.

एकेक आठवण चित्ररूपानं बाबूरावांच्या चष्म्यावर उभी राहिली. काचेतली ती प्रतिबिंबं पाहात ते तसेच बसून राहिले. समोर ट्रंका उघड्या आहेत. आपण जमिनीवर पाय सोडून बसलो आहो. खाटेच्या कडेवर उघडं मासिक आहे. दुर्गीच्या फोटोवर गाल टेकून आपण पडलो आहो. . याचं त्यांना भानसुद्धा नव्हतं. उलट अर्धवट झोपेनं ते म्लान झाले होते.

झोपेत तोंडातनं लाळ गळावी तशी एक तार जिवणीच्या कडेतून सुटली आणि फोटोवर ठिबकली. बाबूराव एकदम जाग झाले. धोतराच्या कडेनं त्यांनी त्या मासिकातला गुळगुळीत फोटो पुसला. मासिक झरकन चाळलं. मध्येच कुणा पोराची एक कविता दिसली. ती त्यांनी वाचली. नागेश सुखठणकर नावाचा पोरगा. सहावी–ब. कोण कुठला पोरगा कोण जाणे ! कुणा अज्ञात पोरीला उद्देशून त्यानं आठ ओळी रचल्या होत्या. कुठला सुखठणकर. कुठली पोरगी. दुर्गी तर नव्हती, ना ? तो सुखठणकर आणि त्याची पोरगी. काय झालं असेल काळाच्या ओघात कोण जाणे ! लग्न झालं असेल. फिसकटलं असेल. . . पोरानं कदाचित आत्महत्या सुद्धा केली असेल. कुणाचं काही सांगता येत नाही !

मासिक बंद करून ते ट्रंकेत ठेवता ठेवता त्यांना आठवलं. इंटरमध्ये असताना त्यांनी कॉलेजच्या वार्षिकात एक दहा ओळींची कविता प्रसिद्ध केली होती. 'कुसुमांजलि' असं कवितेचं नाव होतं. प्रत्येक ओळीचं सुरवातीचं अक्षर घेतलं तर कु-सु-मा-व-ती सा-ख-र-दां-डे हे नांव पूर्ण होत होतं. शेवटली ओळ 'डेलियाची फुले फुलोत माझ्या मनी' अशी होती. ती ओळ अजूनही त्यांच्या लक्षात होती. प्रत्येक ओळीतलं पहिलं अक्षर जाड ठशात छापावं अशी सूचनाही त्यांनी दिली होती. पण तशी छपाई झाली नव्हती. मंगूनं कविता वाचली. एक अंक त्यांनी दुर्गीलासुद्धा दिला होता. पण त्यात त्यांची

कविता होती हे तिच्या लक्षातच आलं नव्हतं. मग मंगूकडनं त्यांनी तिला सांगायला लावलं. तेव्हा तिनं ती वाचली आणि आवडली म्हणून सांगितलं ! माईनंही वाचली. तिलाही ती आवडली. पण प्रत्येक ओळीच्या पहिल्या अक्षरातून कु-सु-मा-व-ती सा-ख-र-दां-डे हे नांव तयार होत होतं हे कुणाच्याच लक्षात आलं नाही. मंगूच्या सुद्धा नाही. भीतीपोटी बाबूरावांनीही ते कुणाच्या लक्षात आणून दिलं नाही. पुढं सावित्रीच्या ते लक्षात येईल म्हणून त्यांनी तो अंक लपवून ठेवला होता. पण तो कधी कुठं गहाळ झाला ते कळलंच नाही.

सैवं ट्रंका खाटेखाली लोटून बाबूराव खाटेवर आडवे पडले.

त्यांच्या चष्म्याच्या काचांवर दवबिंदूत भिजलेली प्रतिबिंबं पडली.... !

दुर्गीच्या शाळेसमोर ते उभे होते. शाळेच्या मोठ्या दरवाजातून मुला-मुलींचा लोंढा बाहेर पडत होता. मध्येच दुर्गी दिसली. साधी, बाळबोध वळणाची. नऊ वारी पातळ नेसणारी, अंगभर पदर घेणारी, भरगच्च अंबाडा घालणारी. त्यावर फुलांचा मोठा गजरा. एवढ्या मुलीत इतकी साधी दिसणारी ती एकटीच ! त्यामुळेच ती त्यांच्या मनात भरली होती. तिच्या साधेपणामुळे इतर पोरं तिला 'काकू...काकू' म्हणून चिडवीत होती. त्यांना चापावं असं बाबूरावांना वाटत होतं... !

.मंगूला भेटण्यासाठी म्हणून ते घरी आले होते. दुर्गी बाहेरच्या ओटयावर उभी होती. त्यांना बघताच ती आत जाईल असं त्यांना वाटलं होतं, पण आत गेली नाही. उलट हसली. आणि म्हणाली, "काळ्या रामाचं देऊळ कुठं आहे ते विचारायचंय ना ? इथं नाही, पलिकडे आहे !" ओटयावरल्या दगडी खांबाला हातांचा विळखा घालीत ती छान हसली होती. तिच्या गालावरच्या मांसल खळीत दडून बसावं असं त्यांना वाटलं होतं.

...त्या क्षणी ते हसले होते. पण बोलता आलं नव्हतं. हातरूमालानं तोंड पुसत ते तिथंच उभे राहिले.

"मंगू आहे ?"

"नाही ! बाहेर गेलाय् .

"आणि माई ?"

"देवळात गेलीय्... बस ना !"

"बसतो..." असं म्हणत ते झोपाळयावर अवघडून बसले. आणि हातरूमालानं तोंड पुसत म्हणाले, "दुर्गी, तुझं हे मॅट्रिकचं वर्ष. अभ्यास जोरात चाललाय ना ?"

"हो– !"

"काही डिफिकल्टी असली तर मला विचार हं !" झोपाळयाला झोका देण्याचंसुद्धा त्यांच्या लक्षात आलं नव्हतं.

"हो !"

"आता वेळ आहे मला. काय आहे डिफिकल्टी ?"

"आता नाही. विचारीन मग..."

"पुढं शिकणार की नाही ?"

"बघू ! पण मला नाही आवड... !"

"मग काय ? एकदम लग्न ?"

त्या प्रश्नानं त्यांचं काळीज एकदम वेगानं धपापलं होतं. बोलू नये ते बोललो की काय या विचारानं ते खूप लाजले होते.

पण ती काही बोलली नव्हती. खांबाला गाल घासत ती गालातल्या गालात हसली होती.

तेवढ्यात आतनं मोरोबा आला. काही तरी तोंडात टाकून आला होता. शर्टाच्या बाहीनं तोंड पुसत आणि तोंडातलं घाईघाईनं गिळत म्हणाला,

"अरे बाबू ! तू कधी आलास ?"

"हा आत्ताच येतोय–"

"मंगू बाहेर गेलाय...एवढ्यात येणार नाही... !"

"कळलं... !"

"चल...जरा फिरून येऊ. !"

"मी नाही येत ! जरा बसतो दुर्गीशी बोलत !"

"चल रे ! दुर्गीशी कसलं बोलतोस ? तिचा अभ्यास आहे मॅट्रिकचा. .चल... !"

दुर्गी एकदम ताठ झाली, आणि झटकन वळून म्हणाली,

"अरे तू जा ! बाबूला बसायचं तर बसू दे. !"

"बसू दे काय ? दुर्गे, तुझा अभ्यास आहे..." तो हुकमतीनं म्हणाला.

"तू तुझा अभ्यास बघ ! गेल्या वर्षी मॅट्रिकला पुनः एकदा सगळ्या विषयात गेलास."

"या वर्षी दाखवतो बघ... !"

"बघू... !" असं म्हणत दुर्गी आत गेली.

पण मोरोबानं सोडलं नाही. बाबूरावांचा हात पकडून त्यानं ओढायला सुरवात केली. त्यांचा अगदी नाइलाज झाला. बाबूरावांच्या खांद्यावर हात टाकून सर जमशेटजी टाटांची माहिती सांगत तो त्यांना पुढं पुढं रेटत राहिला. बाबूराव अस्वस्थ झाले होते. त्यांना दुर्गीशी बोलायचं होतं. खूप दिवसांनी संधी मिळाली होती. घरी ती एकटीच होती. बी. ए. ला आपण फर्स्ट क्लास मिळविणार, सरकारी नोकरी धरणार, मोठी जागा घेणार, आणि मग... ! त्यांना खूप बोलायचं होतं.

पण मोरोबावर चडफडत ते सर जमशेटजी टाटांचं चरित्र ऐकत होते.

इंटरच्या परीक्षेच्या वेळी अभ्यासाची गडबड होती. तरी वेळात वेळ काढून ते मॅट्रिकच्या परीक्षेच्या दिवशी सकाळी दुर्गीला भेटायला गेले. बेस्ट ऑफ लक् म्हटलं. ती, तिची आई, मंगू आणि ते मोटरीत बसून केंद्रावर गेले. तिला धीर दिला. दुपारी तिच्या चहाचं थर्मास घेऊन माईबरोबर उभे राहिले. संध्याकाळी तिचे पेपर पाहिले. ते कसे सोडवले हे दुर्गीनं कधी तोंड उघडून सांगितलं नाही. तरी सुद्धा तिला उमेद वाटावी म्हणून त्यांनी चांगले मार्क मिळतील असं तिला सांगितलं. पुढं ती व्हायची ती नापास झाली !








त्याच वर्षी इंटरला मंगूही नापास झाला. ते मात्र इंटरला फर्स्ट क्लासमध्ये आले. पण पेढे घेऊन गेले नाहीत.

माई म्हणाल्या, "वाबू, तू पेढे नाही आणलेस ?"

"मला वरं नाही वाटलं हो !"

"कां ?"

"दुर्गी नापास झाली. मंगू नापास झाला... !"

"म्हणून रे काय झालं ? तू एवढ्या फर्स्ट क्लासमध्ये पास झालास याचा काय आनंद नाही आम्हांला ? आमचा मंगू शिकला नाही, तरी तू शीक !"

"तुमचा आशीर्वाद हवा !"

"आहेच ! ह्यानासुद्धा आनंद झाला."

"पपांना ?"

"हूं ! म्हणाले, असाच शिकून एलेएलवी झाला तर आपल्या फर्ममध्ये घेईन !"

माईच्या त्या बोलण्यानं ते अतोनात सुखावले. पपांच्या सॉलिसिटर फर्ममध्ये आपण पार्टनर आहोत, दुर्गीशी लग्न झालंय, मोटरनं हिंडतो आहो अशी चित्रं ते खळवीत राहिले. माईच्या त्या बोलण्यातून अनेक धागेदोरे काढून पुढं अनेक दिवस रंगीवेरंगी गोफ विणण्यात त्यांचे दिवस सुखाने गेले.

...वी. ए. च्या परीक्षेच्या वेळी खूप उमेद होती. फर्स्ट क्लासची तयारी होती. परीक्षेच्या आधल्या दिवशी ते माईच्याकडे गेले. त्याना माईकडून आणि जमलं तर पपांकडून आशीर्वाद हवे होते. आणि दुर्गीकडून वेस्ट ऑफ् लक्. एवढे तीन शब्द ! हसऱ्या तोंडातनं वाहेर पडलेले. आणखी एकदा मॅट्रिकची वारी करून ती घरीच राहिली होती. एका अर्थानं ते बरंच होतं. कमी शिक्षण झालेल्या मुलीला मोठा नवरा कुठनं मिळायला ? मग माईनी त्यांनाच विचारलं असतं, किंवा त्यांनी मंगूला सांगितलं असतं ! मोठ्या उमेदीनं ते ट्राममधून उतरले. माडीवरच्या खिडकीत पाईप ओढत पपा उभे होते. वर वघून वावूरावांनी हात वर केला. पपांनी पाईप हालवून अभिवादन केलं. त्यांनी ठरवलं, आज वर जायचं. ते फारसे कधी वर जात नसत; पण आज जायचं, खाली वाकून पपांच्या पायांवर डोकं ठेवायचं—आणि त्यांना सांगायचं, "फर्स्ट क्लास मिळवण्याची इच्छा आहे. तुम्ही आशीर्वाद द्या !"

मग पपा आशीर्वाद देतील आणि विचारतील, "पुढं काय करणारेस, वांबू ?"

"लगेच एलेलवीच्या टर्मस् भरणार—!"

पपांना आनंद होईल.

वावूराव ओटचावर गेले. त्यांनी कोपऱ्यात चप्पल ठेवलं. तेवढ्यात माई आली. ती तर आनंदानं फुलली होती. त्यांना वाटलं, उद्या आपली बी. ए. ची शेवटची परीक्षा म्हणून माईला आनंद झाला असावा.

माई हसली आणि लगवगीनं आत गेली.

माई, उद्या माझी बी. ए. ची शेवटली परीक्षा. तुमच्या



## तुझ्या डोळ्याची भाषाच मोडी

मी बाळबोध वळणाची,
तुझी तऱ्हा आडवळणाची
तुझ्या डोळ्याची भाषाच मोडी
कालिज्याचा लचका तोडी
गुंतवून नजरा मला घालिसी कोडी
काशि जुळऽलं अपुली जोडी
नाही शिकले पुस्ती बोटी बोरू धरून
मोडून मांड नाहि बसले कधि सावरून
सांडली दौत पायाशी मस्ती करून
लागला डाग शिकण्याचा भरली साडी
अकलेवर केली सदाच मी कुरघोडी
पंखावर लिहिले पत्र कसेरे वाचू
मजकूर न कळता हृदय लागते नाचू
वाचले निरक्षर अर्थ लागतो डाचू
थरथरली माझ्या उरी
सशाची जोडी
तुझ्या डोळ्याची भाषाच मोडी

—राजा बढे

आशीर्वादासाठी आलोय. दुर्गी कुठं गेलीय ? असं मनातल्या मनात वोलत ते वाहेर उभे राहिले.

माई लगवगीनं वाहेर आली. तिच्या हातात चांदीचं तबक होतं.

"माई.. " असं म्हणत ते नमस्कारासाठी वाकणार — तोच माई म्हणाली,

"वाबू, पेढे घे ! आणि तोंड गोड कर !"

तिने मूठभर पेढे त्यांच्या हातावर ठेवले.

"कसले हो पेढे, माई ?"

"आमच्या दुर्गीचं लग्न ठरलं !"

"कुणाशी ?"

त्यांचं तोंड सुकलं होतं. घसा खरवडून त्यांनी विचारलं.

"रत्नाकर रांगणेकर. ॲडव्होकेट आहेत... ते आप्पासाहेब रांगणेकर माहीत आहेत ? त्यांचा मुलगा. मोठं घराणं मिळालं आमच्या दुर्गीला ! दोन विल्डींगा...."

माई जावयाची थोरवी सांगत होती; पण वावूरावांना काही ऐकू आलं नाही. त्यांनी पेढे खाल्ले की नाहीत, लग्नासंबंधी काय बोलले, त्यांना काही आठवलं नाही, अजून आठवत नाही. त्यानंतरची

त्यांची लगचची आठवण म्हणजे ते कोपऱ्यावरच्या इराण्याच्या हॉटेलात पंख्याखाली बसून चहा पीत होते. मधलं काहीसुद्धाआठवत नव्हतं.

घरी गेले आणि खूप रडले. आयुष्यात प्रथम ! सावित्री गेल्या-नंतर रडले; पण तेवढे नाहीत. त्या रडण्यामध्ये सगळं आयुष्य उध्वस्त झाल्यासारखं वाटत होतं. सावित्री गेली तेव्हासुद्धा त्यांना तसं भाटलं नव्हतं. त्यावेळी वेड लागेल असं वाटत होतं.



पण सकाळी जड डोळ्यांनी उठले. आपल्या नशिबात नव्हतं तें मिळालं नाही, असं स्वतःशी म्हणत सरळ परीक्षेच्या केंद्रीकडे वळले. सहीसलामत सुटले; पण पास क्लासमध्ये !

परीक्षा होताच त्यांनी एकदा मंगूची भेट घेतली; पण त्याच्या घरी न जाता. त्यानंतर त्यांनी दुर्गीच्या घरात पाऊल ठेवलं नाही. मंगू पपांच्या फर्ममध्ये नोकरी करीत होता. त्यांनी टेलिफोन केला आणि त्याला खोलीवर बोलावलं.

"माझ्याशी दुर्गीचं लग्न व्हावं अशी माझी फार इच्छा होती. . . !" एवढं म्हणता म्हणता ते घळघळा रडले.

ते ऐकून मंगूला धक्का बसला.

"मला तर याची कल्पनाच नव्हती. कुणालाच आमच्या घरात कल्पना नाही." असं तो म्हणाला. त्याचे डोळे खूपच वावरले होते.

"अजून काही करता येईल का ?"–त्यांना आशा वाटत होती.

"छे ! आता तर अशक्यच आहे. वीस हजार रुपये हुंडा दिलाय पपांनी."

"मी हुंड्याशिवाय.

"तरीही ते शक्यच नाही !"

"कां ?"

"एक वेळ दुर्गी किंवा माई मानेल. पण पपा ?–शक्यच नाही."

"पण कां ?"

"त्यांची मोठी उडी ! तरीसुद्धा रत्नाकर रांगणेकर फॉरिन रिटर्नड् नाहीत असं पपा बोलून दाखवतातच !"

ते ऐकल्यावर आपण हे सारं निष्कारण बोललो आणि स्वतःकडे कमीपणा घेतला असं त्यांना वाटलं.

पुढं दुर्गीचं रीतसर लग्न झालं. मंगूनं स्वतः येऊन आमंत्रण दिलं.

"मंगू, तू घरी काही बोललास ?" असं त्यांनी विचारलं.

"नाही. काय बोलणार ?"

"कां ?"

मंगू काही बोलला नाही. पण जाताना म्हणाला, "बाबू, काही झालं तरी तू लग्नाला मात्र ये ! उगाच गैरसमज नकोत. !"

ते लग्नाला गेले. जत्रेसारखं लग्न ! सगळा श्रीमंतांचा जमाव. रत्नाकर दिसायला तेवढासा स्मार्ट नव्हता. दुर्गीनं कसं कबूल केलं कोण जाणे ! मोठमोठे वडे लोक स्टेजवर चढत होते आणि किंमती भेटी देत होते. त्यातच बाबूरावांची एक चांदीची गुलाबदाणी. ती कुठं चेपून गेली कोण जाणे. पण त्या भेटीबरोबर त्यांनी एक चिटोरा दिला. 'घडायचं होतं. . . पण घडलं नाही. . .' असं काहीसं त्यात लिहिलं होतं. त्यात आणखी काय होतं ते त्यांना आता आठवत नव्हतं. दुर्गीनं चिटोरा वाचला आणि पोलक्यात घुसवला. पण तिच्या चेहऱ्यावर काही दिसलं नाही. रत्नाकरानं त्यांच्याशी हस्तांदोलन-सुद्धा केलं नाही. तो वडयांच्याच घोळक्यात होता. मग मात्र त्यांना पश्चात्ताप झाला होता. तो चिटोरा दुर्गी रत्नाकराला दाखवील. . .

रत्नाँकर टिंगल करीत हसेल. छे! आपण तो चिटोरा देऊन उगाच कमीपणा घेतला असं त्यांना वाटलं होतं.

समारंभातून बाहेर पडताना वाटेत पपा भेटले. त्यांनी हस्तांदोलन केलं आणि विचारलं, "बाबू, कुठला क्लास मिळाला?"

लगेच त्यांना वाटलं, सरळ फर्स्ट क्लास म्हणून सांगावं; पण तोही प्रसंग आलाच नाही. पपा घाईत होते. त्यांनी हात सोडला आणि ते कुणा वड्या धेंडाच्या तैनातीला गेले.

अगदी बाहेर पडता पडता माई भेटली. ती म्हणाली,

"बाबू, हल्ली होतास कुठं?"

"इथंच—"

"कुठं आला नाहीस. . ये एकदा!"

"हो!"

"सगळं मिळालं? आइस्क्रीम.

"हो!" ते खोटंच बोलले. त्यांनी काहीच घेतलं नव्हतं!

"ये रे पुनः दुर्गीला भेटायला

ते काही न बोलता झटक्यानं बाहेर पडले. आणि काळोखात येताच त्यांनी डोळे पुसून घेतले.

बाबूराव तसेच खाटेवर पडून होते. पाण्याची तार पापण्यांना चिकटली होती.

एकदम दारावरची बेल वाजली!

सगळी प्रतिबिंबं विरघळून गेली. चष्म्याच्या काचांवर दवबिंदु पडले होते.

धोतराच्या सोग्यानं चष्मा पुसत त्यांनी दार उघडलं. एकदम त्यांना चोरासारखं वाटलं.

नंदा आणि हेमा उभी होती. पाठीमागं हेमाचे वडील आणि आई!

बाबूराव हसले; पण त्यांना तावडतोब बोलता आलं नाही. छातीवर हात घेऊन ते बसून राहिले.

* *

## [ ४ ]

सकाळी पेपर वाचत बाबूराव स्वस्थ पडले होते.

तेवढ्यात दरवाजावरची बेल वाजली.

बाबूरावांच्या मस्तकावरली शीर एकदम तडकल्यासारखी झाली. त्यांना संताप आला. नागपूरला बरं होतं. कुणाची कटकट नव्हती. इथं तर पाच मिनिटांनी कुणी ना कुणी बेल वाजवतो, नाही तर दार ठोठावतो. पोस्टमन. कल्हईवाला. पेपरवाला. . किंवा दुसऱ्याचाच कुणाचा तरी पत्ता विचारणारा. त्यांना वाटलं, नंदा एकदाचा लवकर लग्न करील तर बरं! मग दार उघडायचं काम तरी हेमा करील!

नंदा दार उघडील या आशेनं ते तसेच पडून राहिले. बेल पुनः वाजली, तेव्हा त्यांच्या लक्षात आलं. नंदा बाथरूममध्ये गेला होता. ते उठले. पूर्ण श्वास घेता येतो का पाहिलं. आणि थंड चालीनं ते दरवाजाकडे गेले. गेले दोन तीन दिवस त्यांना स्वस्थ झोप मिळाली नव्हती. थकवा वाढला होता. त्याहीपेक्षा अधिक ते भ्याल्यासारखे झाले होते.

त्यांनी दार उघडलं.

"कोण?"

"पेपरवाला—!"

"काय पाहिजे?"

"बिल!"

"थांबा! नंदा आंघोळीला गेलाय.

बोलताना बाबूराव पेपरवाल्याला न्याहाळून पहात होते. त्यांच्या नाकावर चष्मा नव्हता. तरी सुद्धा ते बारकाईनं बघत होते. लांब पांढरी पॅंट. वर स्काऊटसारखा खाकी शर्ट. दोन बटणबंद खिसे, खांद्यावर दोन आडव्या पट्ट्या. डोळ्यांवर जुस्ताच्या काड्यांचा निळा चष्मा.

मानेमागे दोन उशा लावून बाबूराव आरामात पहुडले. दरवाजा उघडाच होता. या पेपरवाल्यासारखा दिसणारा माणूस कुठं तरी पाहिलाय. कुठं पाहिलाय? विचार करीत ते तसेच पडून राहिले. तेवढ्यात नंदा आला.

"कुणी आला होता?"

"पेपरवाला! थांबलाय बाहेर.

नंदा पैसे आणायला आत गेला. तेवढ्यांत बाबूरावांना एकदम आठवण झाली. ते झटक्यानं उठले आणि म्हणाले,

"अरे नंदा—"

"आलो—"

नंदा पुढ्यात येताच ते खालच्या आवाजात म्हणाले,

"कोण रे हा? नाव काय?"

"कुणी तरी नाडकर्णी म्हणून आहे!"

"मोरेश्वर नाडकर्णी?"

"कल्पना नाही! विचारतो हं—!"











नंदा दरवाजाकड गेला आणि म्हणाला,

"नाडकर्णी ?"

"जी–"

"तुमचं संपूर्ण नाव काय ?"

"मोरेश्वर श्रीधर–"

बाबूरावांनी लगेच डब्यातले दात तोंडात अडकवले आणि चष्मा चढवीत ते ओरडले,

"अरे मोरोबा–"

अंधारात चाचपडल्यासारखा, मोरोबा आत आला आणि गांगरल्यासारखा बघत राहिला.

"मोरोबा, ओळखलंस ?"

ओठांचा चंबू करीत मोरोबानं चष्म्याच्या निळ्या कांचा बाबूरावांवर रोखल्या. जस्ताच्या काड्यांची दोन दाणेदार टोकं मोरोबाच्या कानांच्या पाळ्यांखाली चिकटली होती. तो बघत राहिला.

बाबूराव हसले आणि म्हणाले,

"अरे, दिसत नसलं तर चष्मा काढून बघ !"

मोरोबानं चष्मा काढला नाही. तो अनोळखीपणानं बघत राहिला.

"मी बाबू. . . ."

"बाबू कोण ?"

"चेष्टा करतोस की काय ? बाबू सवनीस नाव आठवत नाही ?"

"अरे बाबू. . . बाबू. " करीत मोरोबा तीर सुटल्यासारखा पुढं आला त्यानं बाबूरावांना कडकडून मिठी मारली. बाबूरावांचा जीव खालीवर झाला.

"अरे थांब !" असं म्हणत त्यांनी श्वास घेतला.

"मेल्या, तू इतका म्हातारा कशानं झालास ?"

मोरोबाच्या या अति सलगीनं बाबूराव चमकल्यासारखे झाले. त्यांनी नंदाकडे काहीसं ओशाळून पाहिलं. तो आत गेला.

"आं ? एवढा थकलास कशानं तू ?"

"मग काय ? आणखी दोन महिन्यांनी साठावं लागणार !"

"तुझ्यापेक्षा दोन तीन वर्षांनी मी मोठा. मी थकलोय ?" असं विचारीत मोरोबानं छाती फुगवली.

बाबूराव गालातल्या गालात हसत बघत राहिले. मोरोबा जवळ जवळ होता तसाच होता. शिडशिडीत अंगाचा. फक्त केस पिकले होते. आणि तपकिरीची चिमूट कोंबून कोंबून नाकाची भोकं तेवढी पसरट केली होती. निळ्या काचांचा चष्मा एक नवीन होता.

"तुझ्या या चष्म्याला निळ्याशा काचा ?"

कानांच्या 'गागं' रतून बसलेल्या जस्ताच्या काड्या त्यानं ओरबाडून काढल्या. आणि डोळे विस्फारले.

डाव्या खाचेत निर्जीव काचेचा डोळा होता.

"तुझा डावा डोळा कसा गेला, मोरोबा ?"

बाबूरावांना धक्काच बसला.

"सर जमशेटजी टाटा भोवला."

असं म्हणून त्यानं पुन: चष्मा नाकावर ठेवला.

"म्हणजे ?"

"मध्ये काही दिवस केशवर्धक तेलाचा धंदा केला. 'हिमगिरी केशवर्धक तेल'! तेल उकळताना ते डाव्या डोळ्यात उसळलं. . . डोळा गेला !"

"च्. . च्. . . च् !" बाबूरावांना खरोखरच वाईट वाटलं.

मोरोबा फक्त हसला.

"आणि तेलाचा धंदा ?"

"बंद ! सर जमशेटजीला कॉंपिटिशन नव्हती. आम्हाला कॉंपिटिशन ! धंदा बंद ! पण ही पेपरची लाईन बरी आहे. सगळी ठाकुरद्वार लाईन माझ्याकडे आहे. हाताखाली दोन पोरे आहेत."

"बरं आहे ! सकाळी पेपर वाटले की दिवस मोकळा. . . विश्रांती. . . !"

"करायची रे काय विश्रान्ती ? दिवस येतो खायला. खोलीत पडून करायचं काय ?"

"घरी कुणी नाही ?"

"कोण असणार ?"

"पुढं लग्न केलंसंच नाहीस ?"

"छा !"

असं म्हणून तो स्वस्थ बसला. त्याच्या डोळ्यावरच्या निळ्या काचांमुळे तो निश्चित कुठं बघत होता तेच कळत नव्हतं.

बाबूराव त्या काचातली निळी प्रतिबिंबं बघत राहिले.

दुर्गीचं लग्न ठरल्याचं कळलं तेव्हा तो बाबूरावांच्या खोलीवर मध्यरात्री आला होता आणि बाबूरावांच्याच खाटेवर लोळत ओक्साबोक्शी रडला होता. दुसरे दिवशी बी. ए. ची परीक्षा. रात्रभर दोघांना झोप नव्हती; पण बाबूरावांनी आपल्या मनाचा पत्ता लागू दिला नव्हता. आणि मोरोबा इतका रडत होता की बाबूरावांच्या डोळ्यांतलं पाणी त्याला दिसलंसुद्धा नव्हतं !

तोच जना प्रश्न पुन: एकदा बाबूरावांच्या मनात आला. मॅट्रिक-मध्ये वाऱ्या करून घरी बसलेला मोरोबा दुर्गीवर प्रेम कसं करू शकला ? दुर्गी आपल्याला मिळेल असं त्याला वाटलं तरी कसं ? . . .खरोखर आपण तिच्यावर प्रेम केलं ती सुद्धा चूकच होती. साखरदांडेसारखा पैसेवाला सॉलिसिटर. . सरळ एका रकमेनं वीस हजार रुपये हुंडा देणारा. . . शिवाय लग्नासाठी आणखी पंधरा वीस हजार खर्च करणारा. आपल्या उडीची झेप त्यावेळी आपल्यालासुद्धा कळायला हवी होती ! पण कळली नाही, आणि मोरोबाला तर मुळीच कळली नाही.

मोरोबाच्या डोळ्यात पाणी आलं असावं असा त्यांना भास झाला. पण निळ्या काचातून काही दिसत नव्हतं.

त्यानं शान्तपणे तपकिरीची बाटली काढली आणि नाक फेंदारत दोन चिमूट तपकीर कोंबली. त्यातली वरीचशी त्याच्या खाकी शर्टावर कणाकणानं पडत होती.




"तुझं अगदी खरं प्रेम होतं रे दुर्गीवर?" बाबूरावांना अजूनही ते जुनं कुतुहल होतं.

चटकन दोन निळ्या काचा वर झाल्या. दोन्हीत बाबूरावांचंच प्रतिबिंब पडलं.

"जाऊ दे रे, बाबू! आणि काय तुझं नव्हतं तिच्यावर प्रेम?"

बाबूराव एकदम चमकले. जरा ओशाळल्यासारखे झाले.

"कशावरून म्हणतोस?"

"अरे काय कळत नाही? आम्ही खुळे–ओक्साबोक्सी रडलो! तू चोर! आतल्या आत रडलास!"

"पण तुला सांगितलं कुणी?"

"मंगूनं सांगितलं. माईनं सांगितलं!"

"माईनं?"

"मग? मंगूनं लगेच माईला सांगितलं होतं."

"माई काय म्हणाली होती?"

"काय म्हणणार?"

माई निश्चित काही तरी म्हणाली होती, जोडा छान दिसला असता असं म्हणाली असणार. पण मोरोबा मुद्दामच सांगत नाही असा बाबूरावांना संशय आला.

"माई निश्चित काही तरी म्हणाली असणार ..!"

"काही सुद्धा म्हणाली नाही!"

असं म्हणत मोरोबानं खिशातनं तांबडा रुमाल काढला आणि दोन टोकं दोन हातात धरून त्यानं करवत फिरविल्यासारखा रुमाल नाकावरून फिरवला. मग चिकट रुमालाची व्यवस्थित घडी करताना म्हणाला,

"म्हणणार काय? पैसेवाल्यांचे भेज्ये! रांगणेकरांचं घराणं...





अनुक्रमणिका







मोठ्ठं ! ... दोन बिल्डींगा. सगळ्यांना जावयाची ऐपत सांगता सांगता माईचं तोंड फाटत होतं. मातीचं असतं तर केव्हाच फुटलं असतं ! शेवटी फुटलंच ना ? आता घरी बसली दुर्गी...!

"तिनं काय घटस्फोट घेतला ? कुणी तरी म्हणालं होतं. खरं खोटं..."

"खोटं का ? सगळ्या सारस्वत समाजाला माहीत आहे. आठ वर्षं झाली."

"घटस्फोट घेऊन आठ दहा वर्षं झाली ?"

"तर रे ! आणि त्याआधी पाच सहा वर्षं माहेरीच. !"

"ऐकलं होतं मी..."

'ऐकायचं रे काय त्यात ? सगळ्या सारस्वत समाजात छी:थू झालीय...!"

बाबूरावांचे कान सगळं ऐकायला उत्सुक होते. पण तेवढ्यात हेमा आणि तिचे वडील आले. त्यामुळे बाबूरावांचा विरस झाला.

मोरोबा उठला. म्हणाला,

"जातो रे बाबू ! रविवार आहे. बिलं वसूल करायचा दिवस ! येईन पुन: ! तू किती दिवस आहेस ?"

"आता इथंच ! ये, संध्याकाळी ये !"

"येईन ! सांगेन तुला सगळं ! महाभारतच आहे ते !"

असं म्हणून मोरोबानं नंदाकडनं पैसे घतले आणि तो तरातरा निघून गेला.

बराच वेळ हेमाचे वडील बोलत होते. दोन महिन्यानंतरचा मुहूर्त काढलाय, हॉल घेतलाय अशा किती तरी गोष्टी ते सांगत होते. पण बाबूरावांचं लक्ष नव्हतं.

* *

## [ ५ ]

त्यांना झालं होतं, मोरोबा कधी येतो आणि महाभारत सांगतो. उत्सुकता शिगेला पोचली होती. त्यांना मोरोबाकडून सगळं संगतवार ऐकायचं होतं. काही गोष्टी त्यांना एवढ्या वर्षात उडत उडत कळल्या होत्या. जाणवल्या होत्या; पण त्यात संगती नव्हती. निश्चितपणा नव्हता.

मागं काही वर्षांपूर्वी ते दोन दिवसासाठी मुंबईस आले होते, तेव्हा दुर्गी त्यांना दिसली होती. नाटकाला आली होती. बरोबर सासरा होता—आप्पा रांगणेकर. एक अंक संपल्यावर बाबूराव मुद्दाम तिच्या पुढ्यात जाऊन उभे राहिले होते. पण तिनं पाहून सुद्धा न पाहिल्यासारखं केलं होतं. सासऱ्याच्या शेजारी मख्खपणे बसून राहिली होती. त्या अपमानानं ते दुखावले होते. आणखी दुखावले होते ते दुर्गीची जगावेगळी फॅशन बघून. त्यांना आवडणारी साधी बाळबोध दुर्गी, कुसुमावती लुप्त झाली होती. नऊ वारी पातळ नेसणारी, अंगभर पदर घेणारी, भरगच्च अंबाडा घालणारी...ती कुसुमावती नाहीशी झाली होती. दुखावलेल्या मनानं ते थिएटरमध्ये आपल्या खुर्चीवर येऊन बसले होते, विचार करीत ! सावित्री दिसायला आणि स्वभावानं गोड होती; पण एका गोष्टीबद्दल त्यांना सावित्रीचा राग यायचा. तिला फॅशनचा शौक होता. आपल्या बायकोनं कुसुमावतीसारखं नऊवारी नेसावं, अंबाडा घालावा, फुलांचे गजरे माळावेत असं त्यांना वाटायचं. पण सावित्री ऐकत नसे. ती पाचवारी नेसायची. दोन वेण्या घालायची. एखादंच फूल माळायची. लिप्स्टिक लावून ओठ रंगवण्यासाठी तिनं खूप प्रयत्न केले होते. पण त्यांनी ते चालू दिले नव्हते. तरी सुद्धा लग्नसमारंभांना जाताना ती पुसटशी लिप्-स्टिक लावायचीच ! बाबूरावांना राग यायचा. ते पुन: पुन: सावित्रीला सांगायचे, आपल्या एका मित्राची बहीण होती—कुसुमावती साखरदांडे म्हणून ! साधी आणि बाळबोध वळणाची मुलगी. साधेपणानं ती अधिक सुंदर दिसायची !

सावित्रीला खरं वाटत नसे. ती फणकाऱ्यानं म्हणायची, मग करायचं तुम्ही त्या कुसुमावतीशी लग्न !

तीच कुसुमावती एवढी बदललेली पाहून बाबूराव एकदम विरघळून गेले होते.

तिच्यात खूपच फरक पडला होता. तिचा मांसलपणा लपला होता. बहुधा डाएटींग करीत होती. पाच वारी नेसली होती. बिनबाह्याचं पोलकं घातलं होतं. लिप्-स्टिक सुद्धा लावली होती. आणि सर्वांवर कळस म्हणजे एवढे लांबसडक विपुल केस कापून तिनं तोकडा बॉबकट केला होता. मागून एखाद्या पुरुषासारखी दिसत होती. तिच्या केसांकडे बघताना त्यांना रडावसं वाटलं होतं.

लग्नानंतर अवघ्या दोन वर्षात एवढा फरक झाला होता.

त्यानंतर बरीच वर्षं झाली. पुन: कधी दिसली नव्हती. कुठून कुठून कानावर येत होतं, रत्नाकर रांगणेकराचं कुसुमावतीशी पटत नाही म्हणून. असंही ऐकलं होतं की, रत्नाकर छंदी आहे, त्याला बायकांचा नाद आहे. असं काही कानावर आलं की ते झटकून मनाबाहेर टाकण्याचा प्रयत्न करीत असत. कारण असं ऐकलं की आपल्याला आतून कुठं तरी बरं वाटतं आणि तसं बरं वाटणं हे चूक आहे असं त्यांना वाटायचं !

नंतर आणखी एकदाच योग आला. मंगूच्या मुलाची मुंज होती आणि त्यावेळी बाबूराव आणि सावित्री मुंबईत होती. छोटा नंदाही होता. त्यांना मुंजीला एकट्यानंच जायचं होतं. कारण कुसुमावतीशी बोलण्याचा योग आलाच तर त्यांच्या चेहऱ्यावर फरक पडला असता. तो फरक सावित्रीला दिसता नये होता. पण सावित्रीनंच हट्ट धरला होता. ती म्हणाली होती, बघू तरी तुमची बाळबोध आणि साधीभोळी कुसुमावती !

आता ती पूर्वीसारखी साधी आणि बाळबोध राहिली नसेल. मोठ्या ॲडव्होकेटची बायको ती ! श्रीमंत घराणं आहे !—असं त्यांनी सावित्रीला सांगितलं होतं.

पण तिनं ऐकलं नव्हतं. सर्वांना घेऊन ते मुंजीला गेले होते.

ते मुंजीला गेले याचा मंगूला आनंद

अनुक्रमणिका






झालेला दिसला; पण सबंध समारंभावर एक प्रकारची उदासीन छाया होती. ते जिथं बसले होते तिथं मंगू आला, सर्वांशी बोलला वगैरे. आणि मग त्यांना एकट्यांना उठवून बाजूला घेऊन गेला. त्याला काही तरी बोलायचं होतं. त्याचा चेहरा त्रासिक दिसत होता. दोघेही एका बाजूला जाऊन बसले. एक दोन वर्षं आधीच पपा वारले होते. त्यांच्या निधनाबद्दल बाबूराव दुःख-भरानं बोलले आणि मग वळणावळणानं विषयावर आले.

"कुसुमावती कुठं दिसत नाही ती ?"

"कोण–दुर्गी ना, असेल कुठं तरी–" असं म्हणून मंगू गप्प बसला.

"तिला मुलं किती ?"

"काही नाही !"

"असं कां ?"

तो गंभीर झाला आणि म्हणाला,

"तुला माहीत नाही ?"

"काय ?"

"दुर्गी घरी जात नाही–"

"म्हणतोस काय मंगू ?"–बाबूरावांचं तोंड उघडं पडलं.

"हल्ली ती माझ्याकडेच असते. माझ्या-वरच सगळा भार पडलाय. आता पपाही नाहीत !"

"पण कारण काय ?"

"एकेकाची एकेक थेरं रे !" असं म्हणून तो गप्पच राहिला.

पण बाबूरावांना स्वस्थ बसवत नव्हतं.

"तरी पण ?"

"रत्नाकराच्या मते, दुर्गीला फॉर्म नाही–"

"हे त्या चोराला लग्न करायच्या आधी कळायला हवं होतं. दुसऱ्याचा सत्या-नाश. . . !" बाबूराव एकदम दातओठ खात म्हणाले.

"तुला माहीत आहे, बाबू ! आमची दुर्गी मूळचीच स्थूल प्रकृतीची ! तर तिचं जेवण तोडून त्या लोकांनी तिला सडसडीत केली. तिला आंबाड्याची आवड, तर तिच्या विरोधाला न जुमानता त्या रत्ना-करानं तिचा बॉबकट केला. पाचवारी नेसायला लावलं, स्लीवलेस पोलकी. काही विचारू नकोस !"

"पाहिली होती मी तिला एकदा. अशीच फॅशन करून आली होती !"

"कुठं आली होती ?"

"नाटकाला ! बरोबर सासरा होता."

"असेल !" असं मोघम बोलून मंगू म्हणाला, "दुर्गीला मुलांची आवड ! तर रत्नाकराला मुलं नकोत. म्हणे फॉर्म बद-लतो, सेक्स्युअल अर्ज कमी होते नॉन्सेन्स. !"

"त्या रत्नाकराबद्दल. . त्याला छंद. ते चाचरत म्हणाले.

"छंद सगळे ! सध्या एका अँग्लो-इंडियन पोरीला घेऊन असतो. !"

क्षणभर बाबूराव सुन्न झाले. काय बोलावं हे त्यांना कळेना.

"तिच्या जन्माचं मातेरं झालं !" मंगू वैतागून म्हणाला, आणि पांढरा फिकट पडला.

ते मंगूच्या तोंडाकडे बघत राहिले. तो त्यांच्या तोंडाकडे.

मध्येच ते न राहून म्हणाले,

"तिचं लग्न जर माझ्याशी–"

पुढं त्यांना बोलताच आलं नाही. हे सुद्धा उगाच बोललो असं वाटलं. पण नंतर वाटलं, एकापरीनं ते बोलले हे बरं झालं.

कारण त्यावर लगेच मंगू म्हणाला,

"मी पपांना सांगितलं होतं नंतर ! बाबूशी दुर्गीचं लग्न झालं असतं तर मोटार गाडी नसली तरी सगळी सुखं मिळाली असती."

ते ऐकून बाबूरावांना बरं वाटलं. उत्सुक-तेनं त्यांनी विचारलं,

"मग काय म्हणाले पपा ?"

"त्यांना पटलं होतं ! पण फार उशीरा ! उशीरा पटून उपयोग काय ?"

"कुसुमावती काय म्हणाली ?"

"तिनं मलाच दोष दिला. ती म्हणाली बाबूची इच्छा होती तर तू आधी तरी सांगायचंस ! आता मला तरी कुठं आधी ठाऊक होतं ? शिवाय त्यावेळी पपांनीही ऐकलं नसतं. पुढं मग त्यांचे डोळे उघडले ते वेगळं. !"

बाबूराव एकदम गहिवरले. कुसुमाव-तीचं लग्न ठरल्याचं कळलं त्या रात्री ते रडले होते. त्यानंतर तसेच आपण या क्षणी रडू की काय अशी त्यांना भीती वाटली. मोठ्या प्रयासानं त्यांनी स्वतःला सावरलं.

"भेट तिला. "

"भेटू– !"

असं म्हणून ते उठले. मंगूच्या मागनं चालत राहिले. ते उठलेले पाहाताच सावित्रीही नंदाला घेऊन मागोमाग आली. तिनं असं यायला नको होतं.

मंगू पुढे गेला, तशी सावित्री त्यांच्या कानात वाकली आणि म्हणाली,

"तुमचा चेहरा असा कां ?"

"कसा ?" बाबूराव दचकले आणि स्वतःला सावरून म्हणाले, "तो वडिलांचं सांगत होता. वारले ना ते अलिकडे. !"

तरी सावित्री त्यांच्या तोंडाकडे बघतच होती !















पुढं गेले. कुणी पाहाणार नाही, कुणाचं सहज लक्ष जाणार नाही अशा एका कोपऱ्यातल्या खुर्चीत कुसुमावती एकटीच बसली होती. अगदी गरीब पोरक्या तोंडानं. बरीच सुटली होती अंगानं. विशेषतः कमरेतन ! नऊ वारी नेसली होती. अंगभर पदर घेऊन बसली होती. लांब हाताचं पोलकं, केसांचा अंबाडा ! वेणी मात्र नव्हती, फुलांची ! ओठातोंडावर रंग नव्हता. कानशिलावरले केस तेवढे पिकले होते.

"दुर्गी, याला ओळखलंस तू ?" असं मंगूनं विचारलं.

ती हसली नाही. बोलली नाही. काही न दिसल्यासारखी ती गप्प राहिली.

मग खुर्चीच्या आधारानं शरीराचं ओझं उचलीत ती उभी राहिली.

"अग, हा आपला बाबू–"

ती किंचित्शी हसली. हिमटी दिल्यासारखे तिचे लवचिक ओठ वाकले.

तिनं थोडा वेळ नजर उचलून बाबूरावांकडे पाहिलं.

मग ती आलटून पालटून सावित्रीला आणि नंदाला बघत राहिली. टक लावून बघत राहिली. इतकी की, बाबूरावांना तिथं उभं राहणं सुद्धा जड वाटलं.

"बराय्–"

आवाज फाटला, तरी तेवढा एक शब्द उच्चारून ते मागं वळले.

ते वळता वळता कुसुमावतीनं नंदाच्या तोंडावरनं हात फिरवला. सात वर्षाचा नंद्या ! तिच्याकडे बघत राहिला. ते पुढं गेले तरी नंद्या मागं वळून बघतच होता.

"कुणाला बघतो आहेस वळून ?" असं विचारून त्यांनी निमित्त केलं आणि मागं वळून पाहिलं.

कुसुमावती अजून तशीच उभी राहून त्यांना बघत होती.

ते हॉलच्या बाहेर पडले तेव्हा बराच अंधार पडला होता.

सावित्री एकदम जवळ आली आणि म्हणाली,

"चांगलीच साधी, बाळबोध आणि जाडजूड आहे की हो ! अगदी तुम्हाला हव्वी तश्शी ! मग हिलाच करायची होती–"

असं म्हणून ती खदखदा हसली होती.

तिचं हसणं बाबूरावांना आवडलं नव्हतं; पण ते काही बोलले नव्हते. बोलता आलंच नसतं, इतका त्यांचा गळा कोंडला होता.

त्यानंतर मात्र कुसुमावती कधी दिसली नव्हती.

काही ना काही कानावर येत होतं. पण तेवढंच !

विचार करीत बराच वेळ बाबूराव आरामखुर्चीत बसले होते. मग ते स्वतःशीच म्हणाले, मुंबईला आल्यापासून आपण सारखा दुर्गीचाच विचार करतोय. ते बरं नव्हे ! झालं, गेलं !, एवढी वर्षं गेली. दोन महिन्यांवर मुलाचं लग्न आलं. जुन्या आठवणी आपण कशासाठी उगाळत बसायचं ? त्यामुळे टेन्शन वाढणार ! पालपिटेशन वाढेल ! आपण हे सगळं बंद केलं पाहिजे.

ते आरामखुर्चीत रेलून आडवे झाले.

धन्य ही गायनी कळा !



"भीमपलास"

## [ ६ ]

मोरोबा आला तेव्हा त्याला धाप लागली होती; पण ओठावर अस्फुट हसू होतं. तो काही तरी लपवतोय असं बाबूरावांना वाटलं.

"साली कसली बिल्डींग आहे !" असं तो धापा टाकीत म्हणाला. नाकातल्या तपकिरीमुळे त्याचा श्वास आणखी कोंडत होता.

"काय झालं ?"

"सालं ते लिफ्ट बंद !"

"मी आल्यापास्नं बघतोय–एक दिवसाआड लिफ्ट बिघडलेली असते. त्या धसक्यानं मी खालीसुद्धा उतरलेलो नाही."

"कां ?"

"मला जिने चढायचे नाहीत–"

"अस्सं ? हार्टाचं ..?"

"दोनदा अ‍ॅटॅक आलाय !"

"फार लवकर म्हातारा झालास तू बाबू ! हार्ट गेलं. दात गेलेत. डोक्यावरचे केस गेलेत !"

"जाऊ देत !"

"आमचं बघ ! सगळं धड आहे" असं म्हणून त्यानं आ वासून तोंड पेचलं आणि दात दाखवले.

"दात बरे आहेत !"

"एकूण एक आहेत ! चिक्कीसुद्धा खातो ! नाही तर दुर्गी ! माझ्यापेक्षा बरीच लहान वयानं. दातांच्या कवळ्या बसवल्यात !"

"हो का ?"

"एकूण एक केस पिकलाय."

"आणि अंगानं–"

"सुका बोंबील !"

**दुर्गी आता कशी दिसत असेल याचा विचार करीत बाबूराव स्वस्थ बसले.**

**"तुला दिसली नाही ?"**

"कोण ?"

"दुर्गी !"

"नाही– !"

"ही इथं पलिकडे राहाते. आत्ता इथं वर येता येता दिसली. . पिकेट रोडला चालली होती–मारुतीला !

"म्हणूनच आलास तेव्हा ओठातल्या ओठात हसत होतास वाटतं ?"

"हट् ! आपण तिचं नाव टाकलंय् !"

"कां रे ?"

"साली मिजासखोर माणसं ! मुळा-सकट नाक कापलं तरी यांची मिजास !"

"झालं काय ?"

"होणार काय ?" असं म्हणून त्यानं तपकिरीची वाटली काढली आणि बुचावर बोट आपटत तो बसून राहिला.

"ही प्रॉपर्टी विकली त्यांनी ?"

"पपा मरायच्या आधीपास्नंच मंग्याचं चाललं होतं–विकायची विकायची !"

"तो कुठं राहातो ?"

"मंग्या ना ? तो गेलाय पार्ल्याला ! त्याचं काय वाईट ? साला लाख दीड लाख रुपये दाबून बसलाय. दुर्गीला पन्नास साठ हजार रुपये ! मंग्यानं ठकवलं म्हणून आता बोंबलते. त्यावेळी मी सांगत होतो, तर माझं ऐकलं नाही. माई थेरडी म्हणाली, तू काय स्वतःला जावई समजतोस की काय ? म्हटलं मरा ! मी नाही बोलत. . पाऊल नाही ठेवीत."

"राहातात कुठं ?"

"हे इथं पलिकडे. कसलं दोन खोल्याचं आऊट हाऊस आहे. तळमजल्यावर ! जा. . . जा. . भेटायला. . !"

त्यानं आपल्या निळ्या काचा बाबूरावांवर रोखल्या.

बाबूराव म्हणाले,

"मला काय कराचंय ?"

"छा ! मुळीच जाऊ नकोस ! भेट-ण्याच्या लायकीची माणसं नव्हेत !"

बाबूराव नुसते बघत राहिले.

"त्यांना मी एवढी मदत केली, पण साल्यांचा तोरा जात नाही !"

"एवढा चिडतोस, पण झालं काय ते सांगत नाहीस ?"

"काही सुद्धा झालं नाही !"

"तू लपव. पण मला सगळं माहीत आहे !"

बाबूरावांना काही माहीत नव्हतं. पण ते एक डाव टाकून बघत होते.

"काय माहीत आहे ?"

"माहीत आहे. "

"तिच्या घरचं. . ?" मोरोबा ओठात हसला.

ते बघून बाबूरावांनासुद्धा हसू आलं

"माझी थोडी चूक झाली हे खरं ! पण तिला, दुर्गीला एवढं चिडायचं काही कारण नव्हतं. !"

"पण खरं झालं काय ?"

"जुनी गोष्ट रे ! तिचं लग्न झाल्या-नंतर दोन तीन वर्षांची गोष्ट. मी तिथं अधून मधून जात होतो. काय काय आणा-यचं असलं तर आणून सुद्धा देत होतो. पपा, माई, मंगू. . सगळ्यांना ते घर बंद होतं. . तेव्हा मला मुक्तद्वार होतं. ! रांगणकरांनी या सगळ्यांचा धडाधड अप-मान करून सगळ्यांना घर बंद करून टाकलं होतं. दुर्गीला निरोप द्यायचा असला म्हणजे मोरोबा ! आप्पा रांगणेकरानं अपमान केला तरी मी तो गिळत होतो. कां ? आपल्याला घर बंद व्हायला नको. मला ते बंद झालं की संपलं ! दुर्गी मेली असती तरी कळलं नसतं. !"

"उगाच बडबड करायची तुझी सवय गेली नाही, मोरोबा ! नेमकं काय झालं ते सांग !"

"अरे एकदा सहज भेटायला म्हणून गेलो. लग्न होऊन दोन तीन वर्षं झाली होती. घरी कुणी नव्हतं. ही माडीवर होती. त्याच दिवशी सकाळी बॉबकट करून आली होती. आंघोळ करून केस पुसत खिडकीत एकटीच उभी होती. सालं राहवलं नाही. पाठीमागनं मिठी मारली आणि उघड्या मानेचा जरासा मुका घेतला–"

आरामखुर्चीत मागं रेलून बसलेले बाबू-राव विजेचा धक्का बसल्यासारखे एकदम पुढं झुकले.

"मग ?"



## मग मी तुझी होऊंदे—

तुझ्या डोळ्यात तरळलेलं
माझ्या डोळ्यात उमटलेलं
एकाच नादात डोलूदे
मग मी तुझी होऊंदे

तुझ्या गळ्यात नादावलेलं
माझ्या मनात फुलवलेलं
एका सुरात गाऊंदे
मग मी तुझी होऊंदे

तुझ्या चालीत पाहिलेलं
माझ्या चालीत राहिलेलं
एकाच तालात असूदे
मग मी तुझी होऊंदे

तुझं काळीज बोललं ते
माझं काळीज समजलं ते
एकात एक घोळूदे
मग मी तुझी होऊंदे

तुझ्या मनात आलं कायसं
माझ्या नादात गेलं कायसं
आपण तुपण विसरूंदे
मग मी तुझी होऊंदे

खट्याळपणात तुझ्या माझ्या
घुम्मेपणात माझ्या तुझ्या
अशीच खुमारी येऊंदे
मग मी तुझी होऊंदे

तुझ्या ओठी सुखावलेल्या
माझ्या उरी आनंदलेल्या
अमृताला न्हाऊंदे
मग मी तुझी होऊंदे

तुझ्या मनात आलं गेलं
कसं सांग तूं मला कळलं
तुलाच माझा मी समजूंदे
मग मी तुझी होऊंदे

—डॉ. सरोजिनी बाबर

"साली तडकली ! चपलानं मारीन म्हणाली. तिथनं निसटलो तो परत गेलोच नाही !"

"पण त्यात तिचं काय चुकलं ?"

"चूक माझी झाली हे कबूल ! पण तिला एवढं चिडण्याचं काहीच कारण नव्हतं. . . !"







"चल् ! बोलू नकोस ! तिनं तुझ्या तोंडात चप्पल मारायलाच हवी होती !"

"कां ? मोठी पतिव्रताच की नाही ! साला म्हातारा सासरा तर चालतो . . .!"

मोरोबाचे ओठ पांढरे फिकट झाले.

"म्हणतोस काय, मोरोबा ?"

"सगळ्यांना माहीत आहे ! भोसडीचा रत्नाकर बाहेरच्या पोरी नाचवीत होता आणि आप्पा . . . रंगेल म्हातारा . . . दुर्गीला !"

बाबूराव खुर्चीवर मागं रेलले. त्यांना वाटलं, आपलं पालपिटेशन वाढतं आहे. त्यांना हा विषय बदलायचा होता.

मोरोबा हातावरची तपकीर चिमटीत निपटून घेत होता.

"हल्ली माई काय करते ?"

"हरी हरी करते ! पपा गेले. हे गेले म्हणतात. पण त्यांनी विष घेतलं होतं असा माझा समज आहे. सासऱ्यानं दुर्गीचं काय केलं हे त्यांना कळलं तेव्हा तर त्यांनी अंथरूणच धरलं होतं ! आणि माई बिछान्यावर पडून दिवसं आणि रात्र हात-पाय आपटत होती. तिचे पाय मी आवळत होतो. तिच्या डोक्यावर माझं हिमगिरी तेल चोळत होतो, तेव्हां कुठं तिला दोन तास झोप लागायची. आठ दहा बाटल्या माझ्या गेल्या. दमडी दिली नाही. पण म्हटलं, जाऊ दे ! आपण पूर्वी जेवलोय तिथं !

. पण दुर्गीला काय. माईला काय. जाणीव नाही ! अरे, घटस्फोटाचा अर्ज करायचा तर दुर्गीची भेट घेता येईना. म्हातारा तिला कुणाला भेटू देईना ! सगळे हताश झाले. पण मी लिंबू आणि गुलाल मंतून आणला. टाचण्या टोचल्या. आणि दुर्गीच्या घरात फेकून आलो. आठ दिवसात म्हातारा आप्पा रांगणकर रक्त ओकला आणि बिछान्याला खिळला. दुसरे दिवशी दुर्गीला घेऊन आलो; पण बोलली नाही. ! नको बोलूस. !" बोलता बोलता मोरोबा अतिशय अस्वस्थ झाला.

त्यानं पुनः पुनः नाकात तपकीर कोंबली.

बाबूराव पाठीचा मणका तुटल्यासारखे एकदम पांगळे पडले. खुर्चीच्या हातांचा आधार घेऊन हळू उठले आणि पलंगावर आडवे होत अशक्तपणानं म्हणाले, "मोरोबा, मी जरा पडतो ! तू बसणार तर बैस ! नंदा आला म्हणजे चहा देईल तुला ! मी जरा पडतो. झोपतो..!"

बाबूराव डोळे मिटून पडून राहिले.

## [ ७ ]

पँट चढवून बाबूरावांनी पोटावर पट्टा आवळला.

नंदा अजून ऑफिसातून आला नव्हता. घराची किल्ली शेजारी ठेवावी की ठेवू नये अशा विचारात ते होते. पुनः पुनः वाटत होतं, किल्ली घेऊन जावं. नंदा राहील ताटकळत उभा तास दोन तास ! दुपार-पासून त्यांचा संताप वाढत गेला होता. क्रमाक्रमानं पारा चढत गेला होता. दात ठेवायचा डबा कळकटला होता. दोन तीनदा सांगितलं. पण त्यानं एकून न ऐकल्यासारखं केलं. जेवणात तेल, तूप, साखर चालत नाही हे त्याच्या लक्षात आणून दिलं. पण काय उपयोग ? हेमाच्या घरून चपात्या येतात त्यावर तूप चोपडलेलं असतं. भाजी तर तेलात लडबडलेली ! हा दहा वाजता जेवतो आणि डबा तसाच उघडा टाकून पळ काढतो. मग दुपारी ते थंड तुकडे चघळत बसावं लागतं. चावता चावता तोंड वळून जातं. गडी नं कपड धूत नाही; पण हा तोंड उघड त्याला सांगत नाही. रात्री कवळ्या ब्रशानं धुवायच्या, डब्यात पाणी ठे यचं. . एक गोष्ट करीत नाही.

त्यांच्या नाका-तोंडातून गरम वा बाहेर पडत होती. रखरखीत उन्हा फिरल्यासारखं वाटत होतं.

नंदाला अद्दल घडली पाहिजे.. त्यांनी दाराला कुलूप घातलं आणि लिफ्टकडे वळले. तेवढ्यात धापा टाके नंदा जिन्यानं वर आला. त्यांना ज हिरमुसल्यासारखं झालं. त्यांनी खिशात किल्ली नंदाच्या हाती दिली.

"कुठं जाताय ?"

बाबूरावांनी उत्तर दिलं नाही. दो हातात काठी धरून त्यांनी काठीवर भ टाकला आणि ते गप्प उभे राहिले.

"लिफ्ट बिघडलीय ! वर चढता तुम्हाला त्रास होईल. !"

"होऊ दे !" तोंडातल्या कवळ्या कटकट वाजल्या.

"एवढं काय अडलंय बाहेर जायचं!

"रोजच्या रोज लिफ्ट बिघडलेली असते. मोडून टाका म्हणावं ! ते एकदम ओरडले.

"उद्या दुपारपर्यंत लिफ्ट च होईल. !"

"मी मुळीच थांबणार नाही. प्राण गे तरी बेहेत्तर. दिवसचे दिवस ब राहायचं. असं म्हणत ते जि उतरत राहिले. तळाशी आल्यावर थ उभे राहिले. सहज गालांवर हात फि वला. दोन तीन दिवस त्यांनी दाढी के नव्हती. नागपूरचीच सवय चालू हो पावलं पुढं टाकताना त्यांना वाटलं, नि आज तरी दाढी करायला हवी होती. लि चालू असती तर वर जाऊन त्यांनी द केली असती !

रस्त्यावर येताच ते उजवीकडे वळ समोरून मोरोबा येईल अशी त्यांना भी वाटली. चष्म्याच्या वरच्या भिंगा त्यांनी दूरवर नजर टाकली. अर्ध पिकलेल्या केसांचं डो त्यांना गर्दीत दि







नाही. काठी टेकत ते चालत राहिले.

संथ चालीनं ते पिकेट रोडला आले. चप्पल बाहेर ठेवून ते मारुतीच्या देवळात शिरले. एखाद्या भक्तासारखी त्यांनी टांगती घंटा वाजवली आणि ते चोरासारखे इकडे तिकडे बघत राहिले. त्यांची छाती एकदम धडधडल्यासारखी झाली. ते बाकड्यावर जाऊन बसले. शेजारी बसलेल्या हाडकुळ्या बाईनं अंगभर पदर ओढून घेतला. थोडं अंग आवळलं. ती स्वस्थ बसली होती. मान खांद्यावर वळवून त्यांनी चष्म्याच्या खालच्या काचातून तिला निरखून पाहिलं. तिचं लक्ष नव्हतं. ओठांनी काही तरी पुटपुटत होती. बहुधा जप करीत असावी. हातात मण्यांची माळ होती. डोळे मेलेलं माणूस बघतं तशी ती कुठं तरी छताकडे बघत होती. शुभ्र पातळ नेसली होती. पातळावर ठिकठिकाणी हळदीचे डाग होते. ती सरळ चुलीकडून उठून इथं आली होती. झोपून आल्यागत तिचे पिकलेले केस विस्कटले होते. डोक्यावर मगजशुद्धी चोळल्याचा वास येत होता. हातांवर हिरव्यागार शिरा पसरल्या होत्या. गाल खोबल्यासारखे दिसत होते. डोळ्यांभोवती काळस वर्तुळं होती. सोसाटयाच्या वाऱ्यापावसात मार खालेल्या फुलझाडासारखी दिसत होती.

बाबूराव जरा जवळ सरकले. थोडे तिच्या जवळीकडे झुकले. काळीज धडधडत होतं. विलक्षण अशक्तपणा वाटत होता.

"साखरदांडेंची दुर्गी का ?"

ती एकदम गडबडली. पुनः एकदा अंगभर पदर घेऊन म्हणाली,

"हो !" पंचपात्रात पळी वाजल्यासारखी बोलली.

उजव्या खांद्याला हनुवटी चिकटवून बाबूराव खालच्या भिंगांतून पाहात होते.

तिनं एकदम मान वळवली. डोळे बारीक करून निरखून पाहिलं. काळोखात दोन काजवे लुकलुकले.

बाबूराव तोंडावर मूठ धरून एकदम खोकले.

"ओळखलंस ?"

ती नुसती बघतच होती. तिचे डोळे अद्याप काजव्यासारखेच तरंगत होते.

"मी बाबू. .बाबू सबनीस !"

"न ओळखायला काय झालं ?"

ती एकदम मोठ्यानं बोलली आणि तोंड पसरून हसली. तिनं दातांच्या कवळ्या लावल्या होत्या ते लक्षात आलं.

"असतोस कुठं ?"

"इथंच !"

"कुठं नागपूरला होतास ना ?"

"कुणी सांगितलं ?"

"मंगूनं ! मागं एकदा विचारलं होतं त्याला–"

"कां ?"

"सहज !"

सहज ! नको होता तो शब्द ! त्यांनी दातावर दात घासले.

"हल्ली इथंच असतो !"

"कुठं ?"

"तुमच्याच पूर्वीच्या जागेत–"

ती एकदम गोरीमोरी झाली. तिनं नजर वर उचलली आणि तोंड जवळ आणीत म्हणाली,

"विमा कंपनीच्या जागेत ?"

"हो !"

"तिथं कोण ?"

"नंदा राहातो. माझा मुलगा ! विमा कंपनीत नोकरीला आहे !"

ती हसली !

"कां ? हसलीस कां ?"

"मुंजीत पाहिला होता. एवढासा होता !"

"दोन महिन्यांनी लग्न आहे त्याचं !"

ती काही बोलली नाही. मांडीत हात घरून तिनं पाय वर केले आणि खालीवर हालवले. स्वतःशीच हसली. विचित्र हसली ! यावेळी काय असेल तिच्या मनात ? बाबूराव गुरफटल्यासारखे झाले.

"तुझी तब्येत कां बरी नसते ?"

"काय आग लागलीय माझ्या तब्येतीला ?" असं म्हणत तिनं तोंड कडवट केलं. स्वतःवरच चडफडली. मानेला वळसा देत तिनं पुनः पदर काढला आणि अंगभर घेतला. मगजशुद्धीचा उग्र दर्प दरवळला.

बाबूराव पळभर गप्प राहिले.

"हल्ली मंगू कुठं असतो ?" त्यांनी विचारलं.

"पार्ल्याला ! तो नि त्याची बायको. राजा न् राणी. !"

राजा आणि राणी हे शब्द तिनं चमत्कारिक जोर देऊन चावले. दात आंबल्यासारखं तोंड केलं.

"आणि तू कुठं राहतेस ? माई. ?"











"तिथंच

"कुठं ?"

"मंगूनं इस्टेट विकली. आपण नाही कमावली दिडकी. .पपांची इस्टेट विकून मोकळा! आम्ही तिथंच पाठीमागं... आऊटहौसात !"

"माई बऱ्या आहेत ?"

"थकली रे. "

"थकणार नाही तर काय ?"

"येणार... ?"

"आत्ता... ?" बाबूरावांच्या काळ-जाचा ठोका चुकल्यासारखा झाला.

"हो! माईला भेटायला. ?"

तिचे पाय अधान्तरी झुलत होते.

"आता नाही! पुनः कधी तरी येईन–"

"माहीत आहे–"

"काय ?"

"नाही येणार तू–" तिचे सुकलेले ओठ थरथरले.

"कां ?"

"तसा योगच नाही... !"

"कसला ?"

"तू आमच्या घरी येण्याचा. !"

बोलता बोलता तिचे ओठ अकस्मात पांढरे झाले.

हे बोलताना तिनं डोळयांच्या पटपट हालविलेल्या पापण्या पाहून बाबूरावांना आतून गदगदल्यासारखं झालं. ती थोडा वेळ तशीच बसून राहिली. तिच्या गळयात कढ अडकले असावेत. ते खाली जाईपर्यंत ती स्वस्थ बसून राहिली.

बाबूरावांनासुद्धा काही बोलता आलं नाही. चष्म्यावर तोंडाची वाफ टाकून ते चष्मा पुसत स्वस्थ बसले.

मग ती एकदम उठून उभी राहिली. मांडीत अडकलेल्या निऱ्या तिनं झाडल्या. ती नऊ वारी नेसली होती. ते पाहून त्यांना बरं वाटलं. तिनं अंगभर पदर घेतला आणि म्हणाली,

"उशीर झाला. आता जाते घरी ! काळोख झाला की नीट दिसत नाही !"

"मी सोडू का व्हिक्टोरियानं ?" बाबू-रावही उठून उभे राहिले.

"नको. .जाते मी !"

"कां ?"

"अरे, रोजचं आपलं आहे ते खरं !"

तिनं मण्यांची माळ हातात घोळवली. गळयात टाकली. क्षणभर उभी राहिली. बाबूरावांच्या तोंडाकडे पाहिलं. त्यांना वाटलं, तिला काही तरी बोलायचं आहे, पण जीभ घोटाळते आहे. पण ती काही सुद्धा बोलली नाही. पुनः एकदा अंगभर पदर घेतला. कास नीट केली. बरं, येते रे बाबू एवढं सुद्धा म्हणाली नाही. पायऱ्या उतरली आणि अनवाणीच चालत राहिली. पायात चप्पल घातल्याशिवायच ती आली होती.

त्यांनी वळून पाहिलं. जुन्या आंबा-डयाच्या जागी सुपारीएवढी गाठ लोंबत होती. आणि त्या गाठीतून केसांची सुटी टोकं गळली होती. कमरेतून ढिली झाल्या-सारखी दोन्ही पाय फरफटत ती कशी तरी चालत राहिली. अंगावरलं वस्त्र फेडल्या-सारखी ! वेडीवाकडी !

बघता बघता वाटलं, या वयात एखाद्या सुखासीन महाराणीसारखी दिसली असती. ही बाई. .पण आता कशी दिसते आहे ! छंदी नवऱ्यानं. .सासऱ्यानं. विट-कळलेली !

ते देवळाबाहेर पडले. बाहेरचं आभाळ भरून आलं आहे, खूप जड झालं आहे, मस्तकावर टेकतं आहे असं त्यांना वाटलं. थकवा वाढला. काठीवर जास्त भार देत ते घराच्या दिशेनं चालत राहिले.

आपल्याशी तिचं लग्न झालं असतं तर ती आता कशी दिसली असती याचा विचार करीत ते पावलं टाकत राहिले. सावित्री लग्नाच्या वेळी हाडकुळी होती. तिला आपण त्रास असा कधी दिला नाही. पण समरस होणं, एकमेकात सामावून जाणं कधी जमलं नव्हतं. तरी ती सुखी होती. आनंदी होती. अंगाबांध्यानं सुटली होती. सुखासीनतेची छाया तिच्या अंगावर पस-रली होती. लग्न कुसुमावतीशी झालं असतं तर ती नि आपण शतपटीनं सुखी झालो असतो. .नंदा वेगळा दिसला असता... तो कसा दिसला असता याचा विचार करी ते मनातल्या मनात नंदाचं रूप जुळ लागले.

घराच्या आवारात आले. वळ्हे मोरोबा नाडकर्णी उभा होता.

"बाबू, कुठं जाऊन आलास ?"

त्या प्रश्नानं बाबूराव एकदम शुद्धी आले आणि गडबडले.

"सहज ! पाय मोकळे करून.

"पिकेट रोडच्या मारुतीला ?"

बेसावध असताना तोंडावर काही त आपटावं तसा तो प्रश्न आपटला. क्षण ते मनातल्या मनातच चाचपडले.

"छे रे ! ते फार लांब आहे !" म्हणत त्यांनी हातरूमाल काढला आ जोरानं कपाळाची पाटी पुसली. आ देवळात चुकून शेंदूर लावला होता की ना हे त्यांच्या लक्षात नव्हतं. त्यांनी हातरुम पाहिला. शेंदूराचा डाग नव्हता. सुटके सुस्कारा सोडीत ते स्वस्थ उभे राहिले

पण मोरोबा आपल्याकडे संशयानं ब आहे असा त्यांना संशय आला.

"कां ? पिकेट रोडचा मारुती पावतो बाबूरावांनी मुद्दामच खडा टाकला.

पण मोरोबानं उत्तर दिलं नाही. खि ल्ली तपकिरीची डबी शोधत तो फ चमत्कारिक हसला.

"कुणाची वाट बघतोहेस ?"

"पेपरचं बिल वसूल करायचंय...

"वर येतोहेस ?"

"नाही आता.

ते ऐकून बाबूरावांना सुटल्यासा वाटलं. काठी आपटत ते आत गेले. ल लागू न देता एक एक पायरी चढत राहि

नंदानं दार उघडलं आणि विचा

"दम लागला ना ?"

"नाही विशेष. !"

"कुठपर्यन्त जाऊन आलात ?"

"जवळच. "

"देवळात ?"

बाबूराव एकदम चमकले. शंकाखोर मनानं नंदाकडे पाहिलं.

[पान १२९ वर पहा]





# दशमान पद्धतीखेरीज इतर कोणत्याही पद्धतीने विक्री करणे गुन्हा होय

| बेकायदा | | कायदेशीर |
|---|---|---|
| ~~शेर~~ | दूध | लिटर |
| ~~रत्तल~~ | धान्य, मिठाई यासारखे घनपदार्थ व तेल | किलो |
| ~~वार~~ | कापड | मिटर |
| ~~एकर~~ | जमीन | हेक्टर |
| ~~रुपये-आणे~~ | पैशाचा व्यवहार | रुपये-पैसे |

बाजूला दाखविल्याप्रमाणे धन वा द्रव पदार्थ दशमान पद्धतीनेच विकत घ्या. इतर कोणत्याही वजनमापात वस्तूंची विक्री करणे कायद्यानुसार गुन्हा ठरतो.

वजनाबाबत शंका आल्यास, वजनाच्यां तळाला भोकात शिसे घातलेले असते त्यावर मोहोर उठविलेली आहे किंवा नाही ते पहा.

लांबी व द्रवपदार्थ मोजण्याची मापे व काटे त्यावरही शिसे असते, त्यावर शिक्का असल्याबद्दल खात्री करून घ्या.

कोठेही वजन-माप कायदा व नियम यांचा भंग होत असल्याचे आढळून आल्यास नजिकच्या वजन-माप निरीक्षकास तावडतोब कळवा.

महाराष्ट्रात ठिकठिकाणी वजन-माप निरीक्षकांची कार्यालये आहेत.

दशमान पद्धतीनेच खरेदी-विक्री झाली पाहिजे

संचालक, प्रसिद्धी संचालनालय, महाराष्ट्र शासन, मुंबई.

# होरपळली

**....मालिनीचं कपाळ पांढरंफटक होतं....रडून रडून तिचे डोळेही सुजले होते....गुणवंतरावांकडे पाहून तिनं त्यांना हात जोडले तेव्हा तिचे हातही काकणांशिवाय भुंडेभुंडे दिसले आणि....**

ती वातमी घरात येऊन तास दोन तास लोटले होते, पण अवंतिकाबाईच्या कानी ती कशी घालावी, हेच कुणाला कळत नव्हतं हृषिकेशलाही—

अवंतिकाबाई सकाळपासून घरीच होत्या. बागेत काम करीत होत्या. गुणवंतरावांनी घर सोडल्यापासून त्यांनी हा बागकामाचा छंद जडवून घेतला होता–नि कॉलेज सोडून फावल्या वेळात 'फोरम ऑफ न्यु थॉट'चे काम मागे लावून घेतले होते. आज अवंतिकाबाईंना सुटी होती. कॉलेज बंद होते; पण घरातली वर्दळ चालूच राहणार होती. कॉलेजमधील विद्यार्थी, फोरमची माणसे, प्राध्यापक, लेखक, विचारवंत आणि कितीतरी माणसे. गुणवंतराव घरातून गेले तरीही घरातील गर्दीचा प्रवाह अवंतिकाबाईंनी पुढे चालू ठेवला होता.

कुणाला वाटायला नको की, गुणवंतरावांच्या मोहब्बतीखातरच 'रानजाई' बंगल्यात माणसांची गर्दी जमत असे. अवंतिकाबाईसुद्धा तेवढ्याच गर्दीने 'रानजाई' आवार गजबजत ठेवू शकतात.

इतर कुणाला नाही वाटलं तरी घर सोडून लोणावळ्याला राहात असलेल्या गुणवंतरावांना तसं वाटलंच पाहिजे. अवंतिकाबाईंनी अनेक वेळा घरात उद्‌गार काढले होते. "साहेबांचं नाव नाही काढायचं घरात यापुढं! आणि ते असताना घडत असलेली प्रत्येक गोष्ट यापुढेही घडत राहिली पाहिजे."

"पण आई, बाबा होते तेव्हाची गोष्ट वेगळी होती! त्यांना साधत असलेल्या गोष्टी आपल्याला कशा साधतील? माणसं केवळ त्यांच्या शब्दाखातर, त्यांच्या प्रेमाखातर जमायची आपल्याकडे.... आता ती कशी जमतील?" हृषिकेशने एकदा विचारलं होतं.

"कां नाही जमणार? मी जमवून दाखवते. ते असताना 'रानजाई' ज्या रूबाबात, ज्या डौलात वावरायची त्याच रूबाबात आताही वावरेल." अवंतिकाबाई सोनेरी काडीच्या चष्म्यातील आपले खुजे डोळे सतेज करीत ठामपणे बोलल्या होत्या आणि हृषिकेश गप्प राहीला होता. आपले वडील आणि आई यांच्या-बील द्वंद्व तो कळू लागल्यापासून पाहात होता. गुणवंतराव इंजिनीयर – कॉन्ट्रॅक्टर तर अवंतिकाबाई प्रख्यात प्राध्यापिका–प्राचार्या. एकेकाळी एकमेकावर प्रीती करीत एकत्र आलेल्या नि एकत्र संसाराचे गाणे जुळविण्यासाठी वचनबद्ध झालेल्या आपल्या आई-बापांचे विसंवादी सूर हृषिकेशने समजू लागल्यापासून ऐकले होते.

आणि अवंतिकाबाईनी गुणवंतराव घर सोडून गेले तरी रानजाईची कळा घालवू दिली नव्हती.

सकाळपासून अवंतिकाबाई बागेत वावरत होत्या. त्यानंतर त्या ब्रेकफास्टसाठी मधल्या दालनातल्या टेबलापाशी येतील. सकाळची वृत्तपत्रे चाळू लागतील...नि तव्हा त्यांना ती बातमी प्रथम समजेल.

गुणवंतरावांच्या मृत्यूची बातमी !

गुणवंतराव मध्यरात्री हृदयविकाराने मृत्यू पावले होते. नि रानजाईमध्ये सकाळीच ती बातमी येऊन पोचली होती. पहाटेच हृषिकेशला टेलिफोन आला होता. तो आणि त्याची बायको वरच्या मजल्यावर झोपत. हृषिकेशनेच टेलिफोन घेतला. क्षणभर तो सुन्न झाला. वडिलांच्या आठवणीने त्याचे अंतःकरण उचंबळून आले.

गुणवंतरावांचा हृषिकेशवर विलक्षण जीव. चार वर्षांपूर्वी ते मालिनीबरोबर निघून गेले तेव्हा तो हमसाहमशी रडला होता. बाबांशिवाय घर ही कल्पनाही त्याला असह्य होत होती. मालिनी-बरोबर आपण केव्हांतरी हे घर सोडून निघून जाणार, हे गुणवंतरावांनी त्यालाच प्रथम सांगितले होते. पंचवीस वर्षांचा हृषिकेश नि साठीला पोचलेले गुणवंतराव. वास्तविक मालिनी हृषिकेशच्या प्रमात पडायची. तेच तिचे वय नि तीच वृत्ती! पण ती साठ वर्षांच्या गुणवंतरावांच्या प्रेमात पडली नि गुणवंत-राव हृषिकेशच्या वयाचे बनले. समवयस्क तरुणाशी गप्पा कराव्या तशा त मुलाशी गप्पा करू लागले नि त्याच वेळी एकदा त्यांनी हृषिकेशला सहज सांगून टाकले––

"हृषि, मी घर सोडून जाणार आहे."

"कुठं जाणार बाबा तुम्ही या वयात?"

"मालिनीबरोबर कुठेही जाईन."

"आणि आई?"––

"ती राहील तिच्या घरात...हे तिचं एवढं मोठं घर...कॉलेज... पुस्तकं नि परिसंवाद...आणखी काय हवं तिला? तुला सांगू हृषि, तुझ्या जन्मानंतर गल्या पंचवीस वर्षात तुझी आई माझी पत्नी राहिलेली नव्हती. तुला हे ऐकताना विचित्र वाटेल. पण तुला इतर कुणाकडून चुकीचं, विकृत असं काही समजण्यापूर्वी मीच तुला सारं सांगून टाकलेलं बरं..."

हृषिकेश अवाक् बनला होता. बाबांनी न सांगताही खूपसं काही त्याला कळलं होतं. मालिनी त्यांच्याकडे येऊ लागली तेव्हा खुद्द अवंतिकाबाईच एकदा म्हणाल्या होत्या, "हृषिकेश! आपल्याकडे वरचेवर येणारी मालिनी तुला कशी वाटते वधू म्हणून...चांगल्या घराण्यातली मुलगी आहे...तुला शोभेल अशी सुंदर तरुणी––"

आपल्या आईला त्याला हे सांगता येईना की, मालिनी माझ्यासाठी या घरात येत नाही..ती येते ती बाबांसाठी! आणि हे तुला एका स्त्रीला कसं कळत नाही आई? अग तू अख्खा दिवस कॉलेजात नि युनिव्हर्सिटीत असतेस–कधी कधी विद्यापीठाच्या कामासाठी दौऱ्यावर जातेस तेव्हां मालिनी आपल्या घरात हक्काने वावरत असते....बाबा नि ती एका बेडरुममध्ये झोपतातसुद्धा... जियं तू नि बाबा पूर्वी झोपायचे तियं––

पण यापैकी एकही शब्द तो बोलू शकला नव्हता. मग लवकरच त्याचं अनूशी लग्न ठरलं होतं आणि अवंतिकाबाईंनी त्याची नि मालिनीची सांगड आपल्या मनातून काढून टाकली होती–पण गुणवंतरावांशी होणारी मालिनीची सलगी मात्र त्या थांबवू शकल्या नव्हत्या.

## ––मधु मंगेश कर्णिक

हृषिकेशला हे सारं आठवलं नि तो वसल्या जागी एखाद्या दगडी पुतळ्यासारखा चिकटला. त्याला उठावेसे वाटेना. आईला वडिलांच्या मृत्यूची बातमी सांगण्याचा धीर होईना.

नवऱ्याच्या मरणाची बातमी ऐकताच अवंतिकाबाईंवर कोणती प्रतिक्रिया घडेल? त्या रडतील? दुःखी होतील?

त्याला एकाएकी मालिनीची आठवण झाली. तिची काय अवस्था झाली असेल? आणि त्याला गेल्या तीनचार वर्षातले मालिनीचे नि गुणवंतरावांचे संबंध आठवले. इतर कोणापेक्षाही तोच त्या रामायणाला जवळचा साक्षीदार होता.

मालिनीच्या वडिलांनी नवीन घर बांधायचे कॉन्ट्रॅक्ट गुणवंतरावांना दिले होते; त्यावेळी तिची नि गुणवंतरावांची ओळख झाली होती. लहानखुरी लाजवट गोरीपान नि केळीच्या तलम पानासारखी मालिनी प्रथम गुणवंतरावाच्या गाडीतून हिंडू लागली तेव्हां लोकांसारखंच हृषिकेशलाही वाटलं होतं. बाप नि मुलगी एकत्र हिंडतात त्यात काय मोठंसं? गुणवंतराव मालिनीला वडिलांसारखे.....

एकदा दुपारच्या वेळी गुणवंतरावांच्या खोलीत तो सहज शिरला तव्हां ते निजलेले होते नि मालिनी त्यांचे पाय चरीत बसली होती.

तरीही त्यात हृषिकेशला गैर काही वाटल नव्हतं आपल्याला बहीण असती तर तिनेही गुणवंतरावांचे पाय असेच चुरले असते; पण परत एकदा तो अभावितपणे त्या दोघांच्या खोलीत गेला तेव्हां मालिनी चपापली होती. गुणवंतरावांचे पाय सोडन चटकन् तिने पदर सावरला होता. नजर चुकवली होती.







अनुक्रमणिका

हृषिकेशला ते विचित्र वाटले होते.

त्यानंतर ती दोघे एकदा मुंबईला एकत्रपणे गेली होती. मालिनीच्या पेटींग्जचे प्रदर्शन जहांगिर आर्ट गॅलरीत भरवण्यासाठी खटपट करायला तिला घेऊन खुद्द गुणवंतराव मुंबईला गेले होते. ती दोघे मुंबईत एका हॉटेलात एकत्र राहिली होती...कुणीतरी हे हृषिकेशला सांगितले होते...एखादी ओंगळ हकिगत सांगावी तसे!

त्यानंतर मालिनी नि गुणवंतराव यांच्याबद्दल घाणेरड्या भाषेतील कार्ड त्याला नि अवंतिकाबाईंना उद्देशून आलेलेही त्याने वाचले होते. अवंतिकाबाईंच्या हातात ते पडू न देता त्याने परस्पर फाडून टाकले होते.

एकदा मालिनीलाच त्यानं स्पष्ट विचारलं होतं आणि ती धीटपणे त्याला म्हणाली होती—

"आय इम्मेन्सली लव्ह हिम—"

"लाइक अ फादर?" हृषिकेशने उलट विचारले होते.

"नॉट ॲट ऑल! आय लव्ह हिम ॲज माय हजबंड... ॲज माय लव्हर....शपथपूर्वक सांगते मी हृषिकेश; तुझ्या म्हाताऱ्या वडिलांना मी प्रियकराचं प्रेम दिलं आहे. मला ठाऊक आहे की वयानं ते मला वडिलांसारखे आहेत पण माझं प्रेम मात्र त्यांच्यावर पत्नीचं आहे, प्रेयसीचं आहे आणि—ते अतिशय उत्कट आहे—माझ्या पेंटिंग्जवर जसं मी करते, तसंच प्रेम मी तुझ्या वडिलांवर करते—"

"पण—पण कां? माय मदर अलोन हॅज अ राईट टु लव्ह हिम ॲज हिज वाईफ—त्यांची पत्नी...माझी आई हयात असताना तू त्यांच्यावर असं कसं प्रेम करतेस—?"

"राइट यू आर हृषिकेश! गुणवंतरावांची बायको हयात आहे पण त्या बायकोचं प्रेम कधीच मृत्यू पावलंय्" एखाद्या पोरक्या मुलासारखी त्यांची अवस्था मी पाहिली नि वाटलं, त्यांची आई व्हावं नि त्यांची आई होण्यासाठी त्यांची पत्नी नि प्रेयसी होणं प्रथम आवश्यक होतं—तेच मी केलं—आय हॅव नो रिग्रेट्स—"

"पण तुझं वय नि त्यांचं वय—"

"प्रेम आणि वय यांचा काही संबंध नाही, हृषिकेश! शारीरिक आकर्षणच वाटायचं असतं तर ते तुझ्या वडिलांचं वाटण्याऐवजी तुझ्याबद्दल मला वाटलं असतं—देअर इज नो सेक्स-क्रेझ वुईथ मी"

मालिनी बोलत होती. नि हृषिकेश ऐकत होता. त्या एवढ्याशा बाहुलीसारख्या मुलीच्या अंतःकरणातला प्रेमाचा अथांग महासागर पाहून तो चकित झाला होता. तिचे एकही वाक्य खोडता येणं त्याला शक्य नव्हतं.

तेवढ्यात गुणवंतराव तिथे आले. भर उन्हात ड्रायव्हिंग करीत ते कुठल्या तरी साईटवरूनच आले होते. थकूनभागून-घामेजून—ते आले नि हाशहुश करीत खुर्चीवर बसले. मालिनीची धावपळ उडाली. तिने पंख्याचा वेग वाढवला. गुणवंतरावांच्या कपाळावरचा घाम पदराने हलकेच टिपून घेतला. नि त्यांच्यासाठी लिंबाचे सरबत तयार करण्यासाठी ती स्वतः घडपड करू लागली—घरातल्या नोकरावर न विसंबता—

हृषिकेशला आपल्या घरात आईने वडिलांसाठी असं अगत्य कधीच दाखविल्याचं आढळलं नव्हतं. हृदयस्थ प्रीती उघडी करू पाहणाऱ्या स्त्रीला वय, रूप नि परिस्थिती यापैकी कशाचेही बंधन वाटत नाही—तिला आई व्हायचं असतं. मूल न होताही मालिनी आई झाली होती, पत्नी झाली होती —गुणवंतरावांचं सर्वस्व झाली होती—हृषिकेशने त्याचा प्रत्यय घेतला होता.

त्यानंतर थोड्याच दिवसांनी गुणवंतराव घर सोडून गेले होते—

ते नि मालिनी लोणावळ्याला राहू लागले. मालिनी चित्रे काढी नि गुणवंतराव ती पाहात तासन् तास तिच्या शेजारी बसून राहात—बस्स!

अवंतिकाबाईंना जेव्हा प्रथम साऱ्याचा नीट उलगडा झाला तेव्हा त्या स्वतःचं प्राचार्यपद, स्वतःचं वय, प्रतिष्ठा नि उच्च शिक्षण सारं विसरल्या होत्या. त्यांच्यातली स्त्री प्रथम जागी झाली. त्या रडल्या, चिडल्या, बेभान झाल्या—दोन तीन दिवस आजाऱ्यासारख्या स्वतःच्या स्टडीत कोंडून राहिल्या—

## शासकीय धोरणे (आणि धोरणी राज्यकर्ते) : ४ :









नि मग बाहेर आल्या त्या निर्विकार होऊन–वादळी पाऊस पडून गेल्यावर दुसऱ्या दिवसाची सकाळ जशी स्वच्छ उगवते, तशा त्या शुभ्र वस्त्रे परिधान करून नि पचवीस वर्षांनी म्हाताऱ्या होऊन बागेत हिंडू लागल्या––

अनूला –– सुनेला अतिशय शांतपणे म्हणाल्या––"आय कुड नॉट स्टॉप इट! माझ्यातली स्त्री मी कुठे हरवूनच बसले होते इतकी वर्षे! त्याचा परिणाम भोगावा लागला मला! त्या एवढ्याशा मुलीला जे साधले ते मला साधले नाही. परहॅप्स ही वाज सेक्स–स्टार्व्हड्"

"पण तुमचं खरच प्रेम होतं बाबांवर?"

"खूप प्रेम केलं मी त्यांच्यावर" एकाएकी अवंतिकाबाईंचा एरवी करडा, रुक्ष वाटणारा आवाज ओला झाला. त्या गहिवरल्या. क्षणभरच––दुसऱ्या क्षणीच त्यांनी स्वरातला तो ओलावा जणू निपटून टाकला नि त्या म्हणाल्या––

"पण त्यांना ते कधी कळलंच नाही. किंवा ते त्यांना जाणवण्यातही मी कमी पडले असेन. पण आजही त्यांच्या आठवणीने जीव व्याकूळ होतो बघ" नि एवढं बोलून त्या गप्प राहिल्या. सुनेकडे आपण वाजवीपेक्षा अधिक बोललो असं त्यांना वाटलं असावं. कॉलेजातील विद्यार्थ्यांशी किंवा हाताखालच्या प्राध्यापकांशी एवढ्या सलगीने काय बोलायचं––

त्यानंतर तो विषय 'रानजाई' बंगल्यात कधी निघाला नाही. गुणवंतरावांचं अस्तित्व जणू 'रानजाई'नं पुसून टाकलं. अवंतिकाबाईंनी पूर्वीचीच घडी अधिक चोख बसवली. गुणवंतराव होते, तेव्हा त्यांचे स्नेही बंगल्यात येत. गप्पा, रमी, ड्रिंक्स नि वादविवाद होत. ते गेल्यानंतर काही दिवस 'रानजाई' रिकामा राहिला. बहर संपलेल्या वृक्षासारखा–पण अवंतिकाबाईंनी कसला तरी निश्चय केला होता. त्यांच्या बैठकी आता 'रानजाई'वरच भरू लागल्या. सिनटचे सभासद अनौपचारिकपणे त्यांच्याच घरी जमू लागले फोरमच्या सभा नि चर्चामंडळे अवंतिकाबाई घरीच बोलावू लागल्या–त्याशिवाय अनेक प्राध्यापक साहित्यिकही आता 'रानजाई'वर जमू लागले होते. पुन्हा वर्दळ सुरू झाली होती. माणसांची तऱ्हा वेगळी–माणसे एकत्र येण्याची कारणे वेगळी–पण जागा तीच राहिली. गुणवंतराव गेले तरी 'रानजाई'ची शान गेली असे कुणाला भासता नये होते. अवंतिकाबाई प्रयत्न करीत होत्या. त्यांना यश येत होते. गुणवंतरावांचे अस्तित्व एक नवेच जीवन त्यांनी जिद्दीने मांडले होते नि तेच जीवन त्यांच्या मनासारखे फुलले होते–बागेतल्या नव्या फुलझाडांसारखे––

बागकामाचा छंद असाच निर्माण झाला––काहीतरी नवे फुलवायचे, या इर्षेतून––

कुणाला वाटता, कामा नये गुणवंतराव गेले नि अवंतिकाबाई खचल्या––कोसळल्या. उलट गुणवंतरावांची अडगळ जाताच घर नवीन मोकळे नि प्रसन्न दिसू लागले, असे सर्वांना वाटायला हवे होते.

त्यासाठीच सारा अट्टाहास चालला होता नि तो नेटकेपणाने तडीलाही जात होता.

अवंतिकाबाई ब्रेकफास्टसाठी मधल्या दालनात आल्या. स्वैपाक्याने टेबल मांडले होते. टेबलावर ताजी वर्तमानपत्रे होती. 'सकाळ'मध्ये पहिल्याच पानावर गुणवंतरावांचा फोटो नि सभोवार काळ्या चौकटीतली बातमी होती–

हृषिकेश नि अनू वरच्या माडीवरून कावरीबावरी होऊन पाहात होती. त्यांना ब्रेकफास्टसाठी खाली येण्याचा धीर होत नव्हता. अवंतिकाबाईंनी ती बातमी वाचली म्हणजे त्यांची प्रतिक्रिया पाहून पुढे कसे वागायचे ते ती ठरविणार होती –

अवंतिकाबाईंनी प्रथम पेपर वाचलाच नाही. बागेतून आणलेली ताजी गुलाबाची फुले कुरवाळीत त्या स्वस्थ बसून राहिल्या. अर्भकाचे जावळ कुरवाळावे तशी ती फुले त्या कुरवाळीत होत्या. स्वैपाक्याने चहा ओतताच त्यांनी फुले वर्तमानपत्रांवर ठेवली नि चहा प्यायला सुरवात केली––हृषिकेश वरून पाहात होता. तो फुलांचा गुच्छ थेट गुणवंतरावांच्याच फोटोवर नकळत स्थिरावला होता.

मग यंत्रासारख्या हालचाली करीत अवंतिकाबाईंनी पेपर उचलला; नि त्या वाचू लागल्या.



अनुक्रमणिका

क्षणभंरातच त्यांच्या नजरेला ती बातमी पडली. त्यांनी मिनिटभर पेपर तसाच हातात ठेवला. पुन्हा एकवार त्या बातमी-वरून डोळे फिरविले नि त्यांनी संथपणे हाक मारली—

"हृषिकेश"—

जणू त्या हाकेचीच वाट पाहात थांबलेला हृषिकेश नि त्यांची बायको जिना मंदपणे उतरत खाली आली.

"अ सॅड न्यूज अवेट्स यू हियर!"

त्यांनी पेपर मुलाच्या हाती दिला. आधीच माहित असलेली बातमी हृषिकेशने पुन्हा नव्यासारखी वाचली नि तो चाचरत बोलला—

"पहाटेच मला कळलं. ट्रंक आला होता"——

क्षणभर सारेच स्तब्ध राहिले.

मग हृषिकेश म्हणाला, "फोनवर त्यांचे स्नेही म्हणाले की तुम्ही सारे लागलीच लोणावळ्याला निघून या. सारं तिथंच आटोपायचं म्हणतात—"

"ठीक आहे. लेट अस् गो इमिजिएटली. ड्रायव्हरला गाडी काढायला सांग. आय अॅम रेडी-" सिनेटच्या सभेत किंवा फोरमच्या चर्चेत बोलावे त्या संथपणे अवंतिकाबाई बोलल्या.

पंधरा मिनिटात त्यांची गाडी लोणावळ्याच्या दिशेने धावू लागली. गाडीत अवंतिकाबाई, हृषिकेश नि अनू—आणखी कोणाही स्नेह्यासोबत्याला बोलावायचं नाही असं अवंतिकाबाई म्हणाल्या होत्या.



अवंतिकाबाईंच्या हातात सकाळचा तो गुलाबाचा गेंद होता. ताजा टवटवीत. त्यांचं मन फार पूर्वीच्या काळात वावरत होतं. जेव्हां त्या नि गुणवंतराव प्रथम एकत्र आले. श्रीमंताघरच्या अवंतिकेनं माधुकरीवर दिवस काढणाऱ्या गुणवंताशी लग्न करायला तिच्या घरचा सक्त विरोध. त्याला न जुमानता जिद्दीने केलेलं लग्न—थाटलेला संसार आणि त्याचे हळुहळू पाण्याने भरलेले ढग विरळ होऊन कोरड्या बनलेल्या आकाशात झालेले पर्यवसान. सुरवातीला वाटलेली ती ओढ कालांतराने कुठे गेली? आपली करीयर आपण सांभाळीत राहिलो आणि गुणवंतराव आपल्या जीवनक्रमात मग्न राहिले. आपण बुद्धिमत्तेच्या उन्मादात आयुष्य घालवलं. प्रीतीचा उन्माद कधी अनुभवलाच नाही. आणि मध्ये एकही हिरवे वळण भटले नाही, जिथे आपली दोघांची चार पावले एकत्र थबकावीत, हातात हात गुंतावेत आणि सुख-दुःखाचे पोत जोडीने न्याहाळावे. एकाएकी मध्ये भेटलेल्या मालिनीने हे सगळं केलं. खरोखर गुणवंतराव मालिनीच्या सहवासात सुखी झाले असतील का? पुरुषाचं मन असं कसं असतं. गेली तीस वर्षे त्यांनी नि मी एकत्र आयुष्य घालवलं; कायावाचेमने करून एकत्र राहण्याची प्रतिज्ञा करून गुणवंतरावांनी माझा हात हातात घेतला. प्रतिज्ञा मोडणं हे पुरुषाला कसं साधतं? पण मग आपणही आपली प्रतिज्ञा मोडली नाही का? कार्येषु दासी, शयनेषु रंभा, भोज्यपु माता, यापैकी एकतरी भूमिका आपण लग्नात घेतलेल्या प्रतिज्ञेप्रमाणे पार पाडली का? मालिनीन या साऱ्या भूमिका पार पाडल्या असतील. गुणवंतरावांना सुखी केलं असेल. त्यांची अखेर तिच्याच मांडीवर झाली असेल. तसा दैवी संकेत असेल.

अवंतिकाबाईंची नजर सहज गाडीतल्या आरशात गेली. आपल्या कपाळावरचे लालभडक कुंकू त्यांना दिसले नि क्षणभर त्यांच्या सर्वांगावर एक काटा थरारला. वैधव्याची जाणीव एकच क्षण विलक्षण तीव्र झाली. हे कुंकू आता पुसावे लागणार का? कां म्हणन? या कुंकवाने काय केलंय? गुणवंतरावांशी लग्न होण्यापूर्वीसुद्धा हे कुंकू या कपाळावर शोभत होतं. ते काही त्यांच्याच नांवानं लावलेलं नाही—आणि–आणि त्यांच्याच स्वामित्वाची खूण म्हणून ते मिरवायचं असेल, तर त्याची कोणती बूज गुणवंतरावांनी ठेवली होती? एकाएकी अवंतिकाबाईंना मालिनी आठवली. ती आता काय करील? तिचं तर गुणवंतरावांशी धड लग्नही नव्हतं. ती आपलं वैधव्य कसं साजरं करील?

गाडी लोणावळा गावात शिरली. नि गुणवंतरावांच्या छोट्या बंगलीसमोर उभी राहिली. प्रथम हृषिकेश खाली उतरला. गुणवंतरावांनी आपला पुण्याचाच दिमाख इथेही कायम टिकवला होता. त्यांची बंगली छोटी होती पण सुंदर होती. बाहेर नीटनेटकी बाग होती. छोटी स्टॅण्डर्ड गाडीही [illegible]मध्ये उभी होती. त्यांचे स्नेहीसोबती बंगल्याच्या आवारात जमले होते. हृषिकेशची नि अवंतिकाबाईंची वाट पाहात थांबले होते——








हृषिकेशने गाडीचे दार उघडून आईला खाली उतरायला मदत केली. शांत मुद्रेच्या अवंतिकाबाई स्थिरपणे गाडीतून बाहेर आल्या आणि संथपणे बंगल्याच्या दिशेने चालू लागल्या.

हृषिकेशसकट सारे तटस्थ होऊन पाहात होते. गुणवंतरावांचा देह व्हरांड्यातच आरामखुर्चीवर ठेवला होता. नुक्ते झोपल्या-सारखे ते दिसत होते. अवंतिकाबाई एकेक पाऊल धीमेपणाने टाकत त्यांच्यापाशी गेल्या नि एकाएकी त्यांना भडभडून आलं. तीस पस्तीस वर्षांचा सहवास एका क्षणात बाणाच्या टोकासारखा त्यांच्या हृदयाला स्पर्श करून गेला नि त्या भळभळू लागल्या–– जन्मकाळच्या वेणा अंष्टांगांतून फिरत याव्या तसा एक आकांताचा हुंदका त्यांच्या पंचप्राणातून धावत आला नि तो बाहेर फुटणार तोच पराकाष्ठेच्या संयमाने त्यांनी त्याला मागे फिरविले. भरतीच्या लाटेला कुणा अदृश्य मंत्राने शपथ घालून मागे फिरवावे त्याप्रमाणे दुसऱ्याच क्षणी त्यांना गुणवंतरावांची अनेक उलटी रूपे दिसली––स्वतःला विलक्षण मनस्ताप देऊन घर सोडणारा हाच तो पुरुष–एका थिल्लर पोरीच्या मागे लागून सारी प्रतिष्ठा धुळीला मिळविणारा हाच तो सामान्य माणूस....आपणासारख्या प्राचार्यपद भूषविणाऱ्या, व्रतस्थ जीवनात रमलेल्या काटेकोर व्यक्तीला असं हळवं होऊन चालणार नाही. गहिंवरून चालणार नाही–आपली मॅच्युरिटी याच क्षणी व्यक्त झाली पाहिजे. कुंकू-विकू पुसण्याचा नि मंगळसूत्र काढून ठेवण्याचा वेडगळपणा तर हातून मुळीच घडता कामा नये....

अवंतिकाबाईंनी नवऱ्याच्या पार्थिव देहाकडे तटस्थ डोळ्यांनी पाहिले. गुणवंतरावांचे भुरभुरते पांढरे केस अद्याप नुक्ते उगवल्या-सारखे ताजे वाटत होते. अचानक त्या केसातून बोटं फिरवावीशी त्यांना वाटली. नकळत त्यांचा हातही पुढे झाला. पण तोही एकादा गुप्त हुकूम व्हावा तसा मागे फिरला. फक्त हातातला गुलाबाचा गेंद त्यांनी गुणवंतरावांच्या छातीवर ठेवला नि मग त्या तिथून बाजूला झाल्या. गर्दीतून दूर होत त्या एका बाजूला असलेल्या खुर्चीवर जाऊन बसून राहिल्या–त्यांना धीर द्यावा म्हणून तयारीत असलेली माणसे काही न सुचून जागीच स्तब्ध राहिली. कुणालाही अवंतिकाबाईपाशी जाण्याचा धीर होईना...

अवंतिकाबाई खुर्चीवर बसून अलिप्तपणे सारं काही नुसतं पाहात होत्या. एकदम त्यांना मालिनीची आठवण झाली. कुठं असेल ती? काय करीत असेल?

हृषिकेश आईपाशी आला नि त्याने विचारले––"आई, मंडळी विचारताहेत निघायचं का? महायात्रेला सुरवात करायला हवी–"

जवळ उभ्या असलेल्या एक प्रौढ अनुभवी बाई अवंतिका-बाईपाशी येऊन हलकेच म्हणाल्या––

"बाई, पण त्यापूर्वी तुम्ही तुमचं अहेवलेणं उतरायला हवं––कपाळावरचं नि गळ्यातलं––"

अवंतिकाबाईंनी निग्रहानं मान हालवली. मानेनेच त्यांनी त्या प्रकाराला ठाम नकार दिला.

|| बीरबलायन ||



## आहेराचे महत्त्व

**बादशहा :–अलिकडे लग्नसमारंभाला बोलावण्याऐवजी पानसुपारीला बोलाविण्याची पद्धत पडत आहे. तेव्हां लग्न-समारंभ महत्वाचा की पानसुपारी?**

**बिरबल :–वधुवरांच्या दृष्टीने लग्नसमारंभ महत्त्वाचा व आहेराच्या दृष्टीने पानसुपारी समारंभ महत्वाचा!**

## समाज नि राजकारण

**बादशहा :–समाज आणि राजकारण यांचे परस्पर संबंध काय आहेत?"**

**बिरबल :–राजकारणाचा जेव्हा खेळखंडोबा होतो तेव्हा समाजाचा जीव जातो!**

## मूर्खांचे निवेदन

**बादशहा :–मूर्खा, मी तुला एवढे शहाण्यासारखे प्रश्न विचारतो अन् तू मूर्खासारखी उत्तरे देतो आहेस?**

**बिरबलः–खाविंद, माफ करा, मी आपल्या पदरी इतकी वर्षे नोकरी करीत आहे यावरूनच मी किती मूर्ख आहे हे आपण ओळखलं असेल असं मला वाटलं होतं.**

किंचित काळ पुन्हा जड शांतता पसरली. नि मग कुणीतरी म्हणाले....

"चला तर मग; निघा आता.

आणि गुणवंतरावांची महायात्रा निघाली. हृषिकेश सोबत निघाला नि अनु अवंतिकाबाईपाशी बसून राहिली –तोच मालिनी आतून बाहेर आली. अवंतिकाबाईंची नजर तिच्यावर खिळली. मालिनीचे कपाळ पांढरे होते. तिने कुंकू पुसले होते नि रडून रडून डोळे सुजवले होते. दरवाजात उभी राहून ती गुणवंत-रावांच्या अखेरच्या प्रवासाकडे पाहू लागली. वळणाआड नाहीशा होणाऱ्या त्या महायात्रेकडे पाहून तिने भुंडे हात जोडले नि मग अवंतिकाबाईकडे पाहिले. त्यांच्या कुंकमांकित भालप्रदेशाकडे टक लावून पाहात ती क्षणभर उभी राहिली नि मग एका अनावर आवेगाने ती त्यांच्याकडे झेपावली...

आणि त्याचवेळी मघाशी शपथ घालून मागे फिरविलेला तो लालभडक हुंदका अवंतिकाबाईंच्या काळजातून उमळून बाहेर फुटला. मालिनीला कवेत घेऊन त्यांनी मुक्तपणे त्याला वाट करून दिली.

• • •

अनुक्रमणिका









मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



भर ज्वानीचा धूर डोळयावर
कळो लागली जिवबाजी
कामक्रोध हे छपावुन सोदे शिकंदर गडे पाजी
वैराग्य पलंगी शेज सवारुन
नामावर पुष्पें तर्जी
परपुरुषाची चटक लागली त्यावर मर्जी खुष माझी

—शाहीर परशराम










अनुक्रमणिका



# गणिकांची शाळा

—आनंद साधले

....नुसते रूप असून चालत नाही, तर झडप घालायचा आगाऊपणा हवा....सुंदर मोर उपाशी मरतात, पण कुरूप कावळे बळी खाऊन माजतात....रूपाचा व्यापार करताना खोट्याचा आधार घ्यायला हवा....



'समयमातृका' या आपल्या ग्रंथात गणिक कशी ओळखावी याची लक्षणे क्षेमेंद्राने आरंभीच सांगून टाकली आहेत. ती अशी—

> कुचयोः कठिणत्वेन कुटिलत्वेन या भ्रुवोः
> नेत्रयोः शामलत्वेन वेश्यावृत्तदमदर्शयत् ।।

अर्थ सोपा आहे. जिच्या स्तनांत कठिणता, भुवयांत वाकडे-पणा आणि डोळ्यात काजळ ती खुशाल वेश्या म्हणावी. आता डोळ्यात काजळ आणि भुवयाचा वाकडेपणा ठीक आहे. पण स्तनाची कठिणता म्हणजे काय? विधाता कदाचित वेश्यांच्या काळजाच्या आत खास कठिणपणा ठेवत असणे संभवनीय असले तरी तो त्यांच्या काळजाच्या वरही काही खास वेगळे तारुण्य अथवा डौल ठेवतो असे मानण कठिण आहे. अर्थात स्तनाची कठिणता याचाही संदर्भ शारीरिक कठिणतेपेक्षा अंतःकरणाच्या वृत्तीकडेच लावावयास हवा. वक्षस्थलावर जे काही धन असेल ते प्रक्षोभक उठावाने लोकांना दिसेल अशी वस्त्ररचना करणे, अशी कंचुकी वापरणे, असा पदर गाळणे हीच गणिकावृत्तीची लक्षणे असे क्षेमेन्द्राला म्हणावयाचे आहे.

भारतीय समाजशास्त्रज्ञांचे एक वैशिष्टय असे की त्यांनी समाजातील गणिकांचे स्थान निर्विवाद मान्य केलेले आहे. वैदिक वाङ्मयातही व्यभिचाराचे उल्लेख आहेत. व्यभिचार आणि गणिका-वृत्ती ही वेगळी असे मानले तरी छांद्रोग्य उपनिषदातील जबाला ही वृत्तीने गणिका होती असे मानावयास जागा आहे. पुराण-वाङ्मयात तर गणिका आहेतच. पुराणांनी समाजरचनचा जो एक आदर्श कल्पिला आहे त्यातही अप्सरांच्या रूपाने गणि-कांना स्थान ठेविले आहे. कल्पना सोडल्या आणि प्रत्यक्षात आलो तर समाजरचना आणि धारणा यांच्या नियमनाचे शास्त्र सांगणारा ग्रंथ जो कौटिल्याचे अर्थशास्त्र त्यात गणिकांचे सामाजिक हक्क, त्यांच्या उत्पन्नाच्या बाबी आणि त्यांची कर्तव्ये इत्यादी बाबतीचे सुसूत्र नियमन सांगणारे एक अधिकरणच आहे. अर्थात अर्थशास्त्रा-सारख्या ग्रंथात गणिकांना स्वतंत्र स्थान असल्यावर कामशास्त्र व साहित्यशास्त्र अशा ग्रंथात ते असावे यात नवल नाही.

ज्या समाजाच्या रचनेत गणिका ही एक व्यावसायिक म्हणून मान्यता पावलेली आहे त्या समाजाच्या साहित्यात त्या व्यव-सायाचे व्यावसायिक मार्गदर्शन करणारे साहित्यही निर्माण होणे

अनुक्रमणिका








अपरिहार्य आहे. संस्कृत साहित्यात अशी निर्मिती झालेली आहे. आठव्या शतकातील दामोदरगुप्ताचे 'कुट्टनीमत', अकराव्या शतकातील क्षेमेंद्राची 'समयमातृका' आणि त्याच्याच आगेमागे लिहिली गेलेली भोजराजाची 'शृंगारमंजरीकथा' हे असे साहित्य होय. यातील पहिले दोन ग्रंथ गेल्या शे-दोडशे वर्षात उल्लेखित केले गेले आणि तिसरा ग्रंथ तर प्रथमच १९५९ साली प्रकाशात आला याचा विचार करता असे आणखी ग्रंथ नष्ट झाले नसतील अथवा होत नसतील असे मानणे कठीण आहे. या विनाशाचे कारण बहुधा उच्चभ्रू रसिक आणि तसलेच साहित्यशास्त्रकार यांनी या ग्रंथाकडे पहाताना वाजवीपेक्षा अधिक सोवळी दृष्टी राखली हे असणे शक्य आहे.

क्षेमेंद्राची वैशिष्ट्ये सांगावयाची म्हणजे उपरोध, विनोद आणि वास्तवता हे साहित्यिक गुण आणि प्रणयी पुरुषांच्या वृत्तीचे शास्त्रीय वर्गीकरण करण्याचा क्षेमेंद्राने केलेला प्रयत्न ही होत. साहित्य-शास्त्रातील नायिकांचे सोळा हजार एकशे आठ भेदात विस्तारलेले वर्गीकरण व्यापक आस्वादाचा विषय म्हणून युगानुयुगे मिरवावे आणि क्षेमेंद्राने केलेले पुरुषांचे वर्गीकरण एक शृंगारमंजरीकथा सोडली तर उपेक्षेचा विषय व्हावे हा कदाचित पुरुषप्रधान संस्कृतीचाच एक परिणाम असणे संभवनीय आहे.

## 'समयमातृका'चा लेखक क्षेमेंद्र

**क्षेमेंद्र हा कवी अकराव्या शतकाच्या पूर्वार्धात काश्मीरात होऊन गेला. "आणि शिकवोनी काय कवी होतो ?" या प्रश्नालंकाराच्या उत्तरावर त्याची श्रद्धा नव्हती. त्यामुळे स्वतःच्या श्रद्धेला जागून सततोद्योगाने त्याने उदंड ग्रंथनिर्मिती केली व कविमालिकेत जागा संपादन केली. त्याचे सुमारे चाळीस ग्रंथ ज्ञात असून संख्या आणि विषयवैचित्र्य याबाबत त्याचा हात धरणारा दुसरा संस्कृत कवी नाही.**

**औचित्य हेच काव्याचे लक्षण असा स्वतंत्र सिद्धांत त्याने 'औचित्य विचार चर्चा' या ग्रंथात प्रतिपादन केलेला आहे. त्यामुळे पंडितात त्याला स्थान मिळाले असून त्याची प्रतिष्ठा चिरंजीव झालेली आहे. मूळ ईश्वरी प्रतिभेची देणगी कमी असल्याने अनेक ग्रंथ लिहूनही क्षेमेंद्र पहिल्या श्रेणीत प्रवेश करू शकलेला नाही. परंतु संस्कृत कवींच्या आणि पंडितांच्याही दुसऱ्या श्रेणीत त्याने स्वतःसाठी मानाचे स्थान संपादिले आहे. त्याचे जीवन म्हणजे 'केल्याने होत आहे रे' या रामदासाच्या वचनाचा पुरावाच आहे. कविकंठाभरण, रामायण मंजरी, भारतमंजरी, बृहत्कथा मंजरी, समयमातृका हे त्याचे इतर काही प्रमुख ग्रंथ होत. त्यातील समयमातृकेचा हा परिचय.**

### उसनी आजी...

समयमातृका म्हणजे उसनी आजी. उसन्या नवऱ्यासारखाच थोडासा हा प्रकार आहे. गणिकेकडे जे कामुक येतात त्यांना खंबीरपणे हाताळणारी आणि त्यांची वसुली करणारी अशी एखादी आजी घरात नसेल तर थंडीच्या दिवसात चुलाणावर बसलेले मांजर जसे हुसकूनही निघत नाही तसा गणिकेच्या घरात शिरलेला कामुकही लाथाडला तरी जात नाही. शाळेत शिस्त राखायला जशी मुख्याध्यापिका हवी तशी गणिकागृहात शिस्त राखायला ही आजी हवी. ही आजी म्हणजेच कुंटीण. ही रक्ताची नसेल तर आयत्या वेळापुरती म्हणजे त्या समयापुरती मोलाची म्हणजे उसनी नमावी लागते. अशी समयापुरती कुंटीण म्हणजे समयमातृका. अशा कंकाली नांवाच्या कुंटीणीची व तिने सावरलेल्या कलावती नावाच्या गणिकेची ही कथा आहे.

कथा घडते प्रवरपुर नगरात. इथेच कलावती रहात असते. हीच ती डोळ्यात काजळ घालणारी, वक्षस्थलाचा उठाव प्रदर्शित करणारी आणि डोळे मोडीत फिरणारी नायिका. ही अर्थात सुंदर असते. अगदी चंद्रासारखी. आपण जगाला जिंकू असा गर्व मदनाला झालेला असतो तो हिच्या सौंदर्यामुळेच.

क्षेमेंद्राने कलावतीला सुंदर म्हणूनच भागविले आहे. तिला सुकुमार वगैरे इतर काही म्हटलेले नाही. कारण संस्कृताच्या सौंदर्यशास्त्राची सुकुमारता गणिकेला पेलणे कठीणच. या शास्त्राची सुकुमारताही उत्तम, मध्यम, अधम अशी असते. थंडीवारा न सोसणारी पांढरपेशा रमणीची सुकुमारता ही अधम होय. पतीच्या प्रणयभऱ्या नाजूक हाताच्या स्पर्शानेही कोमेजणारी नाजुकता ही मध्यम सुकुमारता. फुलाचाही स्पर्श सहन न होणारी कालिदासाच्या इंदुमतीची सुकुमारता ही उत्तम होय. गणिकेला ही सुकुमारता पेलणारी नव्हे.

कथेला आरंभ होतो तेव्हा कलावती गच्चीत उभी असते. रस्त्यातून गणिकांचा गुरू आणि मित्र असा शंख नांवाचा नापितराज चाललेला असता त्याच्या अंगावर वरून थुंकी पडते. शंख शरदकालातील माजलेले बेडूक खाऊन फुगलेल्या बोक्याप्रमाणे घेरेदार असतो. त्याचे विस्तृत टक्कल तांब्याच्या तापलेल्या मडक्याप्रमाणे चकचकीत असते. मुंडावळ्या बांधलेल्या असाव्या तशी या टकलाभोवती एक केसाची गोल मालिका असते. या देहाचा आकार असा की वरून काही पडले तर ते त्यावर न पडणे कठीणच. त्यामुळे चावलेल्या विड्याचा वर्षाव होताच तो वर पहातो; तेव्हा त्याला कलावती दिसते.

त्याच्या लक्षात येते की ही मुद्दाम थुंकलेली नाही. बिचारी विमनस्क आहे. गणिका कशी हवी! सदा नाचती, गाती, विजेसारखी लवलवती! म्हणजेच मेखला रुणझुणणार नूपूर, झणाणणार. पण शंखाला कलावती दिसते ती मलूल, ओढलेली. तिच्या मेखलेच्या क्षुद्रघंटिका जणू भिवूनशा तिच्या नितंबाला चिपकलेल्या असतात; चूप असतात. केशरकुंकुम नसते; अंगराग नसतो. तेव्हा शंख वर जाऊन चौकशी करतो. त्याला कळते की गणिकांवर डोळा ठेवणाऱ्या हलकट वैद्याने तिच्या आजीला मारून टाकलेले असते. कुंटीणीचा हमखास काटा काढण्याचा या वैद्याचा उपाय मोठा लक्षणीय आहे. कुणाला






वाटेल त्यान तिला विष दिले. चुकीची कल्पना. तो हुशार माणूस असे काही करीत नसतो. तो फक्त उत्कृष्ट मिठाईचा एक हारा भरून कलावन्तीला भेट पाठवितो. कलावती कामुकांच्या रंजनात असते. आजी हावरेपणाने ती मिठाई पोट फुटेतो खाते आणि म्हातारपणात ते खाणे सहन न झाल्यान अपचन होऊन मरते. असा हा सोपा निर्धोक मार्ग. या हमखास मार्गाने आजी गेल्यावर कलावतीचे घर धर्मशाळा बनते. हा हवा, तो नको, म्हणावयासही तिला फुरसत नसते. तिचा धंदा चालत असतो पण वसुली बुडत असते. त्यामुळे वैतागून ती खिन्न झालेली असते आणि तिने गाव सोडावयाचे ठरविलेले असते.•

ह्या तिचा वेडा निर्णय ऐकून शंख तिला सांगतो की गणिकेचे सौंदर्य मोफत लुटणारे हरीचे लाल फक्त प्रवरपुरात असतात आणि इतरत्र नसतात असे नव्हे. कुत्रीमागे कुत्रे तसे गणिकेमागे कामुक हे कुठेही असणारच. त्याला उपाय म्हणजे या कुत्र्यांच्या पाठीत दांडा घालणारी आजी हवी. कुंटीण हवी. रक्ताची असेल तर रक्ताची; नाहीतर मोलाची. आणि अशी कुंटीण आणून देण्याचे शंख मान्य करतो.

## आदर्श कुंटीण कोणती?

आदर्श कुंटीणीचे वर्णन क्षेमेंद्राने 'स्थिरस्थिती' असे केले आहे. मोठा बोलका शब्द. कुंटीण ही अशी वृद्ध हवी आणखी इतकी बेफाट फुगलेली हवी की तिला जागेवरून हलणे कष्टाचे व्हायला हवे. साचीव धनाच्या राशीवर बसून फणा काढणारी नागीण त्या धनाचे रक्षण करीत असावी पण तिचा त्यात काही स्वार्थ नसावा तशी गणिकेच्या रूपधनाची देखभाल करणारी कुंटीण सुद्धा कठोरपण दंड काढून बसत असली तरी त्या गणिकेच्या व्यवहारात तिचा वासनिक स्वार्थ दूरान्वयानेही गुंतण्याची शक्यता असता नय. गणिकेने लायाडलेला अगदी नादान भिकारी कामुक सुद्धा स्त्री म्हणून तिच्याकडे पाहू शकेल असे कुंटीणीत काही असता कामा नये. ती विरूप हवी, गलिच्छ हवी; येरडी हवी; घृणास्पद हवी.

अर्थात् प्रत्येक कुंटिण ही तिच्या वयात गणिकाही असतेच. त्यावेळी ती प्रमदा असते, रूपवती असते, सुगंधिनी असते, सुस्तनी असत, नितंबिनी असते, मोहिनी असते, विलासिनी असते, सारे काही असते. मग ज्या या स्वरूपगर्विता मनोहारिणीच्या पायाखाली एकदा मोठमोठाल्या प्रतिष्ठित कामुकांच्या काळजाच्या पायघड्या पडलेल्या असतात त्याच या स्त्रीचे आता हिडिस आणि विटंबित रूप कसे होते? क्षेमेंद्राने त्याच्या कारणाचे मोठे विस्तृत असे, क्वचित करुणाजनक, क्वचित उपरोधजनक वर्णन केले आहे.



## कठिण काल

गणिकेच्या जीवनात एक काल असा येतो की तिचे तारुण्य ओसरते. तिची चलती संपते. कुंटीण म्हणून तिच्या हातात कुणी सर्वस्व सोपवावे असा काल यावयास अजून बराच, कदाचित तीस चाळीस वर्षांचा अवधी असतो. हे इतके दीर्घ जीवन काढावयाचे कशाच्या आधारावर ? त्यासाठी पोट जाळावयाचे जे अनेक उद्योग अशा स्त्रीला करावे लागतात त्याचे अतिशय वास्तव आणि आजही रस्तोरस्ती दिसणारे चित्र क्षेमेंद्राने रंगविलेले आहे.

विलासाचा व्यवसाय आता संपलेला असला तरी अडल्यापडल्याचा आंबटशौक भागू शकतो. मग कुठे बाजारात चाललेल्या कुण्याबरोबर रस्त्यावरील झुडुपाआड अथवा आडबाजूच्या देवळाच्या पुजाऱ्याबरोबर देवळाच्या गाभाऱ्यात असे व्यवहार चालतात. बिदागीची अट नसते पण चोरीवर नजर असते. अनेक वेळा नावे बदलली जातात. जमले तर कुणी गुराखी, शिपायी, पोलीसपाटील, सारथी अशांची रखेली म्हणून दिवस काढले जातात. मिळेल तेव्हा मिळेल ते खाल्ले जाते. पोटाचा आणि कमरेचा व्याप वाढत जातो. उरलासुरला व्यापार ज्यावर करावयाचा ते धन जिरत असते. तिकडे लक्ष द्यावयास वेळ नसतो. अजूनही थोडी मोहिनी असते. त्या मोहिनीच्या जोरावर झगडे लावले जातात. सूक्तासूक्त काही नसते. बापाची रखेली म्हणून रहात असता मुलगा भटीला आला तर त्याचेही स्वागत केले जाते. हक्काच्या बायका असतात त्यांच्याशी चढाओढ केली जाते. वशीकरण, जादूटोणा, मंत्रतंत्र यांचा आसरा घेतला जातो. याराला काही करून संतुष्ट राखण्याची धडपड असते.

वय वाढलेले असते, पण वासना ओसरलेल्या नसतात. वासनांचा शमनाचे राजमार्ग उघडे नसल्यामुळे वाटेल त्या मार्गानी त्या शमविल्या जातात. हे मार्ग अनेकदा पशूंनाही लाज वाटावी असे असतात. कधी कधी त्यांची स्वतःलाच लाज वाटते. त्यामुळे वरकरणी जादा सतीत्वाचा, धार्मिकतेचा, सतीणपणाचा बुरखा घेतला जातो. जितके लुटता येईल, चोरता येईल, लाच देऊन मिळविता येईल तेवढे लुटले जात असते.

क्षेमेंद्राच्या काळी शाक्त मठांचा प्रभाव असावा. शाक्तांना स्त्री ही फक्त स्त्री असली म्हणजे पुरत असल्याने क्षेमेंद्राची ही महामाया शाक्त मठात जाते. तेथे केस रंगवून आणि स्तनावर घट्ट पट्टी बांधून ती जातील तेवढे दिवस घालविते. तेही संपल्यावर








तिचा प्रवेश तुरुंगात होतो. तेथील बुभुक्षित कैदी आणि पहारेकरी याना ती पद्मिनीच भासते व तिची काही दिवस चंगळ होते. हेही दिवस संपतात. खुळचा ओढीने तिच्या जवळ जावे आणि तिची वस्त्रे दूर होताच किळस येऊन मन विटावे असे घडू लागते. तेव्हा ती स्वच्छ भीक मागू लागते. एका गोसावड्याची साथ धरून ती गोसावीण वनते. भीक मागतानाही कोणी निर्बुद्ध गरजू दिसला की ती डोळ्याला डोळा भिडवितेच. इतर काही नाही तरी चारदोन मुठी भिक्षा तरी जास्त मिळते. कुठच्या तरी कोनाने तिचा कुठचा तरी अवयव पाहून अजूनही क्षणभर ठल्लू होणारे बुद्दू तिला भेटतातही.

## कुंटीणीचा व्यवसाय प्रारंभ

गोसाव्याचीही संगती सुटू येताच ती त्याचीही चोरी करून पळून जाते. भिक्षुणी वनते. भगवी कफनी घालते. डोक्याचे मुंडण करते. कुंटीणीच्या व्यवसायाचा थोडा आरंभ इथे होतो. कुलीन स्त्रियांच्या नजरेतील असमाधान ओळखून ती त्यांना कुमार्गाला लावण्याची मध्यस्थी करू लागते. स्वत: सिद्ध आहोत असे ढोंग करून इतरांसाठी जादूटोणा करू लागते. स्वत: पूज्य वनते. स्त्रीदेवते भोग म्हणा की स्त्रीदेहाचे सामर्थ्य म्हणा अशा विपरीत अवस्थेतही तिला कामुक भेटत असतातच. हाही व्यवसाय थकला की ती पुन्हा नगरात येते. मुंडण लपविण्यासाठी केसांचा टोप घालते. पुढे दाई म्हणून काम करते. कुठे भांडी घासते, कुठे वाळंतपणा करते. कुठे मेंढ्या पाळून लोकर, चामडी, दूध विकते व भाजी करून विकते. कधी तयार लाडू, मिठाई घेऊन तिचे लहान भाग करून विकते. हे व्यवहार कधी चालत नसतात तेव्हा चोरी व भीक असतेच.

भीक मागण्याचेही अभिनव प्रकार असतात. आज जशी सत्यनारायणाच्या पूजेसाठी अथवा मर्तिकासाठी भीक मागितली जाते तशी ती एखादी मुलगी वरोवर घेऊन तिचे लग्न करावयाचे आहे म्हणून भीक मागते. सुपातून देव फिरवून त्याचा निमाल्य आणि चणेफुटाणे प्रसाद म्हणून विकते. खोटे फासे वगैरे चोरट्या वेकायदा वस्तूंची ने-आण आणि व्यापार करते. उन्हाळ्यात अगर यात्रेत पाणपोई चालवून चुकल्या माकल्या मुलांचे दागिने चोरते. जुनी पंचांगे मांडून अडाणी लोकांची भविष्ये सांगते, लग्ने जुळविते. कधी मौन व्रत धारण करून अथवा गूढ वोलून बुवाबाजी करते. कधी संपूर्ण नग्न फिरून कापालिकांची देवता म्हणून मिरवते. आश्चर्य म्हणजे ती अशा अवस्थेत असता काही मंत्रीही तिच्या नादी लागून तिचे भक्त होतात व तिची चंगळ चालते. शत्रूचे सैन्य चालून आले तर मी त्यांचे स्तंभन करीन असे ती सांगते आणि मंत्री ते ऐकततही. त्यामुळे नागव्याने ती पालखीतून मिरवते. प्रत्यक्ष सैन्य येते तेव्हा ती अर्थातच पळून जाते.











अनुक्रमणिका

क्षेमेंद्राच्या कुंटीणीची तयारी अजून पुरेशी संपलेली नाही. तिचे सारे उद्योग द्यावयास इथे जागा नाही. पण त्या उद्योगांचे वर्णन वाचताना मन थक्क होते. आज विसाव्या शतकात केवळ दुसऱ्याच्या फसवणुकीवर आधारलेले जे पोट जाळण्याचे बिनबुडाचे धंदे भोवती चालताना दिसतात ते कमीअधिक प्रमाणात त्याच स्वरूपात क्षेमेंद्राच्या काळीही चालत होते आणि लाचार दरिद्री भिकाऱ्यापासून सुप्रतिष्ठित राजपुरुषापर्यंत सारे या धंद्याचा कच्चा माल बनत होते हे पाहिले म्हणजे आविष्काराची पद्धत बदलली असली तरी माणसाचा मूळ पिंड कसा सनातन आहे हे दिसते आणि मन मुग्ध होते. आज कुठे एखादी सडलेली ठार वेडी भिकारीण गरोदर दिसत तरी ती क्षेमेंद्राच्या काळीही दिसत होती. थेरड्या मुंडण केलेल्या भिक्षुणीवर भाळणारे कामुक तेव्हा होते, तसेच ढोंगी संतांच्या नादी लागणारे राजमंत्रीही तेव्हा होते. क्षेमेंद्राच्या वर्णनाला सुद्धा स्थलकालाच्या मर्यादा पडलेल्या असणारच. त्याच्या काळी चालणारे सारेच उद्योग त्याने वर्णिले असतील असे नाही. पण त्याने जे वर्णन केले आहेत त्यात फसविणारे आणि फसून घेणारे यांचे जे दर्शन होते ते आजही पटावे इतके वास्तव आहे.

**शासकीय धोरणे (आणि धोरणी राज्यकर्ते) : ३ :**




## ...अखेर कुंटीण झाली

असो! ही महामाया अखेर हत्तीण बनते तेव्हा तिचे नाव कंकाली असते. शंख नापित तिला घेऊन येतो आणि कलावती उसनी आजी म्हणून तिची नेमणूक करते. कंकाली आपल्या कार्याचा तावा घेते ती वेळ संध्याकाळची असते. क्षेमेंद्राने संध्याकालीन निसर्गाचे वर्णन गणिकांच्या मोहल्यात चालणाऱ्या घटनांच्या उपमांनी काव्यात्म केले असून प्रत्यक्ष मोहल्याचे वर्णन वास्तवाने केले आहे. या मोहल्यात कामुक लोकांचा राबता सुरू होतो. दाराआड कानोसा घेणाऱ्या कुंटीणी गवताची काडी वाजली तरी कान टवकारतात. 'या, तुम्ही काही नवे नाही'. अशाच शब्दात नवागताचेही स्वागत होते. कुठे आगाऊ द्रव्य दिलेल्या दोघांना एकमेका नकळत दोन ठिकाणी वाट पहात बसविलेले असते आणि प्रत्यक्षात तिसराच गणिकेशी रंग खेळत असतो. कुठे गल्लीच्या तोंडाशी दिसणारे मोठे गिऱ्हाईक आपणाकडे येत आहे अशा आशेने गणिका छोट्या गिऱ्हाईकाला घालवून देते आणि मग मोठे गिऱ्हाईक तिसरीकडे गेले म्हणून रडत असते. कुठे एकदा सुख भोगून समाधान न झालेला कामुक त्याच मोबदल्यात पुन्हा सुख मिळावे म्हणून लाडीगोडी लावीत असतो. 'माझी हरकत नाही हो, पण आई रागावेल' म्हणून गणिका त्याला मागच्या दरवाजाने बाहेर लोटत असते व तो पुन्हा पाळी लावण्यासाठी पुढील दारी जात असतो. कुठे उचलेल एवढा धंदा स्वीकारून झाला की नव्या कामुकाला सखीकडून शेजारणीकडे पाठविले जात असते. कुठे त्याच गणिकेशी आपली पाळी प्रथम लागावी म्हणून कामुक भांडत असतात. कुठे ज्याला बराच वेळ थांबावे लागणार आहे असा कामक उतावीळ होऊ नये म्हणून कुंटीणी त्याला रंगेल कथा सांगून गुंगवीत असतात. कुठे नवीन कामुकासमोर 'आज एवढेच पैसे आहेत. क्षमा करा' असे म्हणून गणिकेचीच माणसे चौपट पैसे देतात व ते पाहून तो नवा कामुकही अधिक पैसे देतो. कुठे अमुकच गणिकेवर लट्टू झालेला कामुक आज ती दुसऱ्यासाठी राखून ठेवलेली आहे अशा सबबीवर लुटला जातो. किती आणि किती! घराघरातील वेगवेगळ्या अवस्थांचे वर्णन क्षेमेंद्र करतो ते कुठच्याही गणिकांच्या मोहल्यात धंद्याच्या वेळी चक्कर मारली तर पटणारे आहे. या वर्णनात ब्राम्हण, व्रती, तापसी असे चोरून गणिकेकडे जाणारे लोक, कामुकांचा राबता संपल्यावर शिळ्या शिणलेल्या गणिकांकडे जाताना दिसतात. त्यांचा जाण्यायेण्याचा मार्गही राजरस्ता नसतो. ते मागील बाजूने शौचकूपांच्या हारीतून तोंड चुकवून जात असतात.

## खोटा नखरा हीच गणिकांची शक्ती

कंकाली येते. ती कलावतीच्या शिक्षणाला आरंभ करते. सारे देव मूर्ख हा तिचा पहिला धडा आहे. त्यातही विधाता महामूर्ख. कारण त्याने हत्तीच्या अंगावर लोकर ठेवावयाची ती मेंढयाच्या



अंगावर ठेवली. कोहळ्यात तेल ठेवावयाचे ते तिळात ठेवले. चिरकालिन काठिण्य तरुणीच्या स्तनात ठेवावयाचे ते दगडात ठेवले. या क्षणभंगुर विश्वात गणिकेला जीवन कंठायचे असते ते कालाशी शर्यत खेळत. मूर्ख देवांनी उत्पन्न केलेली मूर्खता हेच तिचे भांडवल असते. कामुक हे मूर्ख असतात. पान खाऊन त्यांच्या अंगावर खुशाल थुंकावे आणि 'राजा, मी मुद्दाम नाही रे थुंकले' म्हणून त्यांच्या गळी पडावे. ते लगेच फसतात. त्यांना सुख द्यायचे नसेल तर कंबर दुखत आहे असे म्हणावे म्हणजे ते गधडे रात्रभर अंग चेपून स्वखर्चाने सेवा करतात. खोटा नखरा हीच गणिकांची शक्ती असते. तिने सत्याच्या नादी लागू नये. दान देणारा वाणी, नम्रपणे वागणारा गुरू, लाच न घेणारा कारकून आणि खोटे न बोलणारी गणिका यांचा विनाश ठरलेलाच. कुलस्त्रीने मद्यपान करणे आणि गणिकेने खरे वागणे ही दोन्ही महापापे होत. गणिकेने असे फसवावयाचे असते ती की जो फसतो त्यानेही तिच्या फसविण्याचे कौतुक करावे. तिने देवानांही व्रतात व नवसात फसवायचे असते तिथे कामकांची काय कथा !

धन हेच श्रेष्ठ सामर्थ्य आहे. ते संपादण्याचे गणिकेचे साधन म्हणजे तिचे तारुण्य. या तारुण्याविषयी कंकाली म्हणते,

"तरुणीच्या मखावर कमले फुलतात ती चार दिवस. तिच्या वक्षस्थलावर चकोर पक्षी उडतात तेही चार दिवस. तिच्या नितंबावर मोराचा पिसारा फुलतो तोही चार दिवस आणि त्रिवलीने शोभणाऱ्या उटिपोटाच्या खोलगटीत राजहंस पोहतो तोही चारच दिवस. वसंतात उपवने फुलतात : फक्त दोन महिन्यांसाठी. तसेच स्त्रीचे तनुसौंदर्य. शारदीय निशा चंद्रप्रकाशात न्हातात, फक्त तेवढ्यापुरत्याच, तशी स्त्रीच्या मुखाची शोभा. वर्षा ऋतूत मेघ डौलाने आकाशावर चाल करतात तेवढ्यापुरतेच, तसाच स्त्रीच्या स्तनाचा डौल. यौवनाचे तेजच मळी क्षणभर चमकून जाणाऱ्या विजेसारखे. स्तनाची पुष्टता हीच स्त्रीची सामुग्री ती दिवसा दोन दिवसात संपली असे वाटणारी. ती आहे तोवरच तिच्या व्यापाराची दिवाळी करून घेतली पाहिजे.

"नुसते रूप असून चालत नाही. झडप घालायचा आगाऊपणा हवा. सुंदर मोर उपाशी मरतात आणि कुरूप कावळे बळी खाऊन माजतात. पौर्णिमेचा सिधा चंद्र क्षय पावतो पण द्वितीयेची वाकडी चंद्रकोर वाढते. गणिकेने रूपाचा व्यापार करताना नेहमी वाकडे व्हायला हवे. खोटे व्हायला हवे."

### ग्रंथाचे खास वैशिष्ट्य

कंकाली असा उपदेश करीत करीत एका खास विषयाशी येते. हा विषय म्हणजे कामुकांचे वर्गीकरण. हे वर्गीकरण या ग्रंथाचे एक खास वैशिष्ट्य आहे. कंकाली म्हणते,

"पूर्वभावपरीक्षैव कार्या यत्नेन कामिनाम् ॥
ज्ञातरागविभागानां कर्तव्यो त्यागसंग्रहो ॥१॥

(पहिल्यांदा कामकाच्या प्रणयभावनची जात मोठ्या प्रयत्नाने ओळखून घेतली पाहिजे. तो कोणत्या प्रकारच्या प्रेमिकात मोडतो हे पाहून मगच त्याला त्या प्रमाणात जवळ केले पाहिजे अथवा दूर लोटले पाहिजे.) आणि त्यानंतर ती कामुकांचे विस्तत वर्गीकरण करते.

संस्कृत कामशास्त्राला पुरुषांचे शश, वृष, इत्यादी वर्गीकरण ज्ञात आहे. हे अत्यंत स्थूल असे शारीरिक वर्गीकरण असून ते विशिष्ट अवयवाच्या आकारावर आधारलेले आहे. साहित्यशास्त्राला धीरोदात्त, धीरललित इत्यादी दुसरे एक नायकाचे वर्गीकरण ज्ञात आहे. हे व्यक्तीच्या स्थायी स्वभावावर अवलंबून असून त्यामुळे त्याला स्वाभाविक वर्गीकरण म्हणता येईल. याशिवाय साहित्यशास्त्राच्या दृष्टीनेही आणखी एक वर्गीकरण संभवते. या शास्त्रात शृंगार नायिकांचे जे सूक्ष्म वर्गीकरण आहे ते विशिष्ट परिस्थितीतील नायिकेच्या मनःस्थितीवर आधारलेले आहे. उदाहरणार्थ खंडिता नायिका घेतली तर तिच्या भेटीला आलेला नायक हा दुसऱ्या स्त्रीशी सुख भोगून आलेला असतो. अशा या नायिकांचे जे नायक असतात त्यांचीही मनःस्थिती त्या त्या परिस्थितीला अनुसरून वेगवेगळी असणार नाही काय ? मुग्धा नायिकाच घेतली तरी तिची पहिली भेट घेणारा अनुभवी नायक आणि अननुभवी नायक यांच्या मनःस्थितीत भेद असणारच. पूर्वोक्त खंडितेला भेटायला आलेला नायक आणि अभिसारिकेची प्रतीक्षा करणारा नायक यांची मनःस्थिती वेगळी असणार व प्रतिक्रियाही



## कोल्हापुरचे मर्द मराठे

कोल्हापुरचे मर्द मराठे शूर अम्ही फाकडे
दौलत अमुची लाख बिघ्यांची, जाउ नको ग पुढे !
तलवारीची धार आमुची, वीज चमकली रणी
सर्दारीचा तुरा शिरावर अजुनी झळके गुणी !

बोलशील का चार अक्षरं अमुच्यासंगं जरा
जीव जाहला खुळा, ळळा तू लाविलास अंतरा !
फुलाफुलांचा अंचल चंचल फडफडतो केवढा
घमघमतो ग तुझ्या उरीचा मत्त मदनकेवडा !

तनूमनावर गंध धुंद ग कैफ चढे लोचनी
आंब्याचा तव ओठी मोहर, घ्यावा वाटे मनी
वळशिल माग विणशिल धागे प्रीतीचे का तरी ?
तुझीच मूर्ती हृदयावरती राज्य राजसे करी !

नीज आमुची सखे गळाली पिकल्या पानापरी
नवस्वप्नांचे जहाज बुडले कुठल्या ग सागरी ?
दौलत अमुची लाख बिघ्यांची तुला वाहिली गडे
कोल्हापुरचे मर्द मराठे शूर अम्ही फाकडे !

—सूर्यकान्त खांडेकर

वेगळी असणार. म्हणजे जितक्या नायिका तेवढेच नायकही असणे संभवनीय. पण शठ, धूर्त अशी काही विशेषणे देण्यापलीकडे नायकांचे असे वर्गीकरण झालेले नाही. क्षेमेंद्राने जे सूक्ष्म आणि विस्तृत वर्गीकरण दिलेले आहे ते याहून वेगळयाच प्रकारचे आहे. या वर्णनाप्रमाणे कामुकाचे ८x८x८x८x८x८x८x८x१६ इतके असंख्य भेद होतात.

### कामुक पुरुषांचे वर्गीकरण

या भेदांची स्थूल कल्पना आणून द्यावयाची तर एक उदाहरण घेऊ. एखादा पुरुष असा असतो की सहजी एखाद्या स्त्रीचा सहवास मिळाली तर तो त्याचा फायदा घेईल. पण दुष्प्राप्य स्त्रीच्या प्राप्तीसाठी तो प्रयत्न करीत बसणार नाही. या उलट दुसरा पुरुष असा असतो की जो सहज मिळेल त्याकडे पहाणार नाही; परंतु दुष्प्राप्य असेल तिच्या मागे लागेल. क्षेमेंद्राने असे आठ प्रकार दिले असून त्यांना तांत्रिक नावेही दिली आहेत.

यातील कुठच्याही एका प्रकारचे पुरुष घेतले तरी त्यात पुन्हा असे असते की कुणाच्या वृत्ती सुगंधाने फुलतात, कुणाच्या संगीताने बहरतात, कुणाच्या चांदण्याच्या दर्शनाने मोहरतात, कुणाच्या प्रत्यक्ष स्पर्शानेच चळतात. असेही आठ प्रकार. मराठीतील 'मधुराभक्ती' अथवा इंग्रजीतील 'प्लेटॉनिक लव्ह' हाही या आठ विभागातील एक प्रकार. यांनाही पुन्हा तांत्रिक नावे आहेत.

आता यातीलही कोणत्या एका प्रकारचे पुरुष घेतले तर त्यातील कुणी वागताना हळुवार वागतात; सहचारिणीला शारीरिक पीडा दिल्याशिवाय कुणाची तृप्ती होत नाही, कुणाला विकृत कृती करण्याची हौस असते. अशा प्रकारच्या आणखी आठ विभागात वर्गीकरण.

कुणी शृंगार हा गोपनीय मानतात. कुणी स्वतःच्या सहचारिणीची रहस्ये प्रकट करतात. कुणाला दुसऱ्याची रहस्ये ऐकून स्फुरण येते. अशा आणखी आठ विभागात पुन्हा वर्गीकरण. अशा प्रकारे कामुकांच्या कामुक प्रवृत्तीचे पृथक्करण आणि वर्गीकरण क्षेमेंद्राने दिलेले आहे. या वर्गीकरणाला काही अर्थही आहे. प्रकट जीवनात व्यक्तीची जी मानसिक प्रकृती असते तीच कामजीवनात असेल असे नाही. बाहेर शूर असणारा पुरुष पत्नीला भीत असेल. बाहेर क्षुद्र दिसणारा पुरुष कामजीवनात पराक्रम गाजवीत असेल. बाहेरचा आचारशील पुरुष कामजीवनात विकृत असेल. बाहेरचा स्वच्छ पुरुष कामजीवनात गलिच्छ असेल. बाहेरचा रांगडा पुरुष कामजीवनात रसिक असेल. बाहेर नामजप करणारा या जीवनात अश्लील बोलत असेल. ती प्रकृतीच वेगळी असते. त्यामुळे वर जी शारीरिक, स्वाभाविक अशी वर्गीकरणे झाली त्यांच्या तुलनेने क्षेमेंद्राच्या या वर्गीकरणाला 'प्राकृतिक वर्गीकरण' म्हणावयास प्रत्यवाय नसावा. त्या दोन वर्गीकरणापेक्षा हे वर्गीकरण अधिक सूक्ष्म आहे, विस्तृत आहे आणि कदाचित मौलिकही आहे.

अशा वर्गीकरणातून स्वतःच्या नादी लावावयाच्या पुरुषाची जात ओळखली की मग त्याला जवळ करणे वा उडवून लावणे चुटकीसारखे शक्य होते. रस वाटला तर कामुक जवळ येणार. विरस झाला की विटणार. कामुक नको असेल तर त्याच्या प्रवृत्तीला न रुचणाऱ्या गोष्टी केल्या की तो गेलाच म्हणून समजावे. गंधवेड्या कामुकाजवळ आंघोळ न करता व लसूण खाऊन गेले तर त्याचे उद्दीपन होणार नाही. तो तात्काळ पळून जाईल. घामटपणातून प्रेरणा घेणाऱ्या कामुकाच्या प्रेयसीने अंगरागाचा शृंगार न

[ पृष्ठ ११४ वर पहा ]





अनुक्रमणिका

'विडा न रंगे कातविणं', 'धार', 'नर', 'क्षणाची सोबत' इत्यादि एकाहून एक सरस अशा 'दीपावली'तून गाजलेल्या कथांचे लेखक श्री. अच्युत बर्वे मोजकेच लिहितात; पण त्यांच्या प्रत्येक साहित्यकृतीवर त्यांचा असा वैशिष्ट्यपूर्ण ठसा कायम ठेवतात. त्यांनी बऱ्याच दिवसानंतर 'दीपावली'च्या रजतमहोत्सवी अंकासाठी लिहिलेली ही खास कादंबरिका —

गोष्ट आमच्या चौघांची आहे.

मी, माझी बायको आसावरी; माझी मैत्रिण आनंदी आणि तिचा नवरा वासुदेव अशा चौघांची.

समांतर रेषा कधी एकमेकींना छेदत नाहीत. धावत राहतात. पण एखादी रेषा वाकडी वळली की घोटाळा सुरू होतो. नको तिथे छेद जातो.

समांतर जाणारी रेषा वाकडी वळतेच कशाला? कारण ठाऊक नाही. पण वळते हे खरे. तसे नसते, तर रामायण, महाभारत कसे घडले असते?

तसा मी वृत्तीने सरळ चालीचा आहे.

मग पाऊल वाकडे कां पडले?

ह्या प्रश्नाला म्हटले तर उत्तर आहे; म्हटले तर नाही. हे जसे आत्मसमर्थन नाही, तसेच ढोंगही नाही. तसे असते, तर हे सगळे सांगण्याचा खटाटोपच केला नसता.

सरळ रेषेपासून मी ढळलो. तिरप्या चालत येणाऱ्या आनंदीला भेटलो. दोघं मिळून चालत राहिलो.....

पण आनंदी तिरपी चालत होती, हे खरे का? अशा प्रश्नांना उत्तरे असतात. पण ती हवी तेव्हा मिळत नाहीत. आणि मिळतात तेव्हा फार उशीर झालेला असतो.

[ २ ]

आयुष्याचे गणित चुकले की हे सारे चालू होते. आसावरीमुळे माझे गणित चुकले. तिचे उतरून घेतानाच चुकले. तिचे चुकले, म्हणून माझे चुकले. आणि माझ्यामुळे वासुदेवाचे चुकले. पण हे खरे का! की उगाच माझ्याकडे कमीपणा घेऊन मी हे म्हणत आहे! शक्यता आहे की आनंदी-मुळे त्याचे गणित चुकले असावे. पण आनं-दीचे कुणी चुकवले? मी की वासुदेवाने? की आणखी कुणी?

[ ३ ]

नेहमीप्रमाणे मी दरवाजाशी जाऊन थांबलो. आणि बेल दाबली. पुनः पुन्हा दाबली. तरी आत चाहूल लागली नाही. मनात नाना शंका आल्या. असे कधी कधी झाले नव्हते. की मी अवेळी आलो होतो? अवेळी आलो होतो, हे तर खरेच. नेहमी निवांतपणे दुपार टळल्यावर येत असे. पण आज हा असा अचानक इथे येऊन ठेपलो होतो. पण तसे असले, म्हणून काय झाले! नेहमीच्या पद्धतीनेच मी बेल दाबली होती. ही पद्धत तिच्या ओळखीची होती. किंबहुना त्यामुळेच दरवाजाशी मी उभा आहे, हे तिला कळत असे. धावत येऊन ती दरवाजा उघडीत असे. मग आजच काय झाले! वासुदेवाने आपली रजा तर वाढवून घेतली नव्हती? आणि तो घरात असल्या-मुळे माझी बेल ऐकून तिचा गोंधळ तर उडाला नव्हता? त्यानेच दरवाजा उघ-डला, तर कसे सावरून घ्यावे; त्याचा मी विचार करू लागलो. नशीब माझे की गाडी घरापाशी उभी न करता ती मी आड-बाजूच्या गल्लीत उभी केली होती. आणि इथपर्यंत चालत आलो होतो. मनात आले की असेच माघारी फिरावे. बाहेरून फोन करून पहावा. फोनवर त्याचा आवाज आला, तर प्रश्नच मिटला. न बोलता फोन खाली ठेवला, म्हणजे झाले. मनात असा विचार आला तरी मी दरवाजापासून हटलो नाही. वासुदेव रजेवर असल्यामुळे गेल्या आठ दिवसात काही जमले नव्हते. भुकेले शरीर लोचटासारखे तसेच तिथे उभे राहिले. पुन्हा एकदा बेलकडे हात गेला. ह्या वेळी मात्र आत चाहूल लागली. दरवाजात ती दिसली. आणि मला एकदम हायसे वाटले. अतला कानोसा घेत मी हलकेच विचारले,

"आत येऊ ना?"

"घर तुझंच आहे."

घरात तिच्याशिवाय आणखी कुणी नाही, हे माझ्या ताबडतोब लक्षात आले. खुशीत येऊन मी पुढे झालो. आणि दर-वाजाची उघडलेली फळी बंद करण्याकरता लोटून दिली. लॅचकीचा खटका बसल्याचा बरोबर आवाज आला. दरवाजा लागला होता. पण तिचे समाधान झाले नाही. सावधगिरीने ती बोल्ट सरकवू लागली. तिला पाठमोरी पाहून मागे मी राहिलो नाही. तशीच तिला मिठीत घेत मी म्हटलं, "आनंदी, किती दिवस वाट पहायची!"

इतक्या दिवसांनी आम्ही भेटलो होतो. मी तिला मिठीत घेतली होती. मला वाटलं माझ्याचप्रमाणे तीही भुकेली असेल. ताप-लेली असेल. पण नेहमीप्रमाणे तिचे हात माझ्या गळ्याभोवती पडले नाहीत. उलट माझ्या मिठीतून माझ्या लक्षात येणार नाही अशा बेताने ती माझ्यापासून दूर व्हायचा प्रयत्न करू लागली. असे कधी झाले नव्हते. मी चमकून विचारले, "काय झालं!"

"तू आलास, तेव्हा डोळा लागला होता. डोळ्यांना पाणी तरी लावून येते" आणि ती वळेवळेच बाजूला होऊ लागली. पण तिचा हात पकडून मी तिला अडवले. आणि तिच्याकडे पाहू लागलो.

ती म्हणत होती, ते खरे असावे. कारण ती अगदी मरगळल्यासारखी दिसत होती. आमचे नेहमीचे आटपल्यावर ती बिछान्या-वर पडून राही. आणि मग उठल्यावर दिसे, तशी गलितगात्र नि झोपाळू दिसत होती. पण माझ्या उतास जाऊ पाहणाऱ्या रक्ताला अशा स्थितीतही ती मोहक वाटत होती. तिला जवळ ओढून घेत मी म्हटलं, "किती सुंदर दिसतेस! अशीच हवीस मला.

आणि मी तिच्या ओठावर ओठ टेकले.

"अरे पण आतल्या खोलीत तरी येशील की नाही ?"

मी तापलो होतो. कमालीचा तापलो होतो. आणि ती थंड होती. कमालीची थंड होती. माझ्या ओठात असलेले तिचे ओठ थंड होते. तिचे अवघे शरीर थंड होते. त्यामुळे मनाचा थोडा फार विरस झाला. पण माझे येणे अनपेक्षित असल्यामुळे हे असे झाले असावे, अशी मनाची समजूत घालीत मी तिला म्हटलं, "आत तर जायचंच आहे." आणि त्या धुंदीतच मी तिला एकदम उचलून घेतली.

आतल्या खोलीत आलो. आणि माझे हात तिच्या सर्वांगावरून फिरू लागले. तीही आता हलके हलके तापू लागली होती. तिच्या छातीवरून फिरणारा माझा हात अचानकपणे अडखळला. बॉडीच्या आत कागदाच्या कपटयासारखे काही तरी लागले. आणि माझा हात तावडतोब थांबला. "ही अडचण इथं कशाला ?"

"कुठं काय ?"

"हा कागदाचा कपटा."

"वाण्याचं विल असेल."

"मग ते तुझ्या माझ्यामध्ये कशाकरता ?" आणि ब्लाऊझच्या आतला कागदाचा कपटा मी बाहेर काढला. तसाच चुरगळून मी तो फेकून देणार, तोच माझे लक्ष तिकडे गेले. आणि भांबाहून मी म्हटलं, "आनंदी, अग ही तर शंभराची नोट आहे."

काय बोलावं, ते न सुचून ती म्हणाली, "असेल. असेल."

"पण ती इथं कशी आली ?" माझा प्रश्न ऐकून ती चमकली, हे माझ्या नजरेतून सुटले नाही. पण स्वतःला सावरून घेत ती म्हणाली, "वाण्याचं विल् चुकतं करायला ह्यांनी दिली, ती इथंच खोचून ठेवली." आणि ती मला एकदम बिलगू लागली. इतका वेळ मी तापलो होतो आणि ती थंड होती. आता मी थंड होत होतो. आणि ती तापत असल्यासारखे दाखवीत होती. केवढया अपेक्षा मनात बाळगून तिच्यासाठी जीव तोडीत मी इथे आलो होतो ! आणि हे काय घडत होते ! रक्ताला आलेले उधाण आता ओसरू लागले होते. भरती संपून ओहोटीला सुरुवात झाली होती. आणि लपून राहिलेले खडक उघडे पडू लागले होते.

* *

[४]

तिथून निघालो, तो थेट घराच्या वाटेला लागलो. घरीसुद्धा मी अवेळीच परतत होतो. वास्तविक घरी परतण्याची तशी आवश्यकता नव्हती. परस्परच मी पुढे कामासाठी जाऊ शकत होतो. पण बाहेर थप्पड बसल्यावर घरी जावे, असे मनात आले. आसावरीने विचारले, तर काय थाप मारावी; त्याचा विचार करीतच मी घरापाशी आलो. खिडकीपाशी उभे राहून मी आतली चाहूल घेतली. आत सगळीकडे सामसूम होती. एक प्रकारचा चमत्कारिक उदासपणा बाहेरच्या खोलीत पसरला होता. दरवाजाला किल्ली लावून मी हलकेच आत शिरलो. आसावरीची देखभाल करणारी छोटी गजरा कुठे दिसते का, ते पाहू लागलो. खोल्या खोल्यातून मी फिरत होतो. आणि कुणीच कुठे दृष्टीस पडत नव्हते. मांडून ठेवलेल्या सामानाचा नीटनेटकेपणा दृष्टीला खुपत होता. ही शिस्त बिघडवील, कोणी दंगा करील; असे घरात कुणीच नव्हते. तशी शक्यताही नव्हती. आसावरीच्या खोलीशी मी आलो. आणि क्षणभर बाहेरच थबकलो. आत डोकावून पाहिले तेव्हा तिला झोप लागल्याचे ध्यानात आले. ट्रॉलीवर ठेवलेल्या औषधांच्या बाटल्या बापुडवाण्या दिसत होत्या. पुढे होऊन तिच्या केसातून हात फिरवावा आणि हलकेच हाक मारावी, असे मनात आले. पण तिच्याबरोबर झोपी गेलेल्या दुःखाला मुद्दाम जागे करण्यात अर्थ नव्हता. क्षणभर मी तिच्याकडे पहात राहिलो. आणि हलक्या पावलांनी माघारी वळलो. दरवाजा ओढून घेतला. आणि तसाच पुन्हा बाहेर पडलो.

* *

[५]

पोटाच्या भुकेने माणसे लाचार होतात. माझ्यापाशी पोटापाण्याला भरपूर होते. पण माझे दुःख वेगळेच होते. शरीराच्या भुकेने मी हीनदीन झालो होतो. लाचार होत होतो. तसे पाहिले असता पैसेवाल्या माणसाला असे लाचार व्हायची काही आवश्यकता नव्हती. पण ते मार्ग माझ्यापुरते बंद होते. जे शरीर पैसे टाकल्यावर कुणाला आणि केव्हाही मिळू शकते, अशा




अनुक्रमणिका

ठिकाणी माझे जमण्यासारखे नव्हते. ती माझी वृत्ती नव्हती. ते माझ्या रक्तातच नव्हते. आनंदीची भेट होण्यापूर्वी रात्रीच्या रात्री मी तडफडत काढल्या होत्या. पण त्या वेळीही अशा मार्गाला लागावे, असे माझ्या मनात चुकूनही आले नव्हते. आले असते आणि लाचार शरीराने अशा मार्गाचा अवलंब करण्याचा प्रयत्न केला असता, तरी ते मला जमले नसते.

मग राजरोसपणे मी एखादी बाई का ठेवली नाही?

त्याला कारण माझा स्वभाव!

## [६]

संध्याकाळी मी घरी आलो. आणि नेहमीप्रमाणे आसावरीला व्हील-चेअरवर बसवून मोकळ्यावर आणले. नेहमीपेक्षा आज मी तिच्याशी चांगला वागत होतो. सहृदयतेने वागत होतो. कशाकरता? ह्या प्रश्नाची खरोखरच आवश्यकता आहे का? हे असे विचार मनात येतात तरी कशासाठी? आसावरीच्या हातावर थोपटल्यासारखे करीत मी म्हटले, "आज दुपारी मी घरी येऊन गेलो."

"खरं म्हणता?"

"तुला झोप लागली होती."

"मग मला उठवलंत कां नाही?" आणि माझी दृष्टी टाळून ती म्हणाली, "बाकी उठवून तरी काय फायदा होता?" तिच्या बोलण्यात दुःख होते. अगतिकपणा होता. थोडा फार कडवटपणाही होता. विषय बदलून मी म्हटले,

"आज मला फार मोठा धंदा मिळाला. हा धंदा मिळावा, म्हणून मी गले वर्षभर धडपडत होतो. हातातून निसटला, असं वाटत होतं. पण आज अगदी अचानक माझ्या हाती लागला." आणि तिच्याकडे वळून मी विचारले, "ह्या कॉन्ट्रॅक्टमधून मला किती पैसे मिळतील, कल्पना आहे तुला आसावरी?"

खिन्नपणे हसत ती म्हणाली, "पप्पांचाच वारसा पुढे चालवणं तुमच्या नशिबी आलेलं दिसतं. पप्पांना निदान मी तरी होते, पण तुम्हाला...."

बोलता बोलता ती एकदम थांबली आणि रडवेली होत म्हणाली, "तुमच्या तरी नशिबी माझ्या रूपानं हा काय भोग आला?" तिचे सांत्वन कसे करावे, ते माझ्या लक्षात येईना. मी मुद्दामच विषय बदलला होता; पण तरीही त्याचा शेवट दुःखातच झाला होता. संध्या छाया आता पसरू लागल्या होत्या. काळोख पुढे पुढे सरकू लागला होता. तिच्या अंगावर शाल टाकीत मी विचारले, "आता आत परतू या का?"—आणि न बोलताच मी व्हील-चेअर आतल्या बाजूला वळवू लागलो.

**

## [७]

मी आसावरीशी गोड वागत होतो. तिच्या भावनांना जपत होतो; आणि तरीही तिला फसवीत होतो. तिच्या असहाय्य स्थितीतही तिच्याशी एकनिष्ठ असल्याचे नाटक करीत होतो. माझे नाटक तिला खरे वाटत होते. आणि मला वाटते की मी किती पैसा मिळवतो, किती हुशार आहे, किती घडाडीने कामे उरकतो, ह्यापेक्षा माझा हा एकनिष्ठपणाच तिला जास्त प्रिय होता; सुखद होता. माझ्याबद्दलचे विचार हाच तिचा दिवसभराचा विरंगुळा होता. पैशाच्या पाठोपाठ येणारी दुःखे तिने भोगली नसली, तरी पाहिली होती. तिचे पप्पा आयुष्यात बेफाटपणे वागले होते. मम्मीला झालेले दुःख तिने पाहिले होते. त्या बाबतीत ती स्वतःला भाग्यवान् समजत होती.

पण माझ्याविषयीचा ह्या समजुतीचा बुडबुडा कधी फुटला, तर तिची काय अवस्था होईल; याचा विचार करायलाही माझे मन धजत नव्हते.

मी तिला फसवीत होतो, निःसंशय फसवीत होतो. आणि तरीही तिच्याशी चांगला वागत होतो. ह्या माझ्या चांगुलपणानेच ती फसत होती.

मी आसावरीला फसवीत होतो. आणि आनंदी वासुदेवाला फसवीत होती. काय















गंमत आहे पहा. तसे पाहिले असता आनंदीचा आणि माझा संबंध हा व्यभिचार होता. मी माझ्या बायकोला फसवीत होतो. ती तिच्या नवऱ्याला फसवीत होती. आणि असे असूनही मी आनंदीशी प्रामाणिक रहावे आणि तिने माझ्याशी एकनिष्ठ रहावे, अशी आम्ही एकमेकांपासून अपेक्षा करीत होतो. हे सारे विचित्रच होते. पण त्यातून सुटका नव्हती. आनंदीची किंवा माझी, कुणाचीच सुटका नव्हती.

मी सरळ चालीचा आहे, असे एकदा मागे कधी तरी सांगितले, पण ते खरे आहे का? ते पूर्णांशाने खरे असते, तर आनंदी माझ्या आयुष्यात आलीच कशी असती? बायको अशक्त आहे, आजारी आहे किंवा हवे ते सुख देऊ शकत नाही; म्हणून काय सगळेच नवरे थोडाच उनाडपणा करतात?

* *

[८]

आनंदी माझ्या आयुष्यात कशी आली, ही सुद्धा एक मोठी हकीगत आहे.

तसा मी स्त्रियांच्या वाटेस आपणहून कधी जात नाही. म्हणजे स्त्री जात मला अप्रिय आहे, असे मुळीच नव्हे, उलट स्त्री जात मला आवडते. पण ह्या आवडण्यालाही मर्यादा आहेत. समाजातल्या चांगल्या चांगल्या स्त्रियांच्या आणि माझ्या ओळखी आहेत. कारणपरत्वे आम्ही एकमेकांना भेटतो. पण गाडीतून एखादीला लिफ्ट देणे किंवा एखादीला लंचला घेऊन जाणे, ह्या पलीकडे कुठच्याही स्त्रीशी माझे संबंध नाहीत. स्त्रीसहवासाचे मला वावडे नसले, तरी हसण्या खेळण्यापुढे मी कधी जात नाही. थोडा आत्मप्रौढीचा दोष पत्करूनही सांगतो की मनात आणले असते, तर अनेकींना मी नादी लावले असते. पहिल्या भेटीतच माझ्या उमदेपणावर लट्टू होणाऱ्या अनेक घरंदाज स्त्रिया मी पाहिल्या आहेत. थोडा लुच्चेपणाने वागलो असतो, तर कितीजणांचे संसार विस्कटले असते; त्याची कल्पनाच करता येत नाही. पण मी तसा कधीही वागलो नाही. कारण आपल्या रूपा-गुणापेक्षा आपल्या चालण्या-बोलण्याने मला चलबिचल करील अशी कुणीच आढळली नाही. आणि खरे सांगायचे, तर सहजसाध्य स्त्रीविषयी मला कधीही अभिलाषा वाटली नाही. जी कुणालाशी वश होऊ शकते, ती स्त्री माझ्यापुरती तरी निदान कटाप होती.

मग आनंदीच्या मी एवढा नादी कसा लागलो?

* *

[९]

फोनची रिंग वाजली, तेव्हा मी आरशासमोर उभा राहून दाढी करीत होतो. आरशापासून बाजूला होणार, तोच आसावरीने हात लांब केला. आणि रिसीव्हर उचलून घेतला; "हॅलोऽऽ"

"

"हॅलो. हॅलो."—पण पलीकडून उत्तर आले नसावे. उलट फोन बंद झाला असावा. पिन्वर रिसीव्हर ठवीत ती म्हणाली, "हल्ली असं वारंवार होतं."

"कां? काय झालं?"

"रिंग वाजते. मी रिसीव्हर उचलते. हॅलो हॅलो म्हणते; पण पलीकडून कुणी बोलतच नाही. फोन बंद होतो."

"आश्चर्य आहे!" आणि लगेच काळजीच्या सुरात मी विचारले, "तुला असा वारंवार त्रास होतो का?"

"नाही. पण मधून मधून. आणि असा फोन येतो, त्या वेळी नेमके तुम्ही घरात असता."

मी भराभर दाढी आटपली. आणि आरशासमोरून बाजूला झालो. तिच्या उशागती ठेवलेला फोन उचलून घेतला. आणि बैठकीच्या खोलीत घेऊन आलो. आता पुन्हा रिंग वाजली, तरी चिंता नव्हती.

रिंग वाजली, तेव्हा मी तावडतोब रिसीव्हर उचलून घेतला. "हॅलो"

"हॅलो."

आवाज ओळखून मी म्हटले, "मी विश्वनाथ."

"मी आनंदी."




तिच्या बोलण्यावरून वासुदेव आजुबाजूला नाही, हे माझ्या तावडतोब लक्षात आले. हे आम्हा दोघांमधले गुपित होते. आम्हा दोघांपैकी कुणी एकमेकांना फोन केला आणि तो दुसऱ्या कुणी घेतला, तर न बोलताच आम्ही फोन बंद करीत असू. बरं, एखाद वेळेला हवे असलेले माणूस नेमके फोनवर आले, तरी आजुबाजूला कुणी असण्याची शक्यता असे. म्हणून जपून संदिग्ध बोलावे लागे. अशा वेळी शब्दांच्या कसरतीत आशय गुदमरून जाई. असे वारंवार होऊ लागले, तेव्हा त्यावर आम्ही तोडगा शोधून काढला. आजुबाजूला कुणी असले, तर फोनवर आम्ही आमच्या आडनावांचा उल्लेख करू लागलो. आणि इतर वेळी आपआपल्या नावांचा. केवळ त्यामुळेच, आता फोनवर 'मी आनंदी' असं ती बोलली, तेव्हा वासुदेव आजुबाजूला नाही; हे माझ्या लक्षात आले. मोकळेपणाने पण हलक्या आवाजात मी विचारले, "वासुदेव कुठे गेला ?"

"आज संकष्टी. पहाटेच टिटवाळ्याला गेले."

"देवादिकांचं माझ्या हे लक्षातच येत नाही."

"एवढंच की आणखी काही ?–"

तिला काय म्हणावयाचे होते, ते माझ्या तावडतोब लक्षात आलं. त्यामुळे मी गुळमुळीतपणे हसलो. पण मला दटावीत ती म्हणाली, "गेल्या चार दिवसात एकदाही फिरकला नाहीस ? की फोन केला नाहीस ?"

"तू तरी कुठं केलास ?"

"किती वेळा रिंग वाजली, ते आसावरीलाच विचार"

पड खात मी म्हटले, "आज नक्की येतो." आणि विचारले, "केव्हा येऊ ?"

"लौकर ये. सबड काढून ये. मी घरीच आहे."

* *

[१०]

दोन ठिकाणी मन गुंतलेल्या पुरुषाची नेहमीच अशी पंचाईत होत असावी. त्यातूनही दुसरा संबंध चोरटा असला, म्हणजे फरफटीला सीमाच रहात नसावी.

रविवार किंवा सुटीचा दिवस मी खास आसावरीसाठी राखून ठेवीत असे. एकमेकांपाशी बोलण्यासारखे विशेष असे काही नसले, तरी केवळ मी तिच्या जवळपास आहे; एवढे तिला पुरे होत असे. कधी सकाळच्या वेळी मी तिला व्हील-चेअरवरून घराभोवतालच्या बागेत नेत असे. तिथेच आमचा ब्रेकफास्ट होई. मी बागेत इकडे तिकडे करीत राही. कधी एकाद्या रोपाला जमिनीत काठी रोवून आधार देई. कधी किडलेली पाने खुडून टाकीत असे. तर कधी कुंड्यातली घट्ट झालेली माती भुसभुशीत करण्याचा सपाटा लावी. अशा वेळी आसावरी व्हील-चेअरवर बसून शांतपणे सगळीकड पहात राही. जमिनीवरून शांतपणे चाललेली मुंग्यांची रांग, इवल्या इवल्या पण धिटुकल्या खारीची लगबग आणि घरातून बागेत व बागेतून घरात चाललेली छोट्या गजराची धावपळ हे सगळे तिच्या कौतुकाचे विषय असत. कधी दुपारच्या वेळी मी तिला घरातल्या घरात सिनेमा दाखवीत असे. तर कधी रमीचा डाव मांडून बसत असे.

सुटीचा दिवस मी असा आसावरीच्या सहवासात घालवतो, हे आनंदीलाही ठाऊक होते. आणि तरीही तिने आज फोन करून मला बोलावले होते. तसे तिचेही बरोबर होते. मी तिला वारंवार भेटत असलो, तरी माझ्या सहवासाचे भरपेट असे सुख तिला कधीच मिळत नसे. कधी निवांतपणे एकांतात बसून गप्पागोष्टी करता येत नसत. की घराबाहेर पडून एकत्र हिंडण्याफिरण्याचे सुखही मिळवता येत नसे. घरी एकांतात तिच्याबरोबर असलो, तरी अचानकपणे वासुदेव केव्हा परत येईल; किंवा तो आला नाही, तरी तिच्या नात्यातले कोणी आगांतुकपणे येऊन उभे राहील; ह्याविषयी मनात नेहमी धाकधुक असे. तिला घेऊन घराबाहेर पडलो, तरी कोण केव्हा भेटेल; आणि अचानकपणे आमचा हितचिंतक होईल, तेही सांगता येत नसे. म्हणून म्हटले की एकमेकांना आम्ही वारंवार भेटत असलो, तरी सहवासाचे भरपेट सुख आमच्या वाट्यास कधीच येत नसे. जमेल तसे आम्ही एकमेकांना भेटत होतो. आणि चोरटेपणाने मिळेल, तेवढे सुख ओरबाडून घेत होतो. कुणी सांगावे; कदाचित् एकमेकांच्या वाट्यास येणाऱ्या ह्या अपुऱ्या सुखामुळेही आम्हाला एकमेकांविषयी एवढ्या तीव्रतेने वाटत असावे. त्या ओढीपायीच तिने वासुदेव टिटवाळ्याला गेल्याबरोबर मला फोन केला होता.

तिच्या भेटीसाठी मी कमालीचा उत्सुक होतो. गेल्या आठपंधरा दिवसात तिची माझी तशी भेटच झालेली नव्हती. आधी

आमची धोरणे :१:









अनुक्रमणिका

आठ दहा दिवस वासुदेव रजेवर होता, नंतर त्याची रजा संपल्यावर, भुकेलेले शरीर लोचटासारखे तिच्या दारी जाऊन अवेळी उभे राहिले होते. तिची माझी भेट झाली होती; पण त्या भेटीतून काहीच निष्पन्न झाले नव्हते. किंबहुना नको ते निष्पन्न झाले होते. आणि हिरमुसला होऊन मी घरी परतलो होतो. त्यानंतर परत जाऊन तिला भेटावे असे हजार वेळा मनात आले. पण मी मनाला आवरले. तिने बोलावल्याशिवाय आपणहून लोचटासारखे जायचे नाही, असे ठरवून टाकले. आणि आज आता चार दिवसांनंतर संधी येताच तिने मला बोलावले होते. आता नुसत्या शंकाकुशंकांच्या आहारी जाऊन स्वतःचे अनहित करून घेण्यात काही अर्थ नव्हता.

हे खरे; पण घराबाहेर कसे पडायचे ? माणूस स्वतःच जाळ्यात कसा सापडतो पहा ! मोठेपणाचा आव आणून सुटीचा दिवस आसावरीसाठी राखून ठेवायला मला कुणी सांगितले होते ? हाही माझ्या मनाच्या कमकुवतपणाचाच एक भाग होता. आनंदीच्या मी आहारी जाऊ लागलो, आणि त्यामुळे कळत नकळत आसावरीकडे दुर्लक्ष होऊ लागले. प्रसंगी हे माझ्या लक्षात आले. आणि गंमत अशी की त्यांची टोचणी माझ्या मनाला लागू लागली. ह्या टोचणीची तीव्रता थोडी फार तरी कमी व्हावी, म्हणून मी हा पर्याय शोधून काढला. त्याचा तिच्यापाशी उच्चार केला. आणि कालांतराने माझा सुटीचा दिवस हा केवळ तिचाच दिवस, असे त्याचे समीकरण झाले. आणि केवळ त्यामुळेच आता आनंदीचा फोन आल्यावर तिला पटेल अशी कोणती सबब सांगावी आणि साळसूदपणे घराबाहेर कसे सटकावे, असा माझ्यापुढे प्रश्न उभा राहिला.

* *

## [११]

कित्येकदा माझ्या मनात वेडेवाकडे प्रश्न उभे राहतात. तसे पाहिले असता मूलभूत प्रश्न एकच असतो. बाकी इतर त्याची उपांगे असतात. ह्या प्रश्नाचे संयुक्तिक असे उत्तर मला अजूनही मिळालेले नाही. पुढे कधी मिळेल की नाही, ते सांगता येत नाही. आणि आता मी अशा मार्गाला लागलेलो असताना त्या प्रश्नाचे उत्तर मिळावे, असेही वाटत नाही. तरीही प्रश्नांच्या आवर्तात मी गुदमरून जातो, हेही तितकेच खरे.

माझ्या मनात वेळी अवेळी जे वेडेवाकडे प्रश्न येतात, त्याचे कारण माझ्या मनावर झालेले संस्कार हेच असावे. अतिशय कर्मठ वातावरणात मी लहानाचा मोठा झालो. सत्य बोलावे आणि सदाचाराने वागावे, हीच शिकवण माझ्या कानानी ऐकली. सदाचारी पुण्य जोडतो व आयुष्यात त्याचे भले होते, आणि दुराचारी पापाचा वाटेकरी होतो व दुःखाच्या खाईत पडतो; असेही वारंवार ऐकले. संवेदनाक्षम मनावर झालेले हे संस्कार इतक्या स्थायी स्वरूपाचे होते की पुढे सुजाणपणी बुद्धीच्या निकषावर मी ते घासून पाहू लागलो, तेव्हा निकषच लुळेपांगळे वाटू लागले. आणि त्या विफलतेतूनच प्रश्नामागून प्रश्न निर्माण होऊ लागले. मी असे कुणाचे काय वाकडे केले होते की आसावरीच्या रूपाने दुःख माझ्या वाटचास यावे ? वासुदेवासारख्या सरळ चालीच्या आणि देवाधर्माबाबत जागरूक असलेल्या सज्जनाच्या नशिबी प्रतारणा कां यावी ? जुगारी आणि स्त्रैण माणसाचा संसार फुलत रहावा आणि नाकासमोर पाहून चालणाऱ्याचा सुकत जावा, हे कुठच्या न्यायाने ? पतिव्रतेने हालअपेष्टा भोगीत झिजून झिजून मरावे आणि उनाड मैनेने विलासात दंग राहून माड्यावर माड्या चढवाव्यात, हे सारे कुठच्या धर्माने ?

ह्या आणि अशा प्रश्नांना उत्तरे द्यायचा पढीक प्रयत्न करतात; पण ती सगळी उत्तरे सांकेतिक असतात. माझ्या मनाचे समाधान होईल, अशी उत्तरे मला अजूनही मिळालेली नाहीत. आता ती मला नकोही आहेत. मात्र कुणाची इरेलाच पडायची इच्छा असेल, तर त्याला मी एवढेच विचारतो की सदाचारी सज्जन दुःखाच्या दरीत खितपत पडतो आणि दुराचारी दुर्जन वैभवाच्या शिखरावर आरूढ होतो, ते कुठच्या न्यायाने ?

* *

## [१२]

त्या दिवशी संधी येऊनही सगळेच हुकले.

त्या सगळ्या प्रकाराची सुरुवातच मोठी वाईट झाली. मी घराबाहेर पडणार तोच आसावरीने अगदी अनपेक्षितपणे विचारले, "मघाशी फोन कुणाचा होता ?" तिचा प्रश्न ऐकून मी चमकलो. फोन आलेला तिला ऐकूही गेला नसेल, अशी माझी समजूत होती. पण ती चुकीची ठरली. तिने नुसती रिंग वाजलेली ऐकली होती की फोनवर माझे आनंदीशी झालेले संभाषणही ऐकले होते ? पण तशी शक्यता कमीच होती. कारण मी दिवाणखान्यात फोनवर बोलत होतो. आणि ती आत बेडरूममध्ये होती. ते लक्षात घेऊन न










डगमगती मी म्हटले, "फोन कामाचा होता. सुटीच्या दिवशी घरी करू नका म्हणून सांगतो, तरी करतात."

माझे बोलणे न पटल्याप्रमाणे ती हसली. पण तिची समजूत घालण्याच्या मी भरीस पडलो नाही. घरावाहेर पडणार, तोच अगदी सहजपणे बोलल्याप्रमाणे ती म्हणाली, "तुमच्या मित्रांपैकी हल्ली बरेच दिवसात कुणी इकडे फिरकलं नाही."

"मी कुणाकडे जात नाही; माझ्याकडे कुणी येत नाही."

"पण वासुदेव भाऊजीसुद्धा अलीकडे कधी आले नाहीत." आणि थांबल्या–सारखं करून तिनं विचारलं, "आनंदी तरी कधी भेटते की नाही?"

घरावाहेर पडताना अशी ठेच लागली. आणि त्याची ठुसठुस आनंदीच्या घरी जाऊन पोचलो, तरी थांबली नाही. किंबहुना तिच्या घरी जाऊन पोचलो आणि ही ठुसठुस जास्तच वाढली.

ती माझी वाटच पहात असावी. मी दिसलो, तेव्हा म्हणाली, "वाटलं यतोस की नाही?"

"कां?"

"कारण आज सुटीचा दिवस–" ती पुरतं बोलली नाही, तरी तिला काय म्हणावयाचं होतं; ते माझ्या लक्षात आले. तिच्या ह्या बोलण्याने मी दुखावल्या-सारखा झालो. आसावरीला दुखवून घरा-वाहेर पडलो होतो. आणि जिच्या भेटी-साठी घरात रोष ओढवून घेतला होता, तीच आता भेटी भेटी असं बोलत होती. वर वर पाहिले, तर हे बोलणे रुसण्या फुगण्याचे वाटावे; इतके साहजिक होते. माझ्यावरील आत्यंतिक प्रेमामुळेही ती असे बोलत असावी, असा आभास निर्माण करणारे होते. पण आता मी आनंदीला ओळखू लागलो होतो. तिच्या वागण्यात पडत चाललेला सूक्ष्म फरक माझ्या लक्षात येऊ लागला होता. आमची ओळख झाली आणि पुढे दाट मैत्री झाल्यावर कधी तरी भावनेच्या भरात मी आसावरी-विषयी तिच्यापाशी बोललो होतो. त्या वेळी तिच्या डोळ्यात उभे राहिलेले अश्रू

पाहून माझे दुःख समजून घेणारे कुणी तरी भेटले म्हणून मी गहिंवरलो होतो. शारी-रिक संबंधापलीकडील एक नाजुक भाव-विश्व तिच्यामाझ्यामध्ये नकळत निर्माण झाले. मी नको नको म्हणत असताही एकदा ती वासुदेवाला घेऊन माझ्या घरी आली. ह्या भेटीतून काय निष्पन्न होईल म्हणून मी मनातून घावरलो होतो. पण आनंदी फार चतुराईने वागली. अशा चतुराईने की आसावरीलासुद्धा तिची भुरळ पडली. जिवाभावाची मैत्रिण फार दिवसांनी भेटण्या इतका तिला आनंद झाला. इतके दिवस माझे तिच्यां घरी जाणे-येणे एकतर्फी होते. पण आनंदीने आपल्या चतुराईने ते साफ बदलून टाकले. कधी वासुदेवाला बरोबर घेऊन तर कधी एकटी ती आमच्याकडे येऊ लागली. मीही वासु-देव घरी असेल, अशा वेळी कधी कधी जाऊ लागलो. पण ह्या घसटीतून कळत नकळत काही गोष्टी आनंदीने टिपल्या होत्या. मी कितीही तिच्या आहारी गेल्या-सारखा वागलो, तरी वेळ आली असता आसावरीला दुखवून तिच्यासाठी स्वतःला झोकून देणार नाही; हे तिने बरोबर हेरले होते. आसावरी दुबळी असली आणि बाहेर मी असा नादी लागल्यासारखा वागत असलो, तरी मनापासून माझे आसावरीवर प्रेम आहे; हे आनंदीच्या लक्षात आले होते. ह्या स्त्रीसुलभ मत्सराचा तिने कधी उच्चार केला नाही, तरी तिच्या वागण्याचालण्यातून हलके हलके ते माझ्या ध्यानी यऊ लागले होते.

आताही मी आल्याआल्याच तिने माझे ज्या तऱ्हेने स्वागत केले, त्यालाही हेच कारण होते. तिने बोलावले असता, सुटीच्या दिवसाबद्दल आसावरीला दिलेल्या शब्दाला मी चिकटून रहातो की तिच्याकडे धाव घेतो, हेच तिने पाहिले होते. आणि मी आल्यावरही आडवळणाने तिने मनातल्या मळमळीला वाट करून दिली होती. हे सारे मला समजले आहे, असे मी दाखवले असते; तर उगाच शब्दाने शब्द वाढला असता. कटुता निर्माण झाली असती. आणि ज्या

सुखाच्या ओढीने मी धावत आलो होतो, त्यालाही मला मुकावे लागले असते. त्यामुळे ती बोलत होती, त्या अनुरोधाने मी मुद्दामच काही बोललो नाही. विषय बदलून मी म्हटले, "आनंदी, आज तू किती सुंदर दिसतेस !" स्त्रीच्या बाबतीतला पुरुषाच्या हातातला हा हुकमी एक्का असतो. आणि तोच मी वापरला होता. पुरुषाच्या तोंडून सौंदर्याची पावती घ्यायला स्त्रिया हपापलेल्या असतात. अशा प्रशंसेने खुलली नाही, अशी स्त्री माझ्या तरी आढळात नाही. कुणी सहजगत्या खुलतात तर कुणी आढेवेढे घेऊन खुलतात. पण खुलतात हे खरे. मी तिच्याकडे रोखून पाहू लागलो, तेव्हा ती म्हणाली, "तुला मी नेहमीच सुंदर दिसते."

"सुंदर आहेस, म्हणून सुंदर दिसतेस."

"तुला मी आवडते का रे ?"

मी तिला जवळ ओढून घेतली तेव्हा मला बिलगत तिने विचारले,

"किती आवडते ?"

"फार फार आवडतेस आनंदी. तू माझा प्राण आहेस."

"मी तुला फार टोचून बोलते का रे ?"

"नाही गं."

"फार छळते का रे ?"

"हे काय वरं वेडचासारखं !"

काय गंमत आहे पहा. क्षणभरापूर्वी ती मला टोचून बोलत होती त्यावरून तिच्याविषयी माझ्या मनात विकल्प येत होता. तटस्थपणे मी तिच्या वागण्याचे विश्लेषण करीत होतो. इतक्या तटस्थपणे की जणू ती आणि मी त्रयस्थ होतो; पण एकमेकांचा एकमेकांना स्पर्श झाला आणि वर्फाचे खडे वितळावेत, तसे मनाचे टोकदार कंगोरे झिजू लागले. ती माझ्या मिठीत आली आणि आमच्या नकळत आम्ही आपआपले व्यक्तिमत्व एकमेकात हरवून बसलो. उत्तेजित होऊन ती माझ्या कानात कुजबुजली, "तू आज मला फार हवा आहेस."

"म्हणून तर धावत आलो."

"किती वाट पाहायची रे तुझी ! आणि मला जास्तच बिलगत ती म्हणाली, "तुला आवडते, तशी मी आज आहे."

सकाळीच न्हाल्यामुळे मोकळ्या सोडलेल्या तिच्या किंचित् ओलसर आणि सुगंधित केसांचा माझ्या चेहऱ्याला स्पर्श झाला. आणि माझे भान हरपले. कानशिले गरम झाली. छाती धडधडू लागली. नसानसातून वहाणारे गरम रक्त उसळी मारून वाहेर उडी घेईल, असे वाटू लागले. अता क्षणाचाही विलंब मला पेलणारा नव्हता. आम्ही उभे होतो, तिथेच मी तिला खाली मॅटिंगवर बसवू लागलो. तेव्हा ती म्हणाली, "अत बेडरूममध्ये जाऊ."

"नको. आज इथेच." आणि माझी दया येऊन तरी तिने कबूल व्हावे," म्हणून अजीजीच्या सुरात मी म्हटले, "माझ्यासाठी–"

ह्या सगळ्या धांदलीचा व्हायचा तोच परिणाम झाला. घडले, ते सगळेच लाजिरवाणे होते. चिडल्यासारखे करीत ती म्हणाली, "किती घिसाडघाई करतोस ?" शरमिंदा होऊन मी बाजूला होऊ लागलो, तेव्हा मला घट्ट धरून ठेवीत ती म्हणाली, "आता नुसता जवळ तरी रहा. माझ्यासाठी–" ती म्हणत होती. त्याप्रमाणे तिच्या निकट रहावे, असे मनात आले. त्यामुळे माझ्या चुकीची थोडी फार तरी भरपाई झाली असती; पण शरीर साद देईना. हवा काढून टाकलेल्या फुग्यासारखी माझी अवस्था झाली होती. पुरुषाच्या आयुष्यात ह्यापरता दुसरा लाजिरवाणा क्षण नसेल. मी अंगचोरपणा करू लागलो, तेव्हा ती म्हणाली, "तुम्ही पुरुष सगळे असेच. स्वार्थी–" आणि माझ्यापासून ती दूर झाली.

चुकी माझी होती. त्यामुळे इतका वेळ मी बचावाचे धोरण स्वीकारले होते. पण माझ्या संबंधात तिने इतर पुरुषांचा उल्लेख केला, तेव्हा मात्र मी भडकलो. अचानक माझा तोल गेला. आणि मी आक्रमक झालो. इतके दिवस मनाला जाचत असलेले संशयपिशाच्च जागे झाले. आणि माझ्या मुखावाटे फडफडत बाहेर पडले.

* *

[१३]

काय योगायोग पहा !

घरी आलो तो आसावरीने विचारले, "आपल्याकडे आज कोण येऊन गेलं असेल, सांगा पाहू" अशा प्रश्नांना उत्तरे द्यायच्या मी मनःस्थितीत नव्हतो. तरीही शांतपणे मी म्हटले, "काही कल्पना नाही बुवा."

"मग ट्रॉलीवरची ती लोटी इकडे करा."

माझ्याकडे येऊन गेलेल्याचा आणि ट्रॉलीवरच्या लोटीचा काय संबंध असावा, ते माझ्या लक्षात येईना. तिच्या हातात लोटी देत मी विचारलं, "कोण आलं होतं?"

"आधी हे तीर्थ घ्या. मग सांगते."

तीर्थ घेऊन मी डोळ्याला लावल्यासारखे केले आणि प्रश्नार्थक दृष्टीने तिच्याकडे पाहू लागलो. तेव्हा ती म्हणाली, "वासुदेवभाऊजी येऊन गेले."

"कधी ?"

"हे आताच. टिटवाळ्याहून थेट इकडेच आले. माझ्यासाठी त्यांनी गणपतीवर अभिषेक केला. येताना तीर्थ घेऊन आले–" ती बोलत होती. आणि मी नुसता हुंकार करीत होतो. थंडीने गारठलेल्या माणसाच्या अंगावरून वर्फ फिरवावे, तसे हे चालले होते. वासुदेवाच्या वागण्याचे ती गुणगान करीत होती. ते योग्यही होते. पण ते ऐकून मी अस्वस्थ होत होतो. अंतर्यामी ओशाळत होतो. अंतर्मुख होत होतो.

माणसे इतकी चांगली कशाकरता वागतात !

फोनची रिंग अचानकपणे वाजू लागली, तेव्हा मला एकदम सुटल्यासारखं वाटले. गुदमरलेल्या माणसाने खोलीवाहेर पडावे, तसा मी फोनच्या दिशेने चालू लागलो.

"हॅलो"

"हॅलो. मी आनंदी"

सगळे संपले, असे मला वाटले होते. कुणीही संपवून टाकावे, असाच मी वागलो होतो. कारण नसताना अहंकाराला बळी पडून






मी आक्रमक पवित्रा घेतला होता. नको त्यावेळी नको ते बोलून गेलो होतो. तिला दुखवले होते. त्यामुळे मला वाटले की सगळे संपले. तो आता माझे तोंडही पाहणार नाही. फोन केला तरी माझा आवाज ऐकून ती फोन बंद करील. दारी जाऊन उभा राहिलो, तरी ती मला हाकून देईल. पण ते सारे खोटे ठरले होते. सगळे विसरून ती मला फोन करीत होती. आणि म्हणत होती, 'हॅलो. मी आनंदी.'

उत्साहाच्या भरात मी पाघळणार, तोच अगदी अचानकपणे ट्रॉलीवरची तीर्थाची लोटी माझ्या नजरेसमोर उभी राहिली आणि तापलेल्या काचेवर पाणी पडावे, तसे झाले. रुक्षपणे मी म्हटले, "हॅलो. मी देशपांडे."

[१४]

सिगारेटचे पाकीट घ्यायला मी गाडी थांबवली. आणि खाली उतरलो. तेवढ्यात अगदी अचानकपणे मिसेस भोगावकर माझ्या पुढ्यात येऊन उभ्या राहिल्या. माझ्याकडे पहात त्या म्हणाल्या, "माझी खात्रीच होती की मी दिसल्यावर गाडी थांबवणार म्हणून—"

हसून वेळ साजरी करण्यापलीकडे दुसरे काही माझ्या हातात नव्हते. "थांबा—हा आलोच." असे म्हणत सिगारेट आणायला मी दुकानाकडे वळलो.

नको ती माणसे नको तेव्हा भेटण्यातसुद्धा काही संकेत असतो काय?

मी गाडीशी परत आलो, तेवढ्या अवधीत माझ्या शेजारच्या सीटचा मिसेस भोगावकरनी कबजा घेतला होता. गाडी सुरू करीत मी विचारले, "तुम्ही कुठं जाणार?"

"तुम्ही न्याल तिकडे."

"ह्या बाईने गेल्या पाचसहा वर्षात बरीच प्रगती केलेली दिसत होती. जे कानांवर येत असे, ते एकूण खरे असावे. सोशल वर्कर म्हणून समाजात मिरवणारी ही बाई नवऱ्याच्या संशयास्पद मृत्यूनंतर ताळतंत्र सुटल्याप्रमाणे वागू लागली होती. ह्या बाई-बरोबर चार चौघांच्या दृष्टीस पडणे म्हणजे हटकून स्वतःची बद-नामी करून घेण्यासारखे होते. तरीही गाडीत मी तिला माझ्या शेजारी बसू दिले होते. आणि वर तिचे निर्लज्जपणाचे बोलणेही खपवून घेत होतो.

त्यालाही कारण होते.

आनंदीची आणि माझी ओळख मिसेस भोगावकरांनी करून दिली होती. म्हणून म्हटले, नको ती माणसे नको तेव्हा भेटण्यात-सुद्धा काही संकेत असतो काय? ह्या बाईला कशी कटवावी. त्याचा विचार करीत मी म्हटले, "मी आता घरी चाललो आहे."

"कुठच्या?" तिचा प्रश्न माझ्या बरोबर लक्षात आला. पण तो कानांवरच आला नाही, असे भासवीत मी विचारले, "तुमचे सोशल वर्क कसे चालले आहे?"

"उत्तम" आणि माझ्याकडे पहात ती म्हणाली, "तुमच्यामुळे आमची एक चांगली सोशल वर्कर मात्र मी गमावून बसले." पुन्हा एकदा मी हसलो. आणि आनंदीकडे झुकणारे तिचे बोलणे उडवून लावले.

ती म्हणत होती, त्यात तथ्य होते. तिच्याविषयी एकेक गोष्टी कानावर येऊ लागल्या तेव्हा मीच आनंदीला सावध केले होते. मनाशी काही निर्णय घेऊन ते आनंदीवर लादले होते. दोघांनीही तिला टाळायचे, असे ठरवून टाकले होते. आणि त्याप्रमाणे न बोलता आम्ही तिला पद्धतशीरपणे कटवले होते. पण हे ठाऊक नसल्यामुळे, आनंदी माझ्या नादी लागली आणि त्यामुळे तिचे सोशल वर्कमधले लक्ष उडाले, अशी स्वतःची समजूत करून घेऊन ती आता मला टोमणा मारीत होती.

न बोलता मी गाडी हाकीत होतो. खुणेची ठिकाणे मागे पडत होती. आनंदीविषयीच्या तिच्या अप्रत्यक्ष प्रश्नांकडे मी विशेष लक्ष देत नाही, हे तिच्या लक्षात आले असावे. त्यामुळेच की काय तिने विचारले, "आनंदी कशी आहे?"

"मजेत आहे."

"तुम्ही तिला केव्हा भेटला होता?"

"झाले असतील आठपंधरा दिवस."

"आश्चर्य आहे."

"का हो! काय झालं!!"

"मी तर ऐकते की तुम्ही एकमेकांना रोज भेटता. तुमची गाडी तिच्या दाराशी वेळी अवेळी उभी असते."

तिला उडवून लावावे, म्हणून हसल्यासारखे करीत मी म्हटले,

धन्य ही गायनी कळा!



"मेघ मल्हार"







अनुक्रमणिका

"तुमचं सोशल वर्क फार जोरदार चाललेलं दिसतं." माझ्या बोलण्यातली खोच तिच्या बरोबर लक्षात आली असावी. बराच वेळ ती गप्प बसून राहिली. आणि मग काही तरी विचार करून म्हणाली,

"तुम्ही ऐकण्याच्या मनःस्थितीत असाल, तर मी तुम्हाला काही सांगणार आहे."

"बोला."

"मी सांगणार आहे, ते तुम्हाला आवडणार नाही."

"असं का म्हणता?"

"कारण ते आनंदीविषयी आहे."

"तिच्याविषयी कुणी काही सांगण्यासारखं राहिलं असेल, असं मला वाटत नाही"

"तुमचा भ्रम आहे."

"तुम्हाला काय म्हणायचं आहे."

"केवळ तुमच्या हितासाठी म्हणून सांगणार आहे."

"सांगा."

"तुम्ही तिच्या फार आहारी गेले आहा."

"त्याला आता फार उशीर झाला. तुम्हीच तर तिची माझी ओळख करून दिली."

"तशी मी अनेकांची अनेकींशी ओळख करून देते. पण म्हणून काही—"



"समजलो."

"तुम्हाला आवडत नसेल, तर राहिलं."

"नाही. नाही. बोला."

"कुणी कुणाच्या आणि किती आहारी जावं, हा ज्याचा त्याचा प्रश्न आहे; पण ठिकाण खात्रीचं असावं. केवळ आपलंच असावं."

"मतलब?"

"इतके दिवसात काही लक्षात नाही आलं?"

"नाही."

स्वतःशीच हसल्यासारखं करीत ती म्हणाली, बाकी भोळं भाबडं असणं सुद्धा फायद्याचं असतं. सुख लागतं."

"स्पष्ट काय ते सांगितलंत, तर बरं होईल."

"ती वेळ आता निघून गेली." आणि जवळ येत असलेल्या बसस्टॉपकडे बोट दाखवीत ती म्हणाली, "तिथं गाडी थांबवा. मी उतरून जाईन."

बरेच काही विचारावे, असे मनात आले. पण मी मनाला आवरले. डाव्या बाजूला गाडी घेऊन ती रस्त्याच्या कडेला थांबवली. उतरताना तरी तिने स्पष्टपणे काही बोलावे, अशा अपेक्षेने मी तिच्याकडे पाहू लागलो. तेव्हा ती म्हणाली, "आता आणखी काही विचारू नका. त्याचा काही फायदाही नाही. उगाच तुमच्या दुधात मिठाचा खडा मात्र पडेल." आणि बघता बघता ती उतरून गेली.

एका तिरीमिरीतच मी गाडी पुढे काढली. सुसाटपणे ती पळवू लागलो. ब्रेक लावायला हवा, त्यावेळी नेमका मी ॲक्सिलरेटर दावीत होतो——

## [१५]

कपडे करून मी बाहेर पडायच्या तयारीत होतो, तेवढ्यातच आसावरी म्हणाली,

"अहो, पाहिलंत का?"

"काय झालं?"

"पहा तरी——"

काही तरी विशेष घडलं असावं, हे माझ्या ताबडतोब लक्षात आले. "काय झालं!" करीत मी तिच्या बिछान्याशेजारी जाऊन उभा राहिलो. माझ्याकडे पहात ती म्हणाली, "मी बरी होणार." आणि मला विचारू लागली, "पाहिलंत का?"

काही तरी विशेष घडले असावे, हे माझ्या लक्षात आले. पण नेमके काय घडले, ते माझ्या ध्यानात येईना. "असावरी, काय झालं? सांग ना."

"माझ्या उजव्या पायाकडे पहा."

मी बसल्या जागवरून उठलो आणि तिच्या पायगती गेलो. "काय झालं आसावरी? सांग ना."

"माझा मी पाय हलवला."

"खरं म्हणतेस?"





"पहा ना." पाय हलवायचा ती प्रयत्न करू लागली. ती करीत असलेला प्रयत्न तिच्या चेहऱ्यावर मला दिसू लागला. पण पायाची हालचाल नजरेस पडेना. मी आळीपाळीने तिच्या पायाकडे आणि चेहऱ्याकडे पाहू लागलो. पाय तसाच निर्जीवपणे पडून होता. पण चेहऱ्याचे स्नायू मात्र भराभर हलत होते. पहाता पहाता तिच्या कपाळावर घाम जमा झाला. रडवेली होत ती म्हणाली, "नाही जमत. नाही जमत. पण मघाशी हलला. खरच हलला."

"अजूनही हलेल. नक्की हलेल." आणि मी पुन्हा तिच्या पायाकडे पाहू लागलो. तिचा हलू लागलेला पाय पहायला माझा जीव अधीरा झाला होता. केवळ त्यासाठी माझ्या आयुष्यातली कुठचीही गोष्ट ओवाळून टाकायला मी तयार होतो. काय आश्चर्य! जीव आल्याप्रमाणे तिच्या पायाची बोटे अचानकपणे हळू लागली. आनंदातिशयान मी म्हटले, "आसावरी तू वरी होणार."

"तुमच्या लक्षात आलं?"

"नक्कीच. ही ही तुझी बोटे ह्या माझ्या डोळ्यांनी मी हललेली पाहिली." आणि आनंदातिशयाने बभान होऊन मी काय करीत आहे, हे माझ्या लक्षात यायच्या पूर्वीच मी माझ ओठ तिच्या ओठांवर टेकीत म्हटले, "आसावरी, आपण जिंकलं. तू निश्चित वरी होणार. निश्चित वरी होणार."

"वासुदेवभाऊजींची कृपा. टिटवाळ्याचा गणपती पावला." ती बोलली आणि माझ्या हृदयाचा ठोका चुकला. अचानकपणे मी आतल्या आत कुठेतरी हललो, पार शरमिंधा झालो. मला वाटले, तिला म्हणावे, 'तीर्थानं तू वरी होणार असशील, तर तीर्थाची घंगाळंच्या घंगाळं तुझ्यासाठी वाहून आणीन. तीर्थांनी न्हाऊ घालीन तुला. पण बरी हो. आसावरी वरी हो. पण मी काही बोललो नाही. मनात आले तरी बोलायचा धीर झाला नाही. कुणासाठी मी तीर्थ आणावे आणि त्याने कुणी वरे व्हावे, एवढा पुण्यशील मी थोडाच होतो? खंडीभर सोन्याने जे जमले नाही, ते एक तुळशीपत्र साधून गेले, हे काय मला ठाऊक नव्हते?

माझ्याकडे पहात ती म्हणाली, "आधी वासुदेव भाऊजीना फोन करा. त्याना आनंद होईल."

जे मी टाळू पहात होतो, ते माझ्यामागे असे लागत होते. न बोलता फोन करायला मी बाहेरच्या खोलीत आलो. पलीकडच्या बाजूने फोन उचलल्याचा आवाज आणि पाठोपाठ 'हॅलो' असा आनंदीचा शब्द कानावर आला. आता न बोलले, तरी पंचाईत होती. मी कोण हे स्पष्ट न करता मी विचारले, "वासुदेव आहे काय?"

"नाही. पण आपण कोण?" आणि चाचरल्यासारखं करीत तिने विचारले, "विश्वनाथ तर नव्हे!"

"हो"

"आज त्याच्याशी काय काम काढलं?"

"आनंदाची वातमी आहे"

"मला न सांगण्यासारखी?"

"नाही. नाही. तसं नाही. आता माझ्याविषयी उगाच आणखी गैरसमज नको"

"तसं असतं, तर तुझ्या फोनची वाट पहात अशी फोनपाशी बसून राहिले नसते."

"खरं म्हणतेस?" पण उत्तराऐवजी तिने दिलेला हुंदका माझ्या कानांवर आला. आणि मी विरघळलो. घाईघाईत मी तिला आनंदाची बातमी सांगितली. आणि हलकेच म्हटलं, "तुला पहावी, असं वाटतं. येऊ काय?"

"धावत ये. वाट पहाते"

एकमेकात मन गुंतलेल्या पण एकमेकापासून दूर रहावे लागणाऱ्या प्रेमिकांचे हे असेच होत असावे. मनात विकल्प येऊन दुरावा निर्माण व्हायलाही वेळ लागत नाही. आणि गोडी होऊन एकी व्हायलाही वेळ लागत नाही. माझंही तसेच झाले. गेले सात आठ दिवस मी तिला टाळीत होतो. आणि आता फोनवर तिचा नुसता आवाज ऐकल्यावरोवर विरघळत होतो.

आतल्या खोलीत जात मी म्हटले, "वासुदेव फोनवर भेटला नाही"

"आनंदी तरी—"

"फार आनंद झाला तिला ऐकून. संध्याकाळी वासुदेवाला घेऊन ती येणार आहे." मी बोलून गेलो आणि मी खोटे बोलत आहे, ह्याची मला जाणीव झाली. माझ्या अंगी हा खोटेपणा होता तरी किती? की खरे आणि खोटे ह्याची बेमालूम गल्लत माझ्या ठिकाणी झाली होती? आसावरीच्या पायाची हललेली बोटे पाहून आनंदातिशयाने बेभान होणारा मी खरा, की खोटा? तसेच मनात विकल्प असतांनाही आनंदीचा नुसता हुंदका ऐकून विरघळणारा मी खोटा की खरा? मी खरा कुठचा? आणि खोटा कुठचा? सगळी गल्लत होती, हेच शेवटी खरे.

आसावरीला थोपटल्यासारखे करीत मी म्हटले, "तू आता विश्रांती घे. उगाच थकू नकोस." आणि त्याच दमात तिचा निरोप घेऊन मी घराबाहेर सटकलो.

* *



[१६]

आनंदीच्या दाराशी जाऊन मी उभा राहिलो. आणि नेहमीच्या पद्धतीने बेल दाबली. पाठोपाठ दरवाजा उघडला गेला. तिने मला आत घेतले. पण नेहमीप्रमाणे मंद्रि हसून स्वागत झाले नाही. माझ्याकडे पाठ वळवून ती आत निघून गेली. हा काय प्रकार आहे, ते माझ्या लक्षात येईना. तिच्या पाठोपाठ आत जात मी म्हटले, "मी यायला नको होते; पण आलो. तू बोलावलेस म्हणून आलो. नको असेन, तर हा चाललो"

"जायचं असेल, तर जा. पण जाताना माझे एक काम कर"

मी तिच्याकडे प्रश्नार्थक दृष्टीने पाहू लागलो, तेव्हा ती म्हणाली, "जाण्यापूर्वी मला विष आणून दे" तिचे हे बोलणे ऐकून माझा तोल गेला आणि मी म्हटले, "दोघांनाही उपयोगी पडेल."

"ती वेळ आता निघून गेली. मीच आता बाजूला झालं पाहिजे. तुम्हा दोघात आता माझी अडचण नको." आणि तरातरा चालत माझ्या अंगावरून ती दुसऱ्या खोलीत निघून गेली. मी दिङमूढ होऊन जागच्या जागी उभा राहिलो. मी हे काय ऐकत होतो? आनंदीच का हे बोलत होती? आसावरीविषयी तिच्या मनात सुक्ष्म असूया आहे, हे मागेच माझ्या लक्षात आले होते. तिच्या दृष्टीने विचार केला, तर ते ठीकही होते. एका मर्यादेपर्यंत मी ते समजूही शकत होतो. पण आताचे तिचे हे वागणे चीड आणणारे होते. हे मन नको तिथे गुंतते तरी कशाकरता? मिसेस भोगावकर म्हणाली, ते तर खरे नव्हते? माझे मन अपात्र ठिकाणी तर गुंतले नव्हते? मनात नाना शंका आल्या. नाना विचार आले, मिसेस भोगावकरसारख्या बाईने करून दिलेली तिची माझी ओळख, माझ्या हाताला लागलेली शंभराची नोट, माझ्या संबंधात तिने वेळी अवेळी केलेला इतर पुरुषांचा उल्लेख आणि भोगावकरबाईनेच दिलेला सबूरीचा सल्ला! शेवटी खरे तरी काय होते? तिचे माझ्यावरचे प्रेम हे नाटक तर नव्हते. आणि मी मनापासून तिच्यावर प्रेम करून शेवटी मूर्ख तर ठरत नव्हतो? एकदा काय तो सोक्षमोक्ष लावून टाकावा असा विचार करून मी आत जाणार, तोच माझ्या दिशेने चालत ती बाहेर आली. हातातल्या किल्ल्यांच्या जुडग्यातली किल्ली काढून माझ्यापुढे करीत ती म्हणाली, "ही घे."

"कसली किल्ली ?"

"फ्लॅटची ?"

"कशाकरता ?"

"माझ्या नकळत, तुला केव्हाही आत येता यावं, म्हणून—"

"तशी आवश्यकता नाही."

"आहे. फार आहे." माझ्याकडे रोखून पहात ती म्हणाली, "वासुदेव घरात नसताना मी काय करते, घरातच असते की बाहेर जाते; घरातच असले, तर माझ्याकडे कोण येतं, कोण जातं; हे सगळं तुला कळेल. कुणाला न विचारता—"

"तुझ्या बोलण्याचा अर्थ—?"

"तो मिसेस भोगावकरला विचार."

"तुझ्या माझ्यात तिचा काय संबंध ?"

"माझ्या दृष्टीनं मुळीच नाही. पण तुझ्या दृष्टीनं फार."

"आनंदी......!"

"आनंदी मेली. मिसेस भोगावकरपाशी माझ्या चारित्र्याचा पंचनामा केलास तेव्हांच."

"म्हणजे ती इथं आली होती ?"

"हो."

"आणि तू तिला घरात घेतलंस !"

"दारी आलेल्या माणसाला आत घ्यायची केवळ रीत पाळली. चारचौघात तिला घेऊन कुठे मिरवले नाही की गाडीतून तिला कुठे लिफ्ट दिली नाही." ती बोलली आणि माझ्या डोक्यात प्रकाश पडला. भोगावकर बाईने डाव साधला होता. तिला आम्ही तोडून टाकली, त्याचा तिने असा सूड उगवला होता. हे सगळे आनंदीला कसे समजावून सांगावे, ते माझ्या लक्षात येईना. पड खात मी म्हटले, "आनंदी, तुझा गैरसमज होतो आहे." पण माझ्या नरमाईच्या बोलण्याचा तिने निराळाच अर्थ लावला. आक्रमक पवित्रा घेत ती म्हणाली, "इतके दिवस होत होता. तुझ्यावर विश्वासून होते मी. तुझा शब्द हा माझा धर्म होता. तुला आवडत नाही, म्हणून बाहेर जाणं सोडलं. तुला आवडत नाही, म्हणून घरी येणाऱ्या त्यांच्या मित्रांना तोडलं. पावलोपावली तुझ्या मताप्रमाणे वागले. जड गेलं, पण सहन केलं. कारण मला वाटलं की हे सगळं प्रेमापोटी चाललं होतं. पण भोगावकरबाई भेटली आणि सगळा उलगडा झाला. मला घरात कोंडून तुला बाहेर मजा मारायला हवी होती. उनाडपणा करायला हवा होता. पहावं तेव्हा गाडीत तुझ्याबरोबर नवी बाई असते."

"खोटं. साफ खोटं. खोटारडी आहे ती बाई."

"तुझ्या बाबतीत तेवढं खोटं ! आणि माझ्या बाबतीत मात्र खरं ! तिचं ऐकून तू माझा संशय घेतलास. बोलू नये, ते बोललास. नको त्या वेळी बोललास. मी देऊ केलं, ते तुला घेता आलं नाही. आणि माझ्यावरच उलटलास. भलतं सलतं बोललास. प्रेमाखातर सहन केलं मी. वाटलं की तुझं तुला कळेल. पण ऐकलं, ते निराळंच. माझ्या

[ पृष्ठ १६३ वर पहा ]



GREETINGS
from

# TOM & BAY

(Advertising)
Private Ltd.

over the last ~~24~~ 26 years we have built up a reputation in the world of advertising. It is only because we are relentlessly working to achieve....

**'ADVERTISING PERFECTION'**

*Regd. Office*: 658 Joshi Estates, Jangli Maharaj Road, Poona 4.
*Bombay Branch Office*: Hashim Bldg., 3rd Floor, 40, Veer Nariman Road, Bombay-1

Phone 54221,
54222
Gram ALAMODE
Bombay Office
Phone 253068






# चुंबन

एक देणे-घेणे

भत्ता वाढवा

भत्ता वाढ झालीच पाहिजे पपा!
नाहीतर चुंबन देणे परवडणारच नाही.

मम्मी, पुष्पीकडून एका चुंबनाला मिळाला.
बरा आहे ना सौदा?

भारतांत सर्वत्र चुंबनाचे देखावे दिसू
लागले तर पुढच्या पिढीचे काय
होईल ग?


विरोधी पक्षांच्या चुंबाचुंबीवर आळा
घालण्यासाठी, चुंबन संस्थांचे तुम्ही
राष्ट्रीयीकरणच का करीत नाही?
जीवन ही एक कादंबरी
समीक्षणांत, अठराचे ऐवजी चौदा
चुंबनांचाच उल्लेख केला आहे तुम्ही!
उरलेली चार परत द्यावी
लागतील तुम्हाला!!
जादा धान्य द्याल तर
मी चुंबन देण्यास तयार आहे
असे म्हणताक्षणी त्यांनी धान्याचा
कोटाच कटाप केला!
शिवराम जोशी

(पृष्ठ ९२ वरून–**गणिकांची शाळा**)

करणे बरे. कंकालीने गणिकांना केलेला हा उपदेश कुलस्त्रियांनाही तितकाच उपयोगी आहे. स्वतःच्या पतीच्या प्रवत्तीचा अभ्यास करून त्याला रस वाटेल असे वर्तन करणाऱ्या कुलस्त्रीचा पती तिच्या मुठीत राहील हे उघडच आहे.

गणिकेने स्वतःचे मदतनीस वीट वगैरे तसेच अपेक्षित कामुकांचे मित्र यांना वानगीदाखल स्वतःचा सहवास देऊन आपले कलावैभव दाखवावे आणि अंकित ठेवावे. हेच मित्र जाहिरात करून धंदा आणत असतात. त्यांच्या आहारी जायचे नसते. कृपेच्या स्वरूपात त्यांना छुपी झलक दाखवावयाची असते. संभवनीय गिऱ्हाईकात श्रीमंताचा एकुलता पुत्र, पालक नसणारा श्रीमंत तरुण हे सहज समजणारे लोक आहेत. त्याचप्रमाणे, पढतमूर्ख म्हणून अनुभवशून्य विद्वान, सदा रोगी म्हणून बायकोला न आवडणारा माणूस, ज्याच्या पौरुषाबद्दल लोकांनी प्रवाद पसरल्यामुळे जो साशंक आहे असा माणूस असेही पुरुष त्या यादीत आहेत. "तुम्ही माझ्यावर काय जादू केली आहे हो ?" अथवा "तुमच्यापासून तुमच्याच सारखा मुलगा मला हवा" किंवा "गडे, मला तुमच्याबरोबर यात्रेला नऊन आणा ना !" इत्यादी कोणत्या लाडक्या गोष्टी केव्हा कशा बोलाव्या याची तालीम मग कंकाली करून घेते. जे काय मागायचे, लुटायचे ते मांडीची मिठी पडावयाच्या आत पुरे व्हायला हवे; कारण एकदा माणसाने ढेकर दिला की मग पिकलेल्या आंब्याची फांदी हाताशी वाकलेली असली तरी तो तिला हात लावीत नाही; म्हणून कंकाली उपदेश संपविते.

अर्थात कुंटीणीने नुसता उपदेश करून थांबावयाचे नसते. हात धरून प्रयोगही करून घ्यावयाचे असतात. समयमातृकेच्या पुढील भागात कंकाली कलावतीकडून सारे करून घेते आणि लक्षाधीश पण चिकट व्यापाऱ्याच्या मुलाला लुटून तिला लक्षाधीश बनविते. या कथेत शृंगाराची लयलूट तर आहेच. शृंगाराच्या या रंगपंचमीतील एक त्यातल्या त्यात फिकट उदाहरण द्यावयाचे तर रात्र संपल्यावर कलावती कंकालीला जे इतिवृत्त सांगते त्यातील एक वर्णन पहा. ती म्हणते: 'रात्री डौलदार दिसणारे माझे स्तन खाली मान घालून पडले आहेत ते त्या अननुभवी पोऱ्याला त्यांनी भूल घातली म्हणून, लाजून नव्हे काही. त्यानेच रात्रभर केलेल्या निर्दयतेमुळे हा चोळा-मोळा झालेला आहे.' अशा सुरात सारा शृंगार आहे. या शृंगाराबरोबर विनोदही आहे. विनोदाचा विषय आहे कोटयधीश असा चिकट वाणी. त्याचे हे वर्णन पहा

"मुलाने चोरून नेलेल्या सोन्याच्या काळजीत तो व्यग्र होता. त्याच्या हातात तीन कोटीचा दस्ताऐवज होता. समोर काही याचक होते त्यांना तो आपण आंधळे आहोतसे दाखवीत होता. कुणी व्याजात सूट मागत होते त्यांच्याशी तो बहिरेपणाने वागत होता. त्याची छोटी मुलगी आईच्या सांगण्यावरून घरखर्चासाठी पैसे

मागण्यासाठी आली होती तिच्यावर तो कावत होता. सतरा ठिकाणी फाटलेले व धुळीने कळकट झालेले धोतर तो नेसला होता. ते जेमतेम त्याच्या गुढघ्यापर्यंत आले होते. लक्तरे झालेली एक लोकरीची चादर तो पांघरला होता. त्याच्या आत एक डगळ डगला असावा असे वाटत होते. तेल व चिखल यांची वेलबुट्टी असलेली चामट टोपी त्याने डोक्यास खुपसली होती. घामान धुरकटलेल्या त्याच्या राकट दाढीत मळी मिसळून तिच्या लोळघा झालेल्या होत्या. इ."

हा वाणी किती चिकट आणि धूर्त असेल ! पण कंकाली त्यालाही पूर्णपणे नागविते. अतिरिक्त लोभ हे त्याचे मर्मस्थान ओळखून त्या लोभालाच ती आवाहन करते आणि त्याला पुरा गिळून टाकते. व कथानक संप्रते.

ललित रचनाकार म्हणून क्षेमेंद्र लक्षणीय नाही. तो दुय्यमच आहे. परंतु त्याच्या ग्रंथातील वास्तवता कल्पनाप्रचुर अशा संस्कृत साहित्यात विरळा आहे. या वास्तवात काही ठिकाणे अशी अतिरेकी वाटणारी आहेत की ती अनौचित्याच्या आरोपाला कारण व्हावी. विशेषत: क्षेमेंद्र हाच संस्कृत साहित्यातील औचित्यविचाराचा एकमेव उद्गाता असल्याने त्यांच्याच ग्रंथातील या स्थलांकडे टीकाकार काकदृष्टीने पहातात. एक स्थल असे आहे की तिथे गणिकावृत्तीत वाढणारी आठ वर्षाची मुलगीच पुढाकार घेऊन पुरुषांना नादी लावते. आठ वर्षांचे वय हीच लग्नाची मर्यादा असताना गणिका घरातील आठ वर्षाच्या मुली इतक्या शहाण्या होत असतीलही. एक अतिशयच भयंकर वाटणारे स्थल गणिकांच्या संभाषणातील विनोदाचे आहे. एका तगडया तरुणापासून जास्त त्रास होऊ नये म्हणून एका गणिकेने त्याला कंबर दुखण्याच्या सबबीवर पहाटेपर्यंत टोलविलेले असते. वेळ थोडा उरताच ती त्याला घाईने थोडे सुख देते आणि म्हणते,

"तुमच्या स्पर्शात मोठे अमृत आहे हो. माझा शिणवठा आणि दुखणे कुठच्या कुठे पळाले."

त्यावर तो मूर्ख रडू लागतो आणि गणिकेने विचारल्यावर खुलासा करतो,

"माझ्या स्पर्शात अमृत आहे हे मला माहीत असते तर कटिशूलाने माझी आई मेली तिला मी मरू दिले नसते." हे सांगून त्या गणिका खळखळून हसतात.

हे वाचल्यावर सुसंस्कृत माणसाला चपराक बसावी तसे खटकते हे खरे. पण बोलून चालून गणिका असणाऱ्या स्त्रिया एकमेकीत कुणाची कुचाळकी करताना असला विनोद करीतच नसतील असेही नाही. मातृत्वाची प्रतिष्ठा त्याना काय होय ! त्यामुळे क्षेमेंद्राचीच 'वास्तवता आणि त्याचेच औचित्य यातील हा तिडा मोठा नाजूक आहे. कलावतीच्या जाळ्यात फसणारा वैश्यपुत्र हाही एक कोवळा पोरगा आहे. हेही टीकाकारांना खटकते. परंतु सर्वसाधारण वाचकांसमोर गणिकांचे जे चित्र क्षेमेंद्र उभे करतो ते नुकत्याच वयात आलेल्या कोवळ्या पोराच्या जीवनाची गणिकेने माती केली या भडक दिसणाऱ्या रंगानीच अधिक परिणामकारी होते.' या ग्रंथाचे स्वरूप द्विविध आहे. गणिकांना असलेला उपदेश कुलस्त्रियांनाही उपयोगी आहे हे आपण पूर्वी पाहिले. त्याप्रमाणेच श्रीमंताच्या कोवळ्या पोराला कसे कापावे हे गणिकेला सांगणारा हा ग्रंथ स्वत:च्या वयात येणाऱ्या मुलांना कसे सांभाळावे हे आईबापांनाही सांगतो. मुलात लैंगिक जागृती चवदा-पंधराव्या वर्षी होते आणि याच वेळी ती कुमार्गाला लागतात हे आधुनिक मानसशास्त्रज्ञांनाही मान्य आहे. क्षेमेंद्राची पंचविशीची नायिका पंधराच्या पोराशी जे शृंगाराचे चाळे करते त्यात कुठे विद्रुपता, कुठे अनौचित्य, कुठ उत्तानता, कुठे असौंदर्य यांची रुखरूख हळव्या वाचकाला जाणवते. पण हे वर्णनच एका विद्रुप आणि दाहक विषयाचे आहे. वेश्यांच्या हितासाठी लिहिलेला हा ग्रंथ तसा कुलीनांच्याही' हिताचा आहे. साऱ्यांनाच इथे काही शिकावयाचे आहे. ते स्वप्नरम्य लालित्यांतून जितके शिकण्याजोगे आहे तितकेच किंवा त्याहून अधिक विद्रुप वास्तवतेतूनही शिकण्याजोगे आहे. त्या दृष्टीने हा आगळा वास्तव ग्रंथ चक्र, वासूनाका, माहीमची खाडी असल्या ग्रंथाचा पूर्वज आहे.

• • •



सुरेश वेंगुर्लेकर



एखाद्या दगडी मूर्तीचं एखाद्या ओंगळ घाणेरड्या माणसानं चप्पक चुंबन घेतलं तर त्या मूर्तीला काय वाटेल ?....

मिसेस् पानसे इज अ ब्युटी !

शी इज शार्प टू.

आणि नोकरी करणाऱ्या सुबुद्ध सुंदर विवाहित स्त्रीला तिच्या या घराबाहेरच्या आयुष्यात एखाद्या पुरुष मित्राच्या कंपनीची आत्यंतिक गरज असते असं खुद्द पानसेबाईच म्हणतात. नुसतंच असं म्हणून त्या थांबत नाहीत. अशा कंपनीसाठी त्या माझीच निवड करतात.

एका शनिवारी ऑफीस सुटल्यानंतर मी निघायच्या तयारीत असतो आणि बाई मला विचारतात—

"निघालात कुळकर्णी ?"

"हो. कां ?"

"मलाही यायचं होतं आईकडे आज."

"माझ्या ? ते कशाला ?"

"आम्ही लगीन करू का म्हणून विचारायला."

"नि मग मिस्टर पानशांचं कसं ?"

"त्याना पाहू आपण दुसरी एखादी बायको. चालेल ?"

"विचारून सांगतो."

"कुणाला ?"

"पानशांना."

नि मग आम्ही दोघंही खळाळून हसतो.

मग बाई म्हणतात,

"अहो आईकडे. म्हणजे माझ्या.. म्हणजे पार्ल्याला."

"पण मी पार्ल्याला.

"रहात नाही ते ठाऊकाय मला. पण दादरपर्यंत तरी कंपनी द्याल की नाही ?"

"ग्लॅडली."

न कर्त्यांचा वार शनिवार म्हणतात. पण बाईंना मी पहिली कंपनी दिली ती अशी एका शनिवारीच.

पण आम्ही ऑफिसातून बाहेर पडलो

आणि पुन: बाईंनी विचारलं,

"कुळकर्णी—"

"हं?"

"अगदी सरळ घरीच जायला हवं का तुम्हाला?"

"तसंच काही नाही. वाकड्या वाटेने पोहोचायलाही हरकत नाही."

"मग वाट तुमची पार्ल्यापर्यंत वाकडी करायला काही हरकत आहे तुमची?"

"मी कधी म्हणालो हरकत आहे म्हणून?"

"दॅट्स् लाईक-अ-गुड् बॉय!"

आणि बाईंनी चक्क माझ्या पाठीत लहानसा धपकाच घातला.

बाईंचा हा धपका मलाही अनपेक्षित होता. पण लगेच त्या म्हणाल्या,

"आर यू सरप्राईज्ड मिस्टर कुळकर्णी?"

"कशाबद्दल?"

"द-वे आय हॅव अॅप्रिशीएटेड यू. म्हणजे पाठीत तुमच्या धपका घातल्याबद्दल. बट् टू टेल यू आय् अॅम सो व्हेरी हॅपी वुईथ युवर क्विक डिसीजन. नाही तर कुळकर्णी फालतू फालतू गोष्टीत निर्णय घ्यायला अकारण वेळ लावतात माणसं. कुठलाच निर्णय न घेता उगाचच लोंबकळत रहातात. साध्या साध्या गोष्टीत.. या असल्या लोंबकळणाऱ्या माणसांची अगदी चीड येते मला. इतक्याच झटकन तुम्ही नाही म्हणाला असतात ना तरी तेही तितकंच आवडलं असतं बघा मला. इट वॉज सो नाईस ऑफ यू टे टेक द डिसीजन इमिजिएट्ली. दॅट आय कुड नॉट डू इट विदाऊट-अ-पॅट ऑन युवर बॅक."

यावर मी हसलो. बाई म्हणाल्या,

"तुम्ही बोलत नाही कुळकर्णी!"

तरीही मी न बोलता आणि चेहेऱ्यावरचं स्मित न मोडता तशीच बाईंबरोबर पावलं टाकतं राहीलो. पण बाई अशा गप्पपणे चालायला अर्थातच तयार नव्हत्या.

"तुम्ही कसला विचार करता आहात का कुळकर्णी?"

"हूं."

"कसला विचार करता आहात?"

"नाही विचार नाही करत. आय वॉज जस्ट एंजॉईंग इट्!"

"काय?"

"द-वे यू एक्स्प्लेन्ड इट."

"चुकलं का काही?"

"नो, नो. तुम्ही ते अतिशय सुरेख स्पष्ट केलंत.

इन्फॅक्ट, इट वॉज कॉम्प्लीकेटेड..अॅन्ड वॉज रादर डिफीकल्ट टू एक्स्प्लेन... बट् यू कुड डू इट मच फेअरली."

"आर यू मेकींग इट युवर टर्न नाऊ?"

"कसली टर्न म्हणताय?"

"टू अॅप्रिशिएट मी इन् रिटर्न."

"सर्टन्ली नॉट. यू डिझर्व इट् मिसेस पानसे."

"मग ठीक आहे."

मग बाईंनी मला थोडी माहीती पुरवली. फार दिवसपर्यंत मिस्टर पानसेच बाईंना माहेरी पोहोचवायला सोबत करीत असत. मग एके दिवशी बाईंनी पानशांना सांगितलं म्हणे—,

'तुमच्याशी संसार करताना आम्हालाही थोडा रिलीफ हवा असतो. थोडी प्रायव्हसी आवश्यक असते. म्हणून आम्ही माहेरी जातो. सो प्लीज डोण्ट डिस्टर्ब इट्!'

यावर अर्थातच मिस्टर पानशांचा आणि बाईंचा पुढचा क्लॅश ऐकायला मी उत्सुक होतो. पण काहीच क्लॅश न उडता पानशानी बाईंचं हे प्रपोजल मान्य केलं होतं म्हणे. म्हणजे या घटनेतला एकूण चार्मच संपला होता मुळी. असो!

तर आम्ही चर्चगेटच्या दिशेने चाललो होतो आणि एकदम थांबून बाई म्हणाल्या,

"कुळकर्णी, असं केलं तर?"

"कसं?"

"पार्ल्यालाही आपण जरा लांबच्याच मार्गानं गेलो तर?"

"मी तुम्हाला कंपनी देण्याचं मान्य केलं आहे. आता मार्गबिर्ग तुम्ही ठरवायचा."

"तर मग आपण लांबच्याच मार्गानं पार्ल्याला जाऊ. म्हणजे ए-थ्री लिमिटेडने आधी अंधेरीला जाऊ... मग अंधेरीहून लोकलने पार्ल्याला येऊ... हाउ डू यू फाईंड इट्?

"चालेल...पण त्या आधी एक मामुली रिक्वेस्ट आहे..."

"कसली?"

"घोटभर चहाची गरज आहे.."

"ओऽयेस् चहा घेऊ की. पण उडप्याकडचाच चहा घ्यावा लागेल तुम्हाला...

"का म्हणून?"

"कारण तो चांगला चहा देतो म्हणून. आणि चहा व्यतिरिक्त मी तुम्हाला आणखी का हीही घेऊ देणार नाहीय म्हणून."

"म्हणजे हा जुलूम झाला."

"आय कान्ट हेल्प इट् मिस्टर कुळकर्णी. मी आज खूप खूप खूशीत आहे.

"ही कसली अजब खशी आहे?"

"जस्ट इमॅजिन मिस्टर कुळकर्णी.. आयुष्यात चांगला मित्र मिळणं किती कठीण झालं आहे. आणि आज अगदी सहजपणे माझ्या हाती लागला तुम्ही. आय् अॅम गोईंग टू सेलीब्रेट इट्.

"आम्हाला असा उपास घडवून?"

"नो, नो यू विल ईट. पण उडप्याकडे नाही. घरी नेऊन चांगलं आईच्या हातचं खायला घालणार मी तुम्हाला. कुळकर्णी. आपल्या एखाद्या मित्राला घरी आणून आईला त्याच्यासाठी खायला करायला सांगण्यातला आनंद ही एक चीज आहे.

"कुणास ठाऊक?"

"का?"

"माझ्या आईकडे मी तुम्हाला घेऊन गेलो नि हिच्यासाठी काही खायला कर म्हणून तिला सांगितलं तर ती मला काय म्हणेल ठाऊक आहे...?"

"काय म्हणेल?"

"म्हणेल. ये इकडे तुझीच हाडं चुलीत भाजून वाढते तिला—"

हे ऐकून पानसेबाई खदखदून हसल्या. म्हणाल्या, "तर मग नक्कीच येणार हो मी एकदा तुमच्या घरी...








"आधी सांगून या."

"म्हणजे काय होईल ?"

"म्हणजे मी घरीच रहाणार नाही."

"स्टुपीड !"

आणि बाईनी पुन: एकदा माझ्या पाठीत धपका घातला. या वेळी अर्थातच तो मला अनपेक्षित नव्हता.

हॉटेलात खाली गर्दी होती म्हणून जीना चढून आम्ही वर आलो. वरही गर्दी होतीच पण आम्हाला जागा मिळाली. टेबलाच्या दुसऱ्या बाजूला बसलेले दोन छोटे गुजराती डोशावर तुटून पडले होते. शिवाय डोशापूर्वीच खाऊन झालेल्या वडासांबाराच्या खरकट्या बशा अद्यापि तिथेच होत्या. वेटर आला नि त्या खरकट्या बशा उचलण्यापूर्वीच आमची आर्डर विचारू लागला. बाईंनी नजरेच्या खुणेनेच त्याला आधी बशा उचलवायला लावल्या. मग त्याला आर्डर दिली–"सीर्फ दो चा."

कपाळाला आठ्या घालून बाईंची ऑर्डर घेऊन वेटर गेला. हॉटेलात येणारे बहुतेक सारे आधी काहीबाही खात होते. नंतर चहा मागवत होते. बाईंनी मात्र त्याला 'सीर्फ दो चा' आणायला सांगितला होता आणि त्या आधी नुसत्या नजरेच्या धाकात आधीच्या खरकट्या बशा उचलवायला लावल्या होत्या. साहजिकच तो थोडा घुश्शात होता. चहा आणला आणि टेबलावर त्याने तो जवळ जवळ आदळलाच. चहा डुचमळला. . .बशीत सांडला. कपबशीचा टेबलावर अनावश्यक आवाजही झाला. ताडकन् उठून बाई उभ्या राहिल्या. . .त्या काय करताहेत हे समजण्यापूर्वीच त्यानी त्या वेटर-कम पोराचा कान धरला.

"उठाव. . .उठाव पैले ये च्या."

"क्या हुवा ?"

"तुमको पता है क्या हुवा. पैले ये चाय उठाव. . .दुसरा ले आव. . .और सर्वीस कैसे देना मालीक को पुछ के आव."

बाईंच्या धारदार नाकाच्या नाकपुड्या फुलून लाल झाल्या होत्या. . आणि पक्क्या निश्चयाने त्यांनी पोराचा कान धरला होता. पोराने मुकाटपणे चहा उचलला नि मगच बाईनी त्याचा कान सोडला.

मी हे सारं अतिशय थंडपणे पहात होतो. कुठल्याही प्रकारे त्यात भाग न घेता. माझ्या या थंडपणाने समोरच्या गुजरात्याना बहुधा शंका निर्माण झाली होती. . . हा पुरुष या बाईंबरोबरच आला आहे ना ? आळीपाळीने ते बाईंकडे. . . माझ्याकडे चोरून पहात होते. आणि त्यांच्या चोरट्या नजरांची गम्मत चाखत तितक्याच थंडपणे मी वेटरची वाट पहात बसून होतो. सुदैवाने बाईही माझ्याशी बोलायला विसरल्या होत्या. त्याही अद्यापि त्या वेटरच्याच नादात होत्या.

शेवटी एकदाचा तो चहा घेऊन आला. त्याला पाहून येणारे हसू मोठ्या मुष्कीलीनेच मी आवरू शकलो. विचारा आता व्यवस्थित ट्रेमधून चहा घेऊन आला होता. तो जरादेखील हालणार नाही याची काळजी घेत ट्रेतल्या कपबशा त्याने आमच्यासमोर ठेवल्या होत्या. बिलकूल आवाज होऊ न देता. अत्यंत अदबशीरपणे. त्याच्या प्रत्येक हालचालीवर बाईंची सक्त नजर होती. एकूण एका कानपिचकीने तो बरेच शहाणपण शिकला होता.

आमचा चहा पिऊन झाल्यावर तितक्याच अदबशीरपणे तो पुन: बिल घेऊन आला. बाईनी पर्समधून रुपयाची नोट काढून बिलापाशी ठेवली. त्याने मोड आणून दिली. ती उचलून बाईनी सरळ पर्समध्ये टाकली. टीपसाठी एकही नाणं मागे न ठेवता. मी चाट झालो.

पण दुसऱ्याच क्षणी पर्समधून बाईनी रुपयाची नोट काढली नि ती टीप म्हणून बिलाच्या बशीत ठेवून त्या उठल्या. पन्नास पैशांच्या बिलाला बाईनी रुपयाची टीप दिली होती.

जिन्याच्या कोपऱ्याशीच पोर उभा होता. त्या टीपवर त्याचा विश्वास बसत नव्हता. पण तेवढ्यात जिना उतरण्यापूर्वी त्याचं डोकं घुसळून बाई त्याला म्हणाल्या–

"घुस्सा नहीं करना. "

पोरगा लाजत लाजत हसून मानेनेच नाही म्हणाला.

हॉटेलातून बाहेर पडून आम्ही बसस्टॉपच्या दिशेने चालू लागलो. माझे मौन आता बाईंना जाणवले.

"मिस्टर कुळकर्णी, इट इज सिम्पली ऑफूल !"

"काय ऑफूल ?"

"तुम्ही काहीच बोलला नाही. . ."

"तुम्हाला आत्ता आठवण झाली ?"

"खरंच माझ्या हे आत्ता लक्षात आलं. . ."

"म्हणजे जे घडलं त्या साऱ्याशी तुम्ही इतक्या समरस झाला होता की मी तुमच्याबरोबर आहे याची तुम्हाला जवळ जवळ आठवणच नव्हती."

"कुळकर्णी असं झालं खरंच. आय अॅम् सॉरी."

"छे, छे, सॉरीबिरी काही म्हणायचं नाही. एकदम अलीप्त होऊन त्या प्रसंगात तुम्ही ज्या बुडून गेलात ते मला आवडलं. एरव्ही हा सगळा प्रकार कुणालाही मामुली वाटावा. पण एखाद्या कलावंताच्या कसबानं तुम्ही त्यात विलक्षण रंग भरलात. म्हणूनच मिसेस पानसे मी ते सारं बिलकूल इंटरफिअर न करता पहात राहीलो. तुम्हाला कल्पना नाही, एखाद्या दर्जेदार नाटककाराने अत्यंत समर्थपणे पकडलेलं एखादं दृश्य पहायला मिळाल्यासारखं मला वाटतं आहे."

"वॉज दॅट रिअली सो.. ?"

"व्हेरी ट्रुली इट् वॉज सो...तुम्हाला आणखी सांगू मिसेस् पानसे...?"

"हं..."

"माझ्या मनात असंही आलं—या सगळ्या प्रकारात देवाने मला वेटरच कां केलं नाही..."

"यू आर मेकींग इट् नाऊ फनी...

"नो, नो नॉट अॅट ऑल. तुम्हाला दुसरी बाजू अद्यापि लक्षातच आली नाही मिसेस पानसे. जरा त्या वेटरच्या भूमिकेतून हे सगळं तपासून तर पहा. पदार्थ...कपबशा... बिलं...टीप्स्... या त्याच्या रोजच्या आयुष्यात आज केवढं निराळं घडलं आहे. हॉटेलात एक सुंदर बाई येते काय...त्याच्यावर रागावते काय... चक्क आपल्या सुंदर बोटांनी त्याचा कान धरते काय... आणि पन्नास पैशांच्या बिलाला रुपायाची टीप देऊन जाताना आणि वर त्याचं डोकं घुसळून त्याला 'घुसा नही करना' म्हणते काय... जस्ट इमॅजिन हाव् स्वीट इट् कुड् बी फॉर हीम.. आयुष्यभर सांगण्यासारखी एक घटना त्याच्या आयुष्यात घडली आहे मिसेस् पानसे. .जरा आठवून तर पहा, तुम्ही त्याचं डोकं घुसळून त्याला 'घुसा नही करना' म्हणालात तेव्हा तुमच्या अनपेक्षित स्पर्शाने लाजेने तो इतका गुदमरून गेला.

"ओफ्. .इट्स् सोऽऽ ब्युटीफल... अॅन्ड आय वॉज जस्ट मिसिंग इट् कुळकर्णी, यू आर रिअली ग्रेट ! आणि कीनई कुळकर्णी मला आता आणखी एक ब्युटी कॉम्प्लेक्स उकलला आहे..."

"व्हॉट इज दॅट...?"

"तुम्हाला लेखकाचा तिसरा डोळा आहे."

"खरंच तसं असेल तर मला वाटतं आपण आता इथं थांबायला हवं."

"का ?"

"कारण चांगल्या लेखकाला नेमकं कुठं थांबावं हेही समजावं लागतं म्हणे.."

"येस् फार थोड्यांना ते समजतं. पण आपण थांबायचं म्हणजे नेमकं काय करायचं ?"

"म्हणजे वुई शुड बी नाव् नॉर्मल. म्हणजे अजून बस का आली नाही याचा आपण आता विचार करू..."

"खरंच बस का अजून आली नाही ?"

पण यावर बसस्टॉपच्या खांबापलीकडे उभा असलेला पांढऱ्या पोषाखातला तिकीटचेकर आम्हाला म्हणाला—,

"वा ऽऽ अहो एवढ्यात दोन बसेस येऊन गेल्या तरी चढला नाही तुम्ही... तुमच्या मागची माणसंही चढून गेली ना' त्या बसमधून..."

"अच्छा ?"

"हाऊ व्हेरी फनी ऽऽ...

मी आणि मिसेस पानसे खूप हसलो.

तेवढ्यात मग आणखी एक बस आली. आम्हाला ती गमतीदार माहिती पुरविणाऱ्या त्या चेकरला घाईलाजाने उतरणाऱ्या लोकांची तिकीटं तपासायला सोडून आम्ही बसमध्ये चढलो.

आम्ही अप्पर डेकवर आलो. पण बाईना नि मला एकत्र बसायला जागा मिळाली नाही. बाईना मिळालेली सीट पुष्कळच पुढे होती. नि माझी बरीच अलिकडे. कंडक्टर माझ्यापाशी आला. मी अंधेरीची दोन तिकीटं काढली.

मला जरा बरं वाटलं. प्रथमच बाईंचा इतका दीर्घ सहवास लाभत होता. अचानक त्यांची माझी पानं जुळणारी निघाली होती. माझ्या दृष्टीचा वेध त्यांना समजत होता...त्याच पातळीवर काही लक्ष्य त्याही साधू शकत होत्या. अशी कंपनी मिळाल्यावर. शहरातल्या घबडग्यातून








वावरतानाही रानातून पक्ष्यांच्या मागे धावतानाचा आनंद मिळू शकत होता. पण म्हणून आधाशासारखं त्या आनंदावर तुटून पडणं ठीक नव्हतं. चवीनेच त्याचा लाभ घेणं खरं होतं. म्हणूनच बाईंना तिथे नि मला इथं सीट मिळाली याचं मला फार बरं वाटलं. आमच्या सहवासातला हा अल्पसा खंड मला तरी आवश्यक वाटत होता.

अगदी शिवाजी पार्क येईपर्यंत, बाईंच्या शेजारी जागा झाली नाही. प्लाझाच्या वळणावर बस वळताना तर माझ्या लक्षात आलं—बाई शेजारच्या त्या पुरुषाशी काही बोलत होत्या... म्हणजे त्यांच्या शेजारी कुणी ओळखीचाच बसला होता की बाईंनी त्याच्याशीही ओळख केली होती... ? पण तेवढयातच तो उठला. बस शिवाजी पार्कच्या स्टॉपपाशी थांबत होती. मला वाटलं तो उतरत असावा. पण तो उतरला नाही. तिथंच जवळ रिकाम्या झालेल्या दुसऱ्या सीटवर तो जाऊन बसला. मी बाईंच्या शेजारी जाऊन बसलो नि मग सगळा खुलासा झाला. कोपराने मला ठोसत बाई म्हणाल्या—,

"से थॅंक्स टू हीम."

मी वळून पाहीलं. तो आमच्याकडेच पहात होता. मी म्हणालो—,

"थॅंक्स."

तो रुंद हसला. बाईंनी मग खुलासा केला...

"मी त्याला म्हणाले—इफ् यू वुड नॉट माईंड सिटींग देअर, माय परेंड कॅन जॉईन मी. तो म्हणाला सर्टनली नॉट. यू शुड् हॅव सेड इट् मच बिफोर. आणि तो उठून तिथे बसला."

मी म्हणालो,

"पुअर गाय !"

"व्हाय डू यू से दॅट ?"

"सभ्यपणाचा पोषाख घालून समाजात वावरताना माणसाला असंच गरीब होऊन आपली मोक्याची जागा दुसऱ्याला द्यावी लागते. एरव्ही मनापासून एखाद्या सुंदर बाईच्या शेजारून उठून बाजूला जाऊन कोण कशाला बसेल ? मी देखील नसतो बसलो."

"सो यू आर !"

मी मान हलवली.

बस माहीमच्या खाडीवरून धावत होती. समुद्र खूप आत गेला होता. खाडीत खड्डया खड्डयातून नुसताच चिखल होता. कुठे कुठे दाट चिखलातूनही झाडोरी होती. खाडीच्या दोन्ही काठाने झोपडया होत्या. काही झोपडयांच्या शेजारी मेथीचे वाफे होते. बसमध्ये घुसणारा वारा अंगाशी झोंबत होता. जीवाला विलक्षण हळवं. हळवं करीत होता. एकदम बाई म्हणाल्या.

"मिस्टर कुळकर्णी तुमच्याशी आयुष्यभर अशा गप्पा मारायला मिळणार असतील तर या समोरच्या खाडीतूनसुद्धा भटकेन मी तुमच्या बरोबर."

मी चपापलो. घाईने बाईंचा हात हातात घेऊन घट्ट दाबीत म्हणालो—,

"मिसेस पानसे—यू आर गेटींग सिक. प्लीज डोन्ट गेट सो, प्लीज. इट्स् नॉट करेक्ट टू बी दॅट इमोशनल"

आणि मी माझ्या हातातला बाईंचा हात थोपटत राहीलो.

बाईंनी माझ्या हातून हात काढून घेतला नाही. माझ्या स्पर्शाचा अर्थ त्या उमगल्या. त्यांनी स्वतःला सावरलं. काहीही न बोलता त्या खिडकीतून बाहेर समुद्राकडे पहात राहील्या.

बॅंड्रा टॉकीज मागे टाकून बस पुढे निघाली. मुंबईतल्या उंच इमारती आता मागे पडल्या. रस्त्याच्या दोन्ही अंगांनी छोटे छोटे जुने-नवे बंगले होते... मध्येच एखादं कॉन्वेंट स्कूल मागे पडत होतं.

बाईंनी खिडकीतून एकदम डोकं आत घेतलं. रस्त्यावरून जाणाऱ्या एका ख्रिस्ताव बाईकडे बोट करून त्या म्हणाल्या—,

"कुळकर्णी... त्या बाईच्या डोक्यावरल्या टोपलीतलं फिश तुम्हाला ठाऊक आहे...?"

"ठाऊक आहे.... मुळे म्हणतात त्याला."

"करेक्ट. मघाशी पाहीलंत तुम्ही... समुद्रावर कितीतरी बाया-पुरुष हातात कोयती घेऊन ओणव्याने मुळे रापत होते... ओफ् कुळकर्णी मला की नई खूप दिवसापासून या समुद्रावर येऊन मुळे










रापायची इच्छा आहे. यू नो–ती कोयती असते ना, तिच्या टोकानं ओणव्याने उभं राहून घाळू ओरबडायची. .खट्कन् आवाज झाला ना. . .की कोयतीला मुळा लागला समजायचं. .कुळकर्णी प्रत्येक नवा मुळा सापडताना होणारा आवाज पुनः पुनः नवा आनंद देत रहातो. इट्स् सो प्लेझरस् टू डू दॅट. तुम्ही याल एकदा माझ्याबरोबर. .?"

"येईन, पण कोयती तुम्हीच मिळवायची."

"मिळवीन मी. दोन कोयती काय मला कुणीही देईल. .

"दोन कशाला ?"

"म्हणजे–तुम्ही नाही येणार मुळे काढायला ?"

"बिलकूल नाही. मी फक्त नेमका कोन साधून वाट पहात थांबणार. . "

"कसली ? नि कोन साधून म्हणजे. . ?"

"म्हणजे तुम्ही ओचे-पदर खोचून ओणव्याने कोयतीने वाळू रापीत असताना. [ तुमच्या मागे क्षितिजावर बुडणारे सूर्यबिंब कधी येऊन टेकते. .याची वाट पहाणार.

"कुळकर्णी ऽ ऽ

माझा हात हातात घेऊन घट्ट दावत नि उरात दीर्घ श्वास ओढून घेत बाईंनी नुसंताच माझ्या नावाचा उच्चार केला–नि हळूच त्यानी डोळे मिटून घेतले.

माझ्या हाताला होणारा बाईंच्या हाताचा स्पर्श खूपच बोलका होता. मिटल्या डोळ्यानी. . स्वतःपासून अलिप्त होऊन. . .मावळत्या सूर्यबिंबाच्या पार्श्वभूमीवरील स्वतःचंच ओणवं चित्र पहाण्यात त्या दंग होऊन गेल्या होत्या. स्वतःला हरवून बसल्या होत्या. .मधेच कधी त्या पुनः अस्पष्ट पुटपुटल्या. .,

"मिस्टर कुळकर्णी–यू आर अ पोअेट टू. "

मी ओळखलं की हे बाईंचं स्वगत आहे. अजूनही स्वतःच्याच त्या चित्रात त्या बुडून गेल्या आहेत. . .स्वतःपासून अलिप्त होऊन स्वतःच्याच चित्रात बुडून जाणं. . एका विलक्षण सुंदर, अनुभवाचे पापुद्रे उलगडताना त्यात हरवून जाणं. बाईंची तंद्री मी मोडली नाही.

रस्त्याला फारशी गर्दी नव्हती. मोकळ्या रस्त्यावरून बस वेगाने धावत होती. बॉम्बे गॅरेजचा स्टॉप मागे पडला. गोल्डन टोबॅको. . .नानावटी हॉस्पिटल मागे पडलं, आलं. .आणि गेलं. हात माझ्या हातात तसाच ठेवून नि डोकं माझ्या खांद्यावर ठेवून बाई झोपी गेल्या होत्या. एकूण, त्या चित्रातल्या अनुभवाच्या हळुवार लाटानी लोटत. .लोटत. .बाईंना निद्रेच्या किनाऱ्यावर आणून सोडलं होतं. . .

बाई मला मित्र म्हणाल्या होत्या. . या मित्राच्या खांद्यावर मान टाकून त्या शांत झोपल्या होत्या. . .हिंदकळणारी बस कुठल्याही क्षणी त्यांची झोपमोड करील या भीतीने धास्तावून मी अवघडलो होतो. शेवटी बस अंधेरी रेल्वे स्टेशनवर पोचली नि नाईलाजाने बाईंना जागं करणं मला भागच पडलं. तरीही सगळी माणसं उतरून जाई-

पर्यंत मी थांबलो. नंतर बाईंच्या कानाशी हळूच म्हणालो–

"उठायचं मिसेस पानसे–आपण अंधेरीला आलो."

बाई खडबडून जाग्या झाल्या.

"म्हणजे काय कुळकर्णी–तुमच्या खांद्यावर मी चक्क मध्यरात्र झाल्यासारखी झोपले होते... कुळकर्णी मी घोरत बिरत तर नव्हते...?"

"तर. बस थांबल्यावर बसच्या ड्रायव्हरला विचारलं देखील मी–एंजीन कायको चालू रख्खा है...? तो म्हणाला–तुमच्या शेजारच्या बाई घोरताहेत."

आणि मग आम्ही दोघंही खूप मोठ्याने हसलो.

अंधेरीहून लोकलनं आम्ही पार्ल्याला आलो. पार्ल्याच्या स्टेशनातून बाहेर पडताना बाईंनी विचारलं–,

"कुळकर्णी–पूर्वी कधी पार्ल्याला आला होता तुम्ही–?"

"आलो होतो."

"कधी?"

"तेव्हा मी शाळेत जाणारा मुलगा होतो.."

"म्हणजे पार्ल्यातल्या शाळेत होता तुम्ही..? कुठल्या?"

"अहं. इथं शिक्षक रहायचे आमचे एक. चिपळूणकर म्हणून. त्यांच्याकडे आलो होतो." आणि मी हसलो.

"हसलात कां कुळकर्णी.

"आता हसू येण्याजोगाच तेव्हाचा अवतार होता माझा..."

"म्हणजे–?"

"मला वाटतं मी दहावीत होतो तेव्हा. आमच्या वर्गाच्या मासिकाचा मी संपादक होतो.. नि मी निवडलेला मजकूर पहाण्यासाठी सुट्टीच्या दिवशी सरानी मला त्यांच्या घरी.. पार्ल्याला बोलावलं होतं."

"बरं मग?"

"आमचा उत्साह मोठा दांडगा होता. मी संपादक होतो नि सरांच्या घरी मला जायचं होतं. तुटकी चप्पल घालून सरांच्या घरी कसं जायचं? घरात हट्ट धरून नवीन बूट मी मिळवले... ठेवणीतले कपडे केले नि एका पिशवीत कागदाची भेंडोळी भरून घेऊन लोकलनं मी पार्ल्याला निघालो... त्या कागदाच्या भेंडोळ्यातच सरानी लिहून दिलेल्या पत्त्याचे चिटोरे होते... त्याची मध्यच आठवण होऊन मी ते बाहेर काढून पाहू लागलो... तर तेवढ्यात वाऱ्यानं ते जे उडाले ते खिडकीतून बाहेर पडून माझ्या डोळ्या देखत बांद्र्याच्या खाडीत जाऊन पडले..."

"आणि मग?"

"मग काय?" पार्ल्याला उतरून, काखोटीला पिशवी मारून चक्क चिपळूणकर सर कुठ रहातात म्हणून विचारत आख्खं पार्ल हिंडलो मी..."

"अयायाईग ऽऽ मग मिळालेच नाही का तुम्हाला सरांचे घर?"

"मिळालं. पण तोवर नव्या बुटानी पायांचं पुरतं धिरडं केलं. सरांच्या दारात हा संपादक पोचला तेव्हा त्याच्या एका हातात कागदांच्या भेंडोळ्यांची पिशवी नि दुसऱ्या हातात पायातून काढून घेतलेले नवे बूट... असा त्याचा अवतार होता..."

"हु ऽऽ... कुळकर्णी हाऊ व्हेरी फनी ऽऽ... आय कॅन व्हेरी वेल इमॅजिन हाऊ यू मस्ट हॅव अॅपीअर्ड देन"

आणि हॉटेलातल्या त्या पोराचे घुसळले तसे माझे डोके घुसळायचा बाईंचा विचार होता. पण मी सावध होतो. वेळीच बाईंचा हात धरून म्हणालो–,

"आपण रस्त्यात आहोत.. असे काही केलेत तर तुमची पार्लेकर मंडळी वेडे म्हणून दगड बिगड उडवतील आपल्यावर..."

"कुणी नाही दगड उडवीत हो. पार्ल्यातली माणसं आमच्या तशी शहाणी आहेत चांगली..."

"म्हणूनच अधिक भीती.. सिन्स द मोअर रिअल सोशल कन्व्हेन्शनं इज... बहुधा शहाणेच वेड्यांना दगड मारून स्वतःची करमणूक करताना अधिक दिसतात..."

"आय अॅग्री मिस्टर कुळकर्णी..."

वाटेत किरीस्तावणीकडे बाईंनी मेथीची भाजी घेतली.

"मिस्टर कुळकर्णी, तुम्ही आज जेवून जायचं. आमची आई भरपूर कांदा-खोबरं घालून मेथीची भाजी इतकी छान करते म्हणून सांगू."

"एक मात्र नक्की मिसेस पानसे, कुठल्याही परिस्थितीत आज मी घरी जाणार नक्की..."

"म्हणजे?"

"नाही तर घरी पोचल्यावर म्हणायच्या तुम्ही की आता उद्याच जा ना तुम्ही कुळकर्णी.

"नो, नो. तसं नाही म्हणायची मी. डोंच्यु वरी."

मग वाटेत बाईंनी मला माहिती पुरवली. पार्ल्यात त्यांच्या आईचं हे स्वतःचं घर होतं. बाईंचे वडील वारले तेव्हा त्यांनी आपल्या पत्नीसाठी एकुलती एक मुलगी नि

हे घर मागे ठेवलं होतं आणि आता फक्त बाईंच्या आईना घरंच उरलं होतं. मुलगी आता दुसऱ्याची झाली होती आणि म्हणे मिस्टर पानशांनी या घरावर लक्ष ठेवूनच बाईंना मागणी घातली होती.

घरात शिरल्यावरोबर आतल्या दिशेने ओरडून बाई म्हणाल्या—

"मी आले आहे आईऽ.

मग बाईंच्या आई बाहेर आल्या. माझ्याकडे बोट करून बाई म्हणाल्या—,

"आई—हे माझे मित्र, कुळकर्णी. आमच्या ऑफीसात असतात. जेवायला आहेत ते आज आपल्याकडे. असू देत ना आई. ?"

"इस्, पाहीलंतना कशी चहाटल आहे ती ? असू देत नाऽऽ . म्हणून विचारतेय. म्हणजे जशी काही मी तुम्हाला नको म्हणणंही शक्य आहे—"

"अग तसं नाही आई. . हे मला म्हणाले—माझ्या आईकडे घेऊन गेलो जर मी तुम्हाला. ."

मी कपाळाला हात लावला.

बाई हसून म्हणाल्या—,

"बरं नाही सांगत. . म्हणजे आत गेल्यावर सांगते. अच्छा— नाऊ, यू कॅन रिलॅक्स इन् धिस् आर्मचेअर मिस्टर कुळकर्णी. इथं कडेलाच हे बुकशेल्फ आहे. आई आमची लगेच स्वैपाकाला लागेल. . तोवर मी तुम्हाला झकास चहा करून आणते. . आय नो. आय नो यू नीड इट् नाऊ व्हेरी बॅडली.

आणि बाई आईंबरोबर आत गेल्या.

आराम खुर्चीत पडून मी खोलीभर नजर फिरवली. एकटी बाई घरात रहात होती. तरीही घराला पुष्कळच घरपण होतं. भिंतीवर एके ठिकाणी एका उमद्या पुरुषाचं पेंटींग होतं. बहुधा ते बाईंचे वडील होते. त्या चित्राव्यतिरिक्त कुठल्याच भिंतीवर कॅलेंडरदेखील नव्हतं. आराम खुर्चीव्यतिरिक्त खोलीत वेताच्या दोन ऐसपैस खुर्च्या होत्या. एक रायटींग टेबल होतं. बुकशेल्फला पॉलीशचा ताजा. ताजा वास होता. त्या वासाने माझं पुन: एकदा शेल्फकडे लक्ष गेलं.

शेल्फमधून मी काही पुस्तकं बाहेर ओढली. शेक्सपीअर होता. शॉ होता. टेनेसी विल्यम्स होता. आणि आयनोस्कोही होता. मर्ढेकर-केशवसुत होते. . बेडेकरांची 'रणांगण' होती. चार्ली चॅप्लीनची आटोबायॉग्राफीही होती आणि लॉरेन्सच्या, 'लेडी चॅटर्लीज लव्हर. ' ची बॅंड कॉपीही होती.

बाई चहा घेऊन आल्या. सोबत थोडी बिस्कीटंही होती. मी बाईंना विचारलं,—

"हे सगळं कलेक्शन कुणाचं ?"

"अफ्कोर्स माझं. कां ?"

"मग हे सगळं इथे कसं ?"

"ओफ्. . पुस्तकं कशीतरी वाचणं मला मुळीच आवडत नाही. आय हेट रीडींग इन् अ बस ऑर अ ट्रेन. . मी थोडं वाचते. पुस्तक विकत घेऊन वाचते—नि इथं आईच्या घरी येऊन वाचते. मी आजवर वाचलेली सगळी चांगली पुस्तकं, तुम्ही बसला आहात ना कुळकर्णी—त्या आरामखुर्चीत बसून वाचली. पानशांचं घर तर मला पुस्तक वाचायला मुळीच आवडत नाही."

बाईंनी केलेल्या 'पानशांचं घर' या उल्लेखात पुष्कळ काही आलं होतं. त्या संबंधात मी अधिक चौकशी केली नाही. शिवाय तेवढ्यात पुन: बाई म्हणाल्या—,

"कुळकर्णी रॉलींग्जचं 'इअर्लींग' वाचलं आहे तुम्ही ?"

"ओ-येस्."

"ज्योडीच्या 'पा' ने जेव्हा त्याला पाडसाला गोळी घालायला सांगितलं ना तेव्हा पुस्तक मिटून मी पपांच्या या पेंटींगकडे पहात ओरडले होते— नोऽऽनो. . . धावत येऊन आईने विचारलं 'काय झालं गऽऽ! मी काय सांगणार कपाळ ? पण माझ्या हातात पुस्तक पाहून काय समजायचं ते आई समजली होती नि आत निघून गेली होती. . कुळकर्णी मला सांगा—हे असं न सांगता आईशिवाय मला कोण समजून घेणार. . . ? हे माझं असं पुस्तक वाचणं या घराशिवाय आणखी कोण सहन करणार ?"

बाईंच्या पुस्तक वाचण्याला हा एवढा मोठा अर्थ होता. मी स्तिमित होऊन बाईंकडे नुसताच पहात राहीलो.

मग बाई म्हणाल्या,

"मिस्टर कुळकर्णी, मी जरा आईला









अनुक्रमणिका

मदतीला लागू का? भूक लागली असेल तुम्हाला..."

मी हसलो.

बाई आईच्या मदतीला गेल्या.

तासाभराने आम्ही जेवायला बसलो. पानांवर बसताना बाईंच्या आई म्हणाल्या,

"मी हिला म्हणत होते सायकलवर जाऊन पटकन् चक्का घेऊन ये..."

"आणि कुळकर्णी मी आईला म्हणाले– अग गोड धोड कसलं खायला घालतेस त्याना ? तर म्हणते तुम्हाला काय आवडतं विचार तरी.. मी चक्क सांगितलं आईला. माझ्याशी मैत्री करणार का–म्हणून देखील विचारलं नाही मी त्यांना.. त्याना मी हाक मारली नि म्हटलं कुळकर्णी तुम्ही माझे मित्र. नि कुळकर्ण्यांनी माझी मैत्री धरली. आता देखील त्याना अमूक तमूक आवडतं असं मीच ठरवून टाकणार.."

नि मग माझ्या आवडीचा म्हणून– भरलेली वांगी.. बाजरीची भाकरी.. तव्यावर परतलेली मेथीची भाजी.. काकडीची कोशींबीर असा बाईनी बेत केला. हा बेत मला खरंच आवडला. मी भरपूर जेवलो.



जेवणे संपल्यावर बाई म्हणाल्या,

"कुळकर्णी, मी कबूल केलं आहे तेव्हा आज रहा नक्कीच म्हणणार नाही मी तुम्हाला. पण जेवणं झाल्यावर भटकायला जाण्याजोगी एक जवळ जागा आहे.. तुमचं काय म्हणणं आहे ?"

"मिसेस पानसे–मैत्री करताना.. जेवणाचा बेत ठरवताना तुम्ही आम्हाला विचारलेलं नाही. तसंच आता हे विचारण्याचीही आवश्यकता नाही. चला."

बाईंच्या घरातून आम्ही बाहेर पडलो. एका कोपऱ्यावर थांबून पानाच्या पट्ट्या घेतल्या. बाई म्हणाल्या, "मला यात काही कळत नाही. उगाच कशाला बकरीसारखं तोंड हालवू ?"

"मी म्हणालो,

"कळत नाही तरी खा. तुमचे ओठ छान आहेत. आज पौर्णिमा आहे. लख्ख चांदण्यात विड्याने रंगलेले तुमचे ओठ खूप छान दिसतील."

बाई काही बोलल्या नाहीत. पण त्यानी पान घेतलं.

दोन वोळ ओलांडून आम्ही वेस्टर्न हायवेवर आलो. रुंद डांवरी लांबच लांब पसरलेली सडक शांत होती. मला वाटलं हीच ती जागा असावी. पण बाईनी मला रस्ता ओलांडून पलिकडे नेलं.

पलिकडे एअर इंडियाची कॉलनी होती. गेटमधून आम्ही आत शिरलो. गेटपासून सरळ एक रस्ता गेला होता... रस्त्याच्या डाव्या बाजूला पुष्कळ आत कॉलनीच्या इमारती उभ्या होत्या. उजव्या बाजूला प्रशस्त मोकळं माळरान होतं. त्याच दिशेला खूप दूरवर एरोड्रोमही होता. कॉलनीच्या जागेला सारखं लेव्हीलींग नव्हतं. त्यामुळे पावसाच्या पाण्याला वाट करून देण्यासाठी ठीक ठिकाणी या रस्त्याखालून पासिंग होलसची व्यवस्था होती. या होलसवर रस्त्याच्या दोहो बाजूला सिमेंट काँक्रीटचे चौथरे होते. अशाच एका चौथऱ्यावर आंब्याचं झाड वाकलं होतं.

आंब्याखालच्या त्या चौथऱ्यावर आम्ही बसलो. पानांच्या गर्दीने वेड्यावाकड्या छेदलेल्या चंद्राचं दर्शन एखाद्या क्लासिक









मॉडर्न आर्टिस्टसारखं वाटत होतं. बाईंचे लिप्स्टिकने रंगलेले लालेचुटूक ओठ मी कल्पनेने चंद्रावर एके ठिकाणी ठेवून दिले.

बाईंनी विचारलं,

"काय पहाता आहात कुळकर्णी ?"

बाईंना मी माझ्या मनातली कल्पना सांगतली. मला वाटलं ही कल्पना ऐकून बाई खुलतील. पण बाई आपल्यातच होत्या. मग मधेच एकदम म्हणाल्या,

"या ओठांबद्दल एक हकीकत ऐकायची आहे तुम्हाला कुळकर्णी ?"

"सांगणारं भक्कम असल्यावर ऐकणाराला काय ?"

"नाही कुळकर्णी, यू हॅव टू प्रिपेअर युवरसेल्फ टू हीअर इट्."

कपाळाला आठ्या घालून मी बाईकडे पाहीलं. म्हणालो, "आय अॅम प्रिपेअर्ड. सांगा."

बाईंनी लगेच सुरवात केली नाही. थोडया थांबल्या. माझा अंदाज घेतला. मग म्हणाल्या,

"येस आय शॅल टेल यू नाऊ. तुम्ही गांधींच्या त्या शरीरदमनाच्या प्रयोगांबद्दल ऐकलंय ना कुळकर्णी ?"

"ऐकलं आहे."

"कॅन यू बिलीव्ह इट्... गांधीना त्यासाठी प्रयोग करावे लागले बट आय कुड डू इट इन् वन अॅण्ड फर्स्ट इन्स्टन्स ओन्ली..."

"तुम्ही काय सांगता अहात मिसेस पानसे ?"

"वेल, आय हॅव व्हेरी वेल सेड इट दॅट यू हॅव टू प्रिपेअर युवरसेल्फ टू हिअर मी.. ऐका कुळकर्णी—एका ब्रिज कन्स्ट्रक्शनचं कॉन्ट्रॅक्ट मिळावं म्हणून सॅंक्शनिंग ॲथॉरीटीला मिस्टर पानशानी एक डीनर अॅरेंज केलं होतं. पानसे मेड मी टू अटेंड इट. अ कॉर्नर टेबल वुईथ गुड प्रायव्हसी वॉज रिझर्वड फॉर द डीनर. आणि माझ्यासमोर तो कुणी अर्जुनसिंग... द ॲथॉरीटी टू ग्रॅंट अस द कॉन्ट्रॅक्ट येऊन बसला. समोर बसल्या क्षणापासून तो माझ्याकडे आधाशी नजरेने डोळे फाडून सरळ सरळ पहात होता..आणि तो असा पहात असताना मिस्टर पानसे काळजीपूर्वक आपल्या डीशमध्ये लक्ष गुंतवून जेवत होते. मला डीनर अटेंड करायला लावण्यातलं पानशांचं इंटेंशन मी लगेच ओळखलं...."

बाई थोडया थांबल्या. ही निश्चितच बाईंच्यात नि पानशांच्यात क्लॅश उडायची जागा होती. पण बाई काही निराळंच बोलू लागल्या—

"अॅन्ड विदीन् अ मुव्हमेंट आय टुक् द डिसीजन मिस्टर कुळकर्णी. मी आव्हान स्वीकारलं. त्या ॲथॉरीटीचं नव्हे. माझं स्वतःचंच. आय प्रिपेअर्ड मायसेल्फ अॅन्ड वॉज रेडी. आणि मग काही निमित्त काढून आत्ता येतो म्हणून मिस्टर पानसे डीनरमधून उठून गेले. आय टेल् यू मिस्टर कुळकर्णी...द-नेक्स्ट मुव्हमेंट सरळ सरळ उठून त्या दाढी दिक्षीताने विनदिक्कत मला कवेत घेतलं.. मी काय केलं असेल त्या वेळी कुळकर्णी ? आय सिम्प्ली अलाऊड हीम टू कीस मी विदाऊट एनी हेजिटेशन..."

"व्हॉट... ?"

मी ओरडलो.

"येस कुळकर्णी—मी म्हणाले तेच. पण.. पण तुम्हाला ठाऊक आहे, त्या दाढी दीक्षिताच्या ओठात असलेला हा माझा ओठ म्हणजे काय होतं ? इट् वॉज नथिंग बट अ-पीस ऑफ फ्लेश अंडर द स्कीन.. कुत्र्याच्या पुढयातला फक्त एक मांसाचा तुकडा.. ॲबसोल्युटली अ पीस ऑफ फ्लेश... माझ्या देहातल्या कणा कणावर त्या क्षणी माझा इतका ताबा होता कुळकर्णी... की आय वॉज नथिंग बट् अ-स्टोन. अ-स्टोन.. त्या लेण्यात दगडाची मूर्ती कोरलेली असते ना... बस्,तश्शी. कुळकर्णी, त्या...त्या.. दगडी मूर्तीचं एखादा ओंगळ घाणेरडया प्राण्यानं चुंबन घेतलं तर त्या मूर्तीला काय वाटेल ? काहीही वाटणार नाही...काहीही वाटणार नाही. मलाही कुळकर्णी...काहीही वाटलं नाही..काहीही वाटलं नाही."

अ-स्टोन..अ-स्टोन..

मिसेस पानसे वॉज अ-स्टोन देन.

ती हकीकत सारी ऐकताना मीही संपूर्ण दगडाचाच होऊन गेलो. दगडाच्याच डोळयानी बाईकडे पहात राहीलो.

खूप वेळाने मग तापातल्या माणसाचे घोगरट शब्द ऐकू येतात तसे शब्द उमटले—,

"कुळकर्णी...आय् अॅम् प्राऊड ऑफ मायसेल्फ दॅट आय कुड डू इट..."

दुसऱ्याच क्षणी आवेगाने बाईंना कुशीत ओढून त्यांचे मस्तक थोपटत मी म्हणालो—

"आय अॅम टू...मिसेस पानसे... आय अॅम टू..सोऽऽ व्हेरी प्राऊड ऑफ यू..."

डोक्यावरल्या फांद्यांच्या एका बेचक्यातून पूर्ण चंद्र आत डोकावला होता. चंद्राचं फळ लगडलेल्या त्या आंब्याखाली मग किती तरी वेळ आम्ही तसेच बसून होतो.

• • •

आणखी एक ल्योकनाट्योत्सव



'थांबा थोडं, दाभटा घोडं'







—राजाराम हुमणे

... तीन वर्षांत सव्वीस नाटके, सहा लघुकथासंग्रह, पाच ललितलेख, तीन कवितासंग्रह आणि दोन एकांकिका संग्रह

असे माझे बेचाळीस ग्रंथ प्रसिद्ध झाले... एकंदर १४८ पुस्तकें लिहिण्याचा माझा संकल्प आहे....



**सं**पूर्ण नाव : या लेखासोबत छापलेलं माझं छायाचित्र पाहिल्यावर मराठी वाचकांना माझा परिचय करून देताना मी माझं नावगाव सांगितलंच पाहिजे असं नाही. कारण आजवर प्रसिद्ध झालेल्या माझ्या शेकडो कथा-कविता-लेखांबरोबर प्रत्येक वेळेला माझं छायाचित्र न चुकता छापण्यात आलं आहे. प्रसंगी चार ओळींची कविता आणि तिच्याबरोबर माझा चार इंची ब्लॉक छापला गेल्यामुळं 'नाकापेक्षा मोती जड' असाही प्रकार झाला आहे. थोडक्यात माझं नाव पाहिलं की माझी छबी वाचकांच्या डोळ्यांपुढं उभी रहावी आणि माझा मुखडा पाहिला की माझं नाव काजव्याप्रमाणं आपल्या डोळ्यांपुढं चमकावं अशी स्थिती असल्यामुळं हा स्वपरिचय करून देताना नाव घेण्याच्या फंदात मी पडलो नाही. शिवाय इतकं नाव कमावल्यावर ते असं घालविण्यात काय अर्थ ? एक मात्र सांगितलं पाहिजे की माझं संपूर्ण नाव कुणासच ज्ञात नाही. माझं इतकं नाव होऊनही माझ्या वडलांचं नाव अज्ञातच राहिलं आहे. स्वतःचं नाव आणि उपनाव देण्याची फॅशन काही काळापूर्वी मराठी साहित्यात बोकाळली आणि त्याच फॅशनला मी बळी पडलो. थोडक्यात पित्याच्या नावाला मी काळिमा फासला. वडलांच्या नावावर मी चक्क बोळा फिरविला. क्वचित प्रसंगी मी त्यांचं नाव वापरलं आहे. नाही असं नाही; परंतु ते सुद्धा मोठ्या संकोचानं. म्हणजे सोमाजीपंतांचाच संकोच करून. त्यांना साधा 'सो.' बनवून.

**व्यवसाय :** मुख्य व्यवसाय कागदाचा. न्हावी आपला व्यवसाय सांगताना 'आपला धंदा बावा साबनाचा फेस करन्याचा' किंवा परीट आपला व्यवसाय सांगताना 'आपलं काम बुवा साबन सोडायाचं' असं जसं सांगेल तशा अलंकारिक भाषेत मी माझा व्यवसाय सांगत नाही. अगदी लाक्षणिक अर्थानं 'माझा व्यवसाय कागदाचा आहे'. मी महाराष्ट्रातील एक मोठा कागदाचा व्यापारी आहे. अर्थप्राप्ती भरपूर. जोड व्यवसाय मात्र लेखणीचा—म्हणजे लिहिण्याचा. या जोड व्यवसायात पैसा जोडणं महामुष्किल. शब्दामागं आपोआप अर्थ धावतो असं म्हणतात. परंतु तब्बल तीन वर्षांत लेखनावर मी चार पैसेसुद्धा मिळविले नाहीत. पैसे मिळविण्याऐवजी पैसे घालविण्याचेच प्रसंग फार आले.

कागदाचा आणि लेखनाचा अन्योन्यसंबंध असला तरी कागदाच्या व्यापाऱ्याचा लेखनाशी संबंध असतोच असे नाही. माझाही तसा नव्हता. कागदाचा व्यापार चांगला चालला असताना लेखनासारखा 'अव्यापारेषु व्यापार' करण्याचं मला वास्तविक प्रयोजन नव्हतं; परंतु कागदाची रिमंच्या रिमं विकता विकता एकदा माझ्या मनात विचार आला की "आपलं कागदासारखं तुकतुकीत जीवन संपल्यावर आपली सारी रद्दीच होणार. तेव्हा रद्दीत्त्रा काळ असतानाच आपलं क्षर जीवन अक्षर करण्यासाठी अक्षरांचा आधार घेण्याची मला कल्पना सुचली ती तेव्हा. पांढऱ्यावर काळं केलं की आपलं नाव आपोआप उज्ज्वल होईल असं मला वाटू लागलं आणि हां हां म्हणता मी लेखक झालो.

लेखक व्हायला काय काय करावं लागतं याचा शोध किंवा बोध घेण्यासाठी 'लेखनाची प्रक्रिया' 'साहित्यसाधना' "प्रतिभासाधन' यासारखे प्रबंध वाचण्याच्या फंदात मी कधीच पडलो नाही. लेखकाला किंवा लेखनाला अत्यावश्यक असलेला कागद हाताशीच होता. टनच्या टन. हातात फक्त पेन घेतला की झालं. मी हातात लेखणी धरली नि मी लेखक झालो. कागदातून फक्त लक्ष्मीच मिळते असा माझा आजवरचा अनुभव होता. परंतु कागदाला

अनुक्रमणिका

लेखणीशी जोड दिली की सरस्वतीही हात जोडून पुढं उभी रहाते हा अनुभव नवा होता.

सरस्वतीला समोर उभी करून (आणि लक्ष्मीला जराशी बाजूला सारून) मी साहित्य प्रसवू लागलो. हे साहित्य प्रसवतांना दांभिक लेखकांनी वर्णिलेल्या प्रसववेदना मला कधीच जाणवल्या नाहीत. सारं कसं सोपं आणि सरळ. ना पोटदुखी, ना वेदना, ना कळा. कसल्याही कळा न लागतां मला लेखनकळा अवगत झाली. एक मात्र कबूल केलं पाहिजे की कळा जरी लागल्या नाहीत तरी डोहाळे मात्र लागले. ते डोहाळे होते लेखक होण्याचे.

माझे हे डोहाळे पुरवायला माझा मी समर्थ होतो. म्हणजे माझा कागदाचा धंदा समर्थ होता. दिवाळी अंकासाठी मिळालेला कागदाचा कोटा अपूरा पडू लागल्यावर जेव्हां संपादक मंडळी 'काळ्या' कागदासाठी माझ्या दुकानावर घिरट्या घालू लागली तेव्हाच आतां आपल्याला वाटेल तेव्हढी डोहाळ जेवणं मिळणार अशी खात्री वाटू लागली. कागदाच्या गठ्ठ्यावरोबर मी संपादकांच्या हातांत लेखांचे गठ्ठे सारू लागलो. संपादकांच्या नाड्याच माझ्या हातांत असल्यामुळं नडलेल्या आणि नाडल्या गेलेल्या संपादकांना माझे लेख प्रसिद्ध करण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. पहिल्या दिवाळीलाच ५६ अंकात मी फडकलो. माझी बायको म्हणते मी ५६ दिवाळी अंकात चमकलो. खरं म्हणजे एवढे लिखाण करताना मी मात्र चमकलो नाही की चरकलो नाही. वरमलो नाही की शरमलो नाही. मराठीतील प्रथितयश लेखक दिवाळी अगोदर आठ आठ महिने 'घाणा' घालून बसतात. हात दुखेपर्यंत लेखणी चालवितात. मान मोडेपर्यंत लिहितात. परंतु या मानमोडयांना माझा विक्रम मात्र मोडता आला नाही. तुम्हाला सांगितले तर आश्चर्य वाटेल अवघ्या १४ दिवसात ५६ लेख मी पुरे केले. घोड्यावर पक्की मांड घालून बसणाऱ्या घोडेस्वाराप्रमाणे कागदी घोड्यावर मी मांड घालून बसलो आणि त्याला भरधाव फेकीत १४ दिवसात ५६ दिवाळीचे 'किल्ले' काबीज केले. मांडी घालून लिहायला बसलो पण माझे हात कधी शिणले नाहीत की मान कधी मोडली नाही. लिहितानाच सिद्धहस्त लेखकाचे हात दुखले किंवा मान मोडली तर तो लेखक 'इये मराठिचिये नगरी' ताठ मानेनें कसा काय हिंडणार? दिवाळी संपल्यावर ताठ मानेने, स्वतःचीच पाठ थोपटीत, मी केलेला विक्रम ज्याला त्याला मी जेव्हा सांगत सुटलो तेव्हा सारे बेटे चाट झाले. माझ्या मानेप्रमाणेच माझ्या पाठीचा कणाही ताठ आहे की नाही हे पाहण्यासाठीसुद्धा माझी कुणी पाठ थोपटली नाही. जाऊ दे. पोटदुखीने पिडलेल्या मराठी साहित्यिकांत एवढी उदारमनस्कता कुठून असायला?

दिवाळी उलटून गेल्यावर माझ्या साहित्यिक जीवनग्रंथाचं आणखी एक पान मी उलटलं. लेखकाचा मी ग्रंथकार झालो. फुटकळ आणि किरकोळ लेख एकत्र करून त्याचा ठोक आणि घाऊक ग्रंथ तयार करता येतो हे साहित्यिक रहस्य समजल्यावर दिवाळीत प्रसिद्ध झालेल्या लेखांतूनच मला माझी चार पुस्तकं घडविता आली. दिवाळीनंतरच्या दोन तीन महिन्यातच मराठी साहित्याच्या इतिहासात माझ्या नावे चार पुस्तके जमा झाली. साहित्य अकादमीच्या लेखकसूचीत समाविष्ट होण्यासाठी स्वतःच्या नावावर तीन तरी पुस्तके असावी लागतात. मी पहिल्या फटक्यालाच चौकार मारला.

सामान्यतः 'प्रथम ग्रासे मक्षिकापातः' असा प्रकार होतो. परंतु मी पहिला घास घेतला तो सोन्याचा. सुरवातीलाच एवढे यश पदरात पडल्यामुळे मला अधिकच चेव आला. मी भराभर साहित्य प्रसवू लागलो. हे साहित्य लिहिताना माझ्या लेखणीनें कधीही कुरकुर केली नाही. तिचा आवाकाही मोठा होता. एका दिवसात एक दोन एकांकिका, पाच सहा साहित्य लेख, पाच पन्नास कविता मी सहज 'हाणत' असे.

बी कवींनी आपल्या सबंध आयुष्यात शे-सव्वाशे कविता लिहिल्या असतील. तरीसुद्धा त्यांना 'रसिकांची उणीव' भासली. रसिकांच्या विषयी मला काही सांगता येणार नाही परंतु माझे हे उदंड साहित्य प्रसिद्ध करण्यासाठी 'मासिकांची उणीव' मला कधीच भासली नाही. मासिकांना लागणारा कागद माझ्या हातात असल्यामुळे संपादक माझ्या मुठीत होते. कागदाचा मलिदा दिल्यावर माझ्याच कागदातील दोन चार पाने 'माझ्यासाठी राखून ठेवणे' त्यांना कधीच जड वाटले नाही.

दिवाळीत केलेल्या सीमोल्लंघनानंतर मी आणखी एक काम हाती घेतले. ते म्हणजे स्तंभलेखनाचे. एका नांवालेल्या दैनिकाच्या साप्ताहिकातून दर आठवड्याला मी लोकांच्या समोर येऊ लागलो. परंतु काही कुचेष्टाखोर साहित्यिकांनी माझा स्तंभ म्हणजे 'वधस्तंभ'च आहे अशी हेटाळणी केली.

फुटकळ लेख लिहिणारा लेखक किरकोळ साहित्यिक मानला जातो हे जेव्हा मला समजले तेव्हा मी भरीव साहित्य निर्माण करण्याचा निर्धार केला. नाटक हा असा लेखन-प्रकार आहे की तो लेखकाला एकाच मापात कीर्ती आणि संपत्ती देऊ शकतो असे एका 'नेहमीच्या यशस्वी' नाटककाराने मला सांगितले होते. म्हणून नाट्यलेखनाला सुरवात करून मी हा निर्धार अंमलात आणला. एका रात्रीत मी माझे पहिले नाटक 'ठणकावले'. एका रात्रीत लिहिलेले हे नाटक अनेक रात्री चालेल अशी माझी रास्त अपेक्षा होती. हे नाटक मी महत्प्रयासाने रंगभूमीवर आणले आणि कसलेही प्रयास न पडता ते पडले. नाटक पडले पण मी मात्र पडलो नाही. उलट पहिल्या नाटकाच्या अपयशाने मी पेटलो. आणि त्याच झटक्यात मी एकदम सात-आठ नाटके 'ठोकली.' व्यावसायिक रंगभूमीवर नसली तरी कामगार रंगभूमीवर ती चांगली चालली. गिरणगांवातील गणेशोत्सव मी दणाणून सोडला. नाटकाचे प्रयोग होवोत अगर न होवोत नाटकं लिहिण्याचं सत्र मी सोडलं नाही. एका वर्षात २६ नाटके माझ्या नावावर जमा झाली. जमेच्या बाजूबरोबर खर्चाचीही बाजू सांगितल्याशिवाय हा ताळेबंद पुरा होणार नाही. पहिले नाटक बसविण्यासाठी सुरवातीला भांडवल म्हणून मी पाच हजार रुपये घातले; परंतु माझे पाच हजार आणि माझ्या मित्राचे पाच





अनुक्रमणिका

हजार घेऊन हे नाटक पडले आणि आम्ही साफ बुडालो. मग कुठे या नाटकाला हजार, त्या नाटकाला दीड हजार करीत करीत मी आणखी दहा पंधरा हजार रुपये घालवून बसलो. ही रक्कम मला फारशी जड वाटली नाही. कारण माझ्या दृष्टीने जमेचे पारडे अधिक जड होते.

माझ्या नाट्यलेखनाच्या तंत्राविषयी जाता जाता चार शब्द सांगतो. ज्या नाटककाराने मला नाट्यलेखनाला प्रवृत्त केले त्याने असा मंत्र दिला होता की "नाटक नावावर चालते." त्याच्या स्वतःच्या सर्व नाटकांची नावे नऊ अक्षरी ठेवण्याचा त्याचा कटाक्ष होता. मीही तो नऊ अक्षरांचा जप जपला. नाटकासाठी प्रथम एखादे आकर्षक नाव कायम करायचे आणि मगच नाटक लिहायला बसायचे हे मी ठरवून टाकले. नाटकांची नावे निवडताना प्रसिद्ध कवितांच्या ओळी किंवा लोकप्रिय लावण्यांची तोंडे या कामी मला फार उपयोगी पडली. परंतु आकर्षक मुखवटे घालूनही नाटके फारशी चालली नाहीत. नाटके नावावर चालतात, पण कुणाच्या ? लेखकाच्या, नाट्यसंस्थेच्या की नटांच्या ? हेच मी माझ्या गुरुला विचारायला विसरलो होतो.

माझ्या नाटकांच्या प्रस्तावना तुम्ही वाचल्यात तर अमक्या नाट्य संस्थेने तगादा लावला म्हणून हे नाटक लिहून झाले, तमक्या नाट्य संस्थेने तातडीची मागणी केली म्हणून दोन दिवसात हे नाटक लिहून दिले असे मी लिहिल्याचे आपल्याला आढळून येईल. थोडक्यात माझी सारी नाटके लिहून झाली ती कुणीतरी मागे लकडा लावला म्हणून. या लकड्यात मग मी माझ्या बायकोला आणि नातेवाईकांनाही वेठीला धरले. 'खास लोकाग्रहास्तव' नाटकाचे प्रयोग लावले जातात. परंतु आग्रहास्तव नाटके लिहिलीही जातात हे माझ्या उदाहरणाने सिद्ध व्हावे.

परंतु सत्य असे आहे की नाट्य संस्थांच्या मागे ससेमिरा लावला तो मी. नाटके लिहिण्यात मी जितका वेळ खर्च केला (त्यासाठी फार वेळ खर्च करावा लागतच नाही मुळी) त्यापेक्षा अधिक वेळ नाट्य संस्थांच्या संचालकांचे उंबरठे झिजविण्यात मी घालविला. लेखणी झिजविल्यावर उंबरठे झिजविले तरच हाताला यश येते असा माझा अनुभव. देणेकऱ्याप्रमाणे संचालकांना सतावले, भंडावून सोडले म्हणजेच ते दाद देतात. म्हणूनच 'नाटक करतो पण तमाशा आवर' असे म्हणून अनेक नाट्य संस्थांच्या संचालकांनी माझी नाटके 'सहर्ष' सादर केली. महाराष्ट्रात अशी एक नाट्य संस्था नसेल की जिच्याकडे माझ्या नाटकाचे बाड मी धाडले नाही. बाड गेले रे गेले की त्याच्यामागून माझा लकडा सुरू झालाच. मोबदल्याची मला कधीच अपेक्षा नव्हती. त्यामुळे या मुद्द्यावर नाटक नाकारणे कुणाला शक्य नव्हते. कुणी भांडवल नाही असा बहाणा केला. त्यांना कमी पडत असलेली रक्कम देण्यास माझे चेकबुक सदैव तयार. कुणी नाट्यगृहे रिकामी नाहीत अशी सबब सांगितली की त्यांना हव्या त्या नाट्यगृहाच्या हव्या त्या तारखा माझ्या हातात. अशा रीतीने त्यांच्या साऱ्या पळवाटा मी रोखून धरल्या. त्यांची पुरेपूर कोंडी केली.

(पृष्ठ १५६ वर पहा)

[पान ७४ वरून–स्वप्नांच्या सावल्या]
संशय आला. खात्री करून घेण्यासाठी त्यांनी विचारलं,

"कुठल्या ?"

"रामाच्या–"

"छे– !"

मनात नसताही ते एकदम हसले. आणि आरामखुर्चीत लवंडले.

आतल्या खोलीत जाता जाता नंदा म्हणाला,

"लिफ्ट चालू नसते तेव्हा बाहेर न जाणं बरं !"

नंदा आपल्या प्रकृतीची काळजी घेतोय याचं त्यांना समाधान वाटलं. आपल्या खाण्यापिण्याची आबाळ होते आहे, बारीकसारीक कामं करावी लागतात हे त्याला याच वेळी सांगावं असं त्यांना वाटलं. जीभ तोंडात चाचपडलीही; पण शब्द आला नाही. तो फटकन् काय उत्तर देईल याची त्यांना खात्री नव्हती.

## [ ८ ]

लिफ्ट चालू होती. तेवढ्यानंच बाबूरावांना एकदम हुशारी वाटली.

ते जरा लवकर बाहेर पडले. आधी माईला भेटावं आणि मग पिकेट रोडला जावं असा विचार करून ते खाली आले. डावीकडे वळले. घरालगत कंपौंडची भिंत होती. त्या भिंतीच्या बाजूनं चिंचोळा बोळ होता. त्या बोळातनं ते चालत राहिले. शेवटल्या टोकाला छोटं बैठं घर होतं. तिथं ते थांबले. बाहेर ओटा होता. ओट्यावर कडेला दोन लाकडी खांबल्या होत्या. मध्यभागी झोपाळा होता. उजवीकडे एक खोली. ती उघडीच होती. डावीकडे स्वैपाकघर. तेही उघडंच होतं. समोरून चूल दिसत होती.

"साखरदांडे इथं राहातात ?" असं त्यांनी मोठ्यानं विचारलं.

पण कुणी उत्तर दिलं नाही.

एक पायरी चढून ते ओट्यावर आले.

तेवढ्यात स्वैपाकघराच्या दारात जमिनीवर पडलेली काठी हालली. ते दचकत पुढं गेले. दाराच्या चौकटीत उभे राहिले. डाव्या अंगाच्या भिंतीला टेकून माई स्वस्थ बसली होती. शेजारच्या काठीवर तिचा हात होता., अंगानं रेट सुटली होती, पण सगळं शरीर पांढुरकं दिसत होतं. विचारीची तजेलदार कांती नष्ट झाली होती. डोळ्यावर चष्मा होता. चष्म्यात मॅग्निफाईंग ग्लाससारख्या दिसणाऱ्या काचा होत्या. त्या जाड काचांमुळे जड झालेला चष्मा नाकावरून सुटणार की काय असं वाटत होतं.

तिनं मान वर करून पाहिलं. कपाळाच्या शुभ्र पाटीवर हाताचा आडोसा धरला. तिला ओळख पटली नसावी. दात नसल्यामुळे काळोख्या बिळासारखं दिसणारं तोंड खाली-वर हाललं.

"माई, मी बाबू–"

तिनं हाताचं सूप कानावर धरलं.

"मी बाबू. . .ओळखलं नाही ?" बाबूराव मोठ्यानं ओरडले.

"बाबू. . बाबू. . .केवढा झालास. असं म्हणत ती तोंड पसरून हसली. पुढ्यातली काठी बाजूला करून तिनं भिंतीकडला पाट समोर ठेवला. त्यावर हात आपटीत म्हणाली,

"बस. . .बस रे बाबू–"

बाबूराव खाली बसले.

"दुर्गी बोलली होती–तू भेटला होतास म्हणून !"

"दुर्गी कुठं गेली ?"

"नागपूरला. . .नागपूरला होतास ना रे ?"

"होय !" बाबूराव मोठ्यानं ओरडले.

"ऐकू येत नाही रे बाबा ! तुला मोठ्यानं ओरडायला पाहिजे. . ."

बाबूरावांनी घसा खाकरला आणि जरा जवळ सरकत मोठ्यानं ओरडले.

"ऐकू कमी येतंय ?"

"होय रे ! कान गेले ! खूप ऐकलं. ऐकू नये ते सुद्धा. . . ! आता कान गेले."

"दुर्गी कुठं गेली ?"

"कोण ?"

"दुर्गी

"दुर्गी ? येईल आता. बेकरीत गेलीय पाव आणायला ! मी रात्री पाव खाते दुधात बुडवून ! चावायला जमत नाही !"

"दात नाही लावून घ्यायचे ?"

"दात ? कशाला दात ? आता काय खायचं. . .आणि किती जगायचं ?"

"जगायला पाहिजे खूप. "

"खूप ! पोरीसाठी जगत्येय ! तिला कोण बघणारं ? काय काय बघायचं कर्मात आहे. असं म्हणत तिनं मान मागं भिंतीला टकवली.

पुढं काय बोलावं ते बाबूरावांना कळलं नाही. जाड भिंगातून माईचे डोळे बाहेर आल्यासारखे दिसत होते. काही तरी बोलायचं म्हणून त्यांनी विचारलं,

"तब्येत बरी आहे ?"

पण तिला काही ऐकू आलं नाही.

"हल्ली दुर्गी तब्येतीनं–"

"काय म्हणालास रे ?" तिनं कानामागं हात धरला.

"हल्ली दुर्गी तब्येतीनं एकदम हटली–"

"दुर्गी ना ?" असं विचारीत तिनं कपाळाला हात लावला आणि म्हणाली, "तिची अन्नावरून वासनाच उडून गेलीय रे. ."

"जेवत नाही ?"

"सकाळचा सुपारीएवढा भात. रात्री पावाच्या दोन कापट्या. चहात बुडवून खाते. रात्रभर झोपत नाही. . पहाटेला तासभर डोळा लागतो. !"

"मंगू कधी येतो की नाही ?"

"तो पार्ल्याला ! महिना-दोन महिन्यातनं तो एकटा येतो आणि माई जिवंत आहे एवढं बघून जातो. माईला रे कसली धाड धरल्येय ?"



"काळी चार"

"त्याची बायको नाही येत ?"

"ती नाही येत. . .वाडी विकून पैसा हाती आलाय. .कशाला येईल ?

"कां ?"

"आता कां ! कसं सांगायचं ? म्हणते, दुर्गी वाईट चालीची. . . !"

"वा: !"

"तूच बघ ! आपलं मंगळसूत्र धड नसलं की कुणीही काहीही बोलावं ? बोलणाराचं तोंड कोण धरणार ? मी देवावरचं फूल उचलून सांगेन. .दुर्गी तसल्या चालीची नाही. आता तिचा सासराच तसला निघाला ती तरी काय करणार ? त्या हलकटांच्या गोठ्यात सापडली रे ती ! ह्यांना एवढी कायद्याची माहिती. पण तिला तिथनं सोडवण्यात वर्षं गेली !"

माईच्या डोळ्यांवरची जाडी भिंगं न्याहाळीत बाबूराव बसून राहिले. त्यांना उत्सुकता होती. इथं थोडं खोलात शिरायचं होतं. पण माईला विचारायचं कसं याचा विचार करीत असतानाच दुर्गी पाव घेऊन आली.

"बाबू, तू रे कधी आलास ?" असं ती एकदम किंचाळली.

"झाला अर्धा पाऊण तास–"

"मला कित्ती बरं वाटलं. !"

"कां ?"

"मला वाटत होतं, तू येणार नाहीस. !"

"कां पण ?"

"कां ! अरे आम्ही वाळीत पडलेली माणसं ! वाईट चालीची. !"

"असं कोण म्हणतो ?"

"कोण ! उद्या तू सुद्धा म्हणशील !"

"मी नाही म्हणणार ! बस ना. !"

"तू तिथं कुठं चुलीपाशी बसलाहेस ?"

"बसलोय माईपाशी–"

"तुला पाणी देऊ ?"

"कां ?"

"माईच्या कानात ओरडून ओरडून घसा फुटला असेल तुझा–" ती आनंदानं हसली.

"नाही ग–!"

"ईथं बस ना झोपाळ्यावर–!"

बाबूराव पाटावरनं कसेबसे उठले. अर्धा-पाऊणतास माईपाशी बसले तर त्यांचे गुडघे आखडल्यासारखे झाले.

झोपाळ्यावर बसले. पळभर वाटलं, झोका घ्यावा. पण घेतला नाही. दुर्गीला शेजारी बसायचं. .पण तेवढ्यात ती समोर जमिनीवरच बसली. भिंतीला टेकून. एवढासा आंबाडा मानेवर सुटला होता. तिनं मागल्या मागं सुपारीएवढी गांठ मारली.

काय बोलावं या विचारात दोघंही असताना आतून माई म्हणाली,

"दुर्गे, थोडे पोहे टाकत्ये ग. की दोन थालिपीठं लावू. .विचार ग बाबूला.

"काय खाशील रे?"

"काही नको. !"

"चालायचं नाही. पंचवीस तीस वर्षांनी येताहेस. . .काही मनाला वाटायला पाहिजे. "

"मला काही खायचं नाही ग."

"कां?"

"माझी तब्येत कुठं बरी आहे?"

"काय?"

"मरता मरता वाचलोय. .दोनदा हार्ट अॅटॅक येऊन गेला. . . !"

ते ऐकता ऐकता दुर्गीचा चेहरा गायब झाला. बघता बघता डोळे लोंबकळत राहिले. आपल्या प्रकृतीबद्दल तिला एवढी चिंता वाटली हे बघून बाबूरावांना बरं वाटलं. ते तिच्या तोंडाकडे बघत राहिले.

"काळजी घे रे तब्येतीची!"

"घेतलंय–" असं म्हणून त्यांनी एक सुस्कारा सोडला आणि हळूच झोका घेतला.

"पण आज प्रथम आलाहेस. . .थोडंसं तरी खा. . ."

"नको ग–"

"असं नाही! थोऽऽडं! नाही तर माईला वाईट वाटेल. . . पोहे खा. . . थालिपीठ चाववणार नाही." त्यांनी हो म्हणायच्या आधीच ती उठली आणि माईच्या कानात ओरडत म्हणाली,

"थोडे पोहे कर–"

"थोडे कां? आवडायचे ग त्याला.

"दोन हार्ट अॅटॅक येऊन गेले. मरता मरता वाचला आपला बाबू!"

"अरे देवा. .आम्हांला कळलंच नाही. . कधी ते?"

पण दुर्गी तिथं थांबली नाही. ती पुनः समोर येऊन बसली. आत माई खुड्खुड करीत होती.

"खूप जपायला पाहिजे रे!"

"होय!"

"मग जिने का चढतोस?"

"लिफ्ट आहे–"

"ते एक बरं!"

"येताना बायकोला कां नाही आणलंस? खूप वर्षं झाली तिला बघून!"

"ती गेली ग–"

"कधी?" तिचा जीव बाहेर आला.

"झाली तेरा वर्षं!"

ती पटकन उठली. आत गेली. माईच्या कानात काही तरी पुटपुटली.

"अग जरा मोठ्यानं तरी बोल–"

"फुटले तुझे कान–" दुर्गी एकदम चडफडली.

"काय झालं?"

"बाबूची बायको गेली–"

"कधी?" माईचा आवाज सुद्धा व्याकुळ झाला.

"बारा तेरा वर्षं झाली."

"कशानं. . . .काय झालं?" असं विचारीत माई बाहेर आली. काठी टेकत जड अंग ढकलत पुढं आली. झोपाळ्याच्या दांडीला धरून उभी राहिली. बाबूरावांच्या डोक्या-तोंडावरनं हात फिरवीत तिनं आपलं तोंड पिळलं आणि काकुळतीनं म्हणाली,

"कर्म हात धुऊन उठलं म्हणजे काय काय भोगावं लागतं. . .तुझी ही गत. . . तिची ही गत. . .काही बरं म्हणून कानावर येत नाही. !"

पदरानं नाक पुसत ती तशीच उभी राहिली.

दुर्गी भिंतीला डोकं टेकून आढ्याकडे बघत होती.

जिभेनं दाताची कवळी हालवीत बाबूराव स्वस्थ बसले होते. भोवती जाळ पेटल्यासारखा उष्मा झाला. सगळं अंग तापलं. घाम आला. गळ्यात कढ आले. इतक्या वर्षात इतकी आस्था, जवळिक कुणी दाखवली नव्हती.

"तू जा ग आत .काकडा विझला. .!" दुर्गी मोठ्यानं ओरडली तशी माई आत गेली.

"मंगूच्या मुलाच्या मुंजीत पाहिली तिला. .तेवढीच. .एकदाच. !"

"हूं. . . !"

"छान दिसायची. !"

ते काही बोलले नाहीत. तीही बराच वेळ गप्प राहिली.

मग ती उठली आणि पोह्यांची बशी घेऊन आली. समोर चहाचा कप ठेवला.

"तू घे ना–"

"तू खा! मला नको!"

"कां?"

"तू खाल्लंस की पोचलं मला!"

माई बाहेर आली आणि फतकल मारून बसली. तिला काही ऐकू येत नव्हतं. फक्त ती विट विट नजरेनं एकदा त्यांच्याकडे, एकदा तिच्याकडे बघत होती.

"छान तब्येतीनं होती रे . . ."

"कोण?"

"तुझी बायको–"

"तर. . ."

"पण एवढं झालं काय? दिवस गेले होते?" एकदम तिचे ओठ सफेत झाले.

"नाही ग! किरकोळ आजाराचं निमित्त झालं. . . !"

"नशीब आपलं. . . !"

"कुणी म्हणतात. माझ्या पत्रिकेतल्या मंगळामुळे!"

"ते खोटं!"

"कसं?"

"पत्रिकेत काही अर्थ नाही.! उगाच भटांना पैसे द्यायचे. . . !"

"असं?"








"तर काय ! माझ्या पत्रिकेत चांगल्या नवऱ्याचा आणि चार मुलांचा योग होता. काय झालं शेवटी ?"

"पप्पांनी बघितली नसेल–"

"दोन दोनदा बघितली होती. अठ्ठावीस गुण जुळले होते. . धिंडवडे तेवढे निघाले."

"मीही त्यावेळी पत्रिका पाहिली नव्हती. ."

"कां ?"

"काय सांगणार ? . . मी मनःस्थितीत होतो कुठं ? त्यावेळी आपलं करायचं म्हणून केलं लग्न. . एकेकाचा आग्रह !"

"म्हटलं ना ? आपली नशिबं खोटी !"

"एका अर्थी . . . झालं तेही . . माझ्या मंगळानं तुला मरण–"

"तसं मरण आलं असतं तर सुटले असते. अशी बवारशी जगण्यापेक्षा तुझी बायको म्हणून सवाष्ण मेले असते, तर सोनं झालं असतं !" असं म्हणत तिनं माईकडे पाहिलं. पण माईच्या कानांवर काही पडतच नव्हतं.

बाबूराव गप्पच राहिले.

तिनं पुनः माईकडे पाहिलं. तिला ऐकू येईल अशी तिला भीती वाटली असावी. म्हणून हळूच खालच्या आवाजात म्हणाली,

"खरं ना ? आपली आवडती बायको म्हणून तू कधी तरी आठवण काढली असतीस, आणि डोळे पुसले असतेस ! खरं ना ?"

होय, एवढा एक शब्द सुद्धा त्यांना उच्चारता आला नाही. तोंडातल्या कवळ्या घट्ट आवळून ते तसेच बसून राहिले. दुर्गीचं लक्ष नाही असं बघून त्यांनी चष्म्याच्या खालून डोळ्यांवर बोट ओढलं.

दुर्गी थोडा वेळ गप्प राहिली.

मग मध्येच बाबूराव म्हणाले,

"जाऊ या का ?"

"कुठं ?"

"पिक्चर रोडला–"

"काही नको !" ती थोड्या सत्तेनं म्हणाली, "तुझी तब्येत बरी नाही ! कशाला भटकायचं ते ? पायपीट करून दमायचं ? बस स्वस्थसा !"

बसून काय बोलायचं ते बाबूरावांना कळेना. काही तरी बोलायचं म्हणून म्हणाले,

"मंगूची बायको कुणाकडची ?"

"कसबेकर ! वाईट्ट बाई. . तिच्या माहेरची सगळी माणसं. . एका माळेचे मणी !"

"कां ?"

"काय काय उठवलं माझ्याबद्दल त्यांनी–" एकदम तिचा चेहरा पंडुरोग झाल्यासारखा पिवळा पडला. ओठ चरचरीत सुकले.

"काय केलं ?"

"सर्वांना सांगत सुटली ती माणसं— दुर्गीनं सासऱ्याला आपल्या नादी लावलंय. सासरा बरा होता, पण दुर्गीच तसली वाईट चालीची. . . तिचे चाळे बघून नवरा बाहेरख्याली झाला. . काय काय उठवलं !—म्हणजे मी कोंडवाड्यात. माझी विटंबना चाललीय. . आणि ही माणसं वर पुनः मलाच डागण्या देतात. नतद्रष्ट माणसं. . कधी नाही बरं व्हायचं मेल्यांचं . . . आता बरी रडतेय....मुलाच्या पाठीवर बऱ्या चार मुली झाल्यायत ! . . . एकीला तरी आप्पा रांगणेकरासारखा सासरा मिळायला हवा. !"

"हा आप्पा करायचा तरी काय ?" चटकन् त्यांनी प्रश्न विचारला आणि जीभ चावली. हा प्रश्न आपण विचारायला नको होता याची त्यांना जाणीव झाली.

विचारू नकोस . . . विचारू नकोस असं सांगण्यासाठी तिनं हाताचे पंजे हवेत हालवले. आणि वेडाचा झटका आल्यासारखे चटकन डोळे फिरवले. हिला आता झीट येते की काय असं वाटून बाबूराव एकदम चमकले. घाबरेघुबरे झाले.

"असू दे ! तू त्या आठवणीनं त्रास करून घेऊ नकोस–" असं ते पुनः पुनः समजावू लागले.

बराच वेळ प्राण कंठाशी यावेत तशी ती डोळे फिरवीत राहिली. मग दमेकरणीसारखी चिंचोळ्या जिवणीतून वाफ टाकू लागली. तिला नीट श्वाससुद्धा घेता येत नव्हता.

अपराधी चेहरा करून ते बसून राहिले. माई दगड बसवल्यासारखी बसली होती. एकेकाळी सुखात वाढलेली ही बाई आता जाडया भिंगातून काय पाहात होती कोण जाणे !

थोडा अंधार झाला. ते जायला उठले.

"माई येतो मी !" असं ते म्हणाले. त्यांना मोठ्यानं ओरडून सांगायचं होतं, पण शक्ती विरली होती.

ते उठून उभे राहिले.

"चालला ग बाबू ?" माईनं विचारलं.

दुर्गी मानेनं होय म्हणाली.

माई उठण्यासाठी धडपडली. पण बाबूरावांनी तिला हातानंच बसायला सांगितलं. बसल्या बसल्या ती म्हणाली,

"ये रे पुनः बाबू ! एकदा दुपारचा जेवायला ये. . कोलंबीचं मसाल्याचं आवडायचं बाबूला !"

"येतो ग दुर्गी–" असं म्हणून बाबूराव पायरी उतरले.

"येते मी तुला पोचवायला–" दुर्गी म्हणाली.

"नको. . नको. . बस तू !"

"येते रस्त्यापर्यन्त."

"नको–नको येऊ तू–"

"कां ?"

"कुणी बघायला नको ! उगाच संशय. !"

ती तिथंच थांबली. आणि म्हणाली,

"जपून जा–"

"हो !"

"आणि हे बघ–"

"काय ?" ते थांबले. त्यांनी वळून पाहिलं.

"हळू हळू जिने चढ. . त्रास करून घेऊ नकोस. . तुला बघणारं मायेचं कुणी नाही. !" त्यांच्या गळ्याच्या सगळ्या शिरा एकदम थरारल्या. नाक आतून पाझरलं. थंडीनं आखडल्यासारखे ते चालू लागले.

* *



अनुक्रमणिका

[ ९ ]

मध्ये दोन दिवस गेले. पण बराच काळ लोटला असावा असं बाबूरावांना वाटलं.

हेमाच्या वडिलांकडून जेवणाचं आमंत्रण आलं. बाबूरावांनी टाळण्यासाठी प्रयत्न करून पाहिला. पण जमलं नाही. तरी पिकेट रोडला जाऊन यावं आणि मग हेमाकडे जावं असा त्यांचा विचार होता. पण मुलगा मोठा झाला की तो आपोआपच बापाला परस्वाधीन करतो याची त्यांना जाणीव झाली. संध्याकाळी पाच वाजता त्यांनी कपडे चढवले, आणि अर्ध्या तासात देवाला जाऊन येतो असं म्हणणार तोच वेल वाजली. त्यांनी दार उघडलं.

दारात हेमा उभी! नंदा तयारीत होताच!

"अजून थोडा वेळ आहे ना जायला ?" बाबूरावांनी विचारलं

"कां ?"

"जरा देवाला जाऊन आलो असतो."

"कुठल्या ?"

बाबूरावांना एकदम संताप आला. याला काय करायच्यात फालतू चौकशी ? ते काही बोललेच नाहीत.

"रामाला ?....की मारुतीला ?"

टक्कन त्यांची मान उडाली. संशयी नजरेनं त्यांनी नंदाकडे पाहिलं. तो म्हणाला.

"उद्या शनिवार....उद्या मारुतीला जाता येईल !"

त्यावर हेमा म्हणाली.

"जाता जाता रामाच्या देवळात जाऊ ना.....तिथंच टॅक्सीं घेऊ...."

पण बाबूराव काही बोलले नाहीत., हेमाला संशय आला, त्यांना राग आला असावा. म्हणून ती म्हणाली.

"असं करू आपण...जाऊ या आता पिकेट रोडला...तिथनं पुढं आमच्या घरी जाऊ !"

ते एकदम झोपेतून दचकून उठावे तसे जागे झाले. आणि म्हणाले,

"छे ग ! मी आपलं सहज म्हणालो. एवढं काही देवाला गेलंच पाहिजे असं नाही."

सर्वजण खाली उतरले. टॅक्सीत बसले आणि हेमाच्या घरी गेले.

त्यांना सबंध दिवस फुकट गेल्यासारखा वाटला.

दुसरा दिवस शनिवार. मारुतीचा हक्काचा दिवस. भीती होती, नंदा म्हणेल आपण येतो. हेमाही आली होती. ती म्हणायची, चला पिकेट रोडला. पण नशीब ! कुणी काही बोललं नाही.

बाबूराव लिफ्टनं खाली आले. तर मोरोबा लिफ्टचीच वाट बघत तळमजल्यावर उभा होता.

तो म्हणाला,

"बरा भेटलास ! चुकामूक झाली असती !"

"कां ?"

"मी तुझ्याकडेच येत होतो !"

"अस्सं ?"

"हं !"

"मग बस जा वर ! मी येतो अर्ध्या तासात–"

"वर काय आहे ? तुला भेटायला आलोय—कुठं चाललास?"

"असाच—"

"तरी पण?"

"जरा पाय मोकळे करायला.....!"

"चल ! सोबत करतो—"

"सोबत लागत नाही मला....!"

"अरे पण! पिकेट रोडला चाललाहेस की काय ?"

"कां ?"

"मला टाळतोहेस म्हणून म्हणतो !"

"पिकेट रोडला काय आहे ?"

"मारुती !" मोरोबा चमत्कारिक हसला आणि त्यानं खिशातनं तपकिरीची डबी काढली.

"एवढ्या लांब कोण जातो ?"

"चल तर इथं...रामाच्या देवळात जाऊ !"

"चल—!"

दोघेही रामाच्या देवळात जाऊन बसले. आता जाईल, मग जाईल म्हणता म्हणता तो गोंद लावून चिकटवल्यासारखा बनून राहिला. तरी मोरोबाची बडबड संपली नाही. आपण किती धंदे

गेले तरी आपल्या हाताला यश कसं येत नाही हे तो घोळवून घोळवून सांगत होता. पण त्यांचं लक्ष नव्हतं. त्यांच्या डोक्यात रेघ सुद्धा उमटली नाही. कंटाळून ते घरी जायला उठले. तरी मोरोबा हात सोडीना.

घराच्या जवळ येताच त्यानं मध्येच एकदम दचकून त्यांना थांबवलं आणि उलटया दिशेला वळून तो म्हणाला,

"या इथं पूर्वी कुठलं दुकान होतं ?"

बाबूराव तिथं पाहात आठवू लागले.

"लाँड्रीच होती ना ?"

"आता लाँड्रीच आहे की–" मोरोबा हसत म्हणाला.

"पूर्वी सुद्धा लाँड्रीच होती असं वाटतं !"

"बरोबर !"

"एवढी परीक्षा घेण्याचं कारण ?"

"समोरनं दुर्गी येत होती...चार पावल आपण पुढं गेलो असतो तर टक्कर झाली असती !"

"कुठं ? आहे कुठं ?"

"ती वळली आपल्या बोळात !"

"जरा आधी तरी सांगायचंस–"

"कां ?"

"पाहिली असती !"

"आज जरा रंगात दिसली !"

"कशी ?"

"रोज सफेत सुडकं नेसायची. आज गुलाबी लुगडं..."

बाबूराव गंभीरपणे पावलं टाकीत राहिले.

"आज सकाळी दिसली होती—" मोरोबा म्हणाला.

"कुठं ?"

"गिरगांवात ! अनिल स्टोअर्समध्ये !

"काय घेत होती ?"

"साली गंगावनं बघत होती. आता या म्हातारीला गंगावनं कशाला ?"

"त्यानं झपाट्यानं नाकात तपकीर कोंबली. आणि हातरुमाल नाकावरनं फिरवला.

"तिला म्हातारी म्हणतोस. तू काय मोठा तरणा आहेस ?"

"पण तू कां एवढा तडकतोस ?"

"एक गोष्ट, मोरोबा, लक्षात ठेव—"

"सांग–कुठली ?"

"एक वेळ तू तिच्यासाठी ज्याम रडला होतास !"

"अजूनही रडतो ! पण तिला कळत नाही !"

"काय कळत नाही ?"

"माईचे आता फार दिवस उरले नाहीत. तिच्या पश्चात् हिला कोण बघणार ?"

"तो तिचा प्रश्न !"

"अजून तिनं माझ्याशी लग्न केलं तर माझा तिला आधार... तिचा मला...." मोरोबाचा आवाज एकदम कातरल्यासारखा झाला.

पूर्वीसारखाच तो आताही रडेल अशी त्यांना भीती वाटली.

ते घराकडे वळले. त्यांना वाटलं, मोरोबाही मागून येईल. पण तो एकदम मागं वळला आणि काही न बोलता चालत राहिला.

तोही दिवस फुकट गेला. दोन दिवस गेले. दुर्गीला भेटता आलं नाही.

आज रविवार !

एक एक क्षण मोजत ते खोलीतल्या खोलीत फिरले. अस्वस्थ होऊन बसले. बाल्कनीत उभे राहिले.

मध्येच त्यांना हसू येत होतं. ऑपेरा हाऊसला आठ नंबरची ट्राम पकडत होतो तेव्हा सुद्धा आपण एवढे अस्वस्थ नव्हतो असं त्यांना वाटलं.

सकाळचे अकरा वाजले होते.

आणि बेल न वाजता दाराची कडी वाजली.

त्यांनी दार उघडलं.

दारात दुर्गी !

त्यांना चक्कर आली. कारण आतल्या खोलीत नंदा होता.

"तू कशाला आलीस इथं ?" त्यांनी आवाज दडपीत विचारलं.

"अरे दोन दिवस दिसला नाहीस.....म्हटलं तब्येतीला..."

"तू आधी खाली उतर. . . उतर. "

"कां–कां ?"

"आत नंदा आहे....उतर, तू. . ."

"तिला त्यांनी मागं लोटलं आणि एकदम दार लावून घेतलं.

"कोण?"

"त्यांनी एकदम वळून पाहिलं. मागं नंदा उभा होता. ते एकदम विरघळून गेले.

"कोण?" त्यानं पुनः विचारलं.

"तो...मोरोबा—"

"गेला ?"

"घालवला !"

"मला वाटलं डबेवाला आला की काय जेवण घेऊन!" असं म्हणत तो आत गेला.

नंदाला काही कळलं नाही एवढ्या एका विचारानं त्यांना हुशारी वाटली. ते बाल्कनीत जाऊन उभे राहिले.

खालन दुर्गी चालली होती. त्यांना वाटलं ती वर बघेल. पण तिनं वर पाहिलं नाही.

अख्खी दुपार त्यांनी अक्षरशः तळमळून घालवली.

त्यांना पुनः पुनः वाटत होतं, आपण तिला असं घालवून द्यायला नको होतं. बसली असती दोन घटका बोलत तर काय झालं असतं ? नंदा काय म्हणाला असता ? आणि काहीही म्हणाला





अनुक्रमणिका

असता तरी त्याच्या म्हणण्याला विचारतो कोण?....संध्याकाळी देवळात गेली म्हणजे कदाचित ती बोलणार नाही. चिडेल! चिडणं स्वाभाविक होतं. दोन दिवस दिसलो नाही म्हणून ती धावत आली. जिने चढून आली असणार..धापा टाकत होती.. आणि आपण तिला हाकलून लावली...अपमान केला. तिला राग येणं स्वाभाविक होतं.

उन्हं जराशी कलंडली मात्र—शाळेतनं सुटल्यासारखे त बाहेर पडले. खाली आल्यावर त्यांनी वर पाहिलं. नंदा बाल्कनीत उभा होता. रामाच्या देवळात जातो आहे असं भासवण्यासाठी ते डावीकडे वळले. चार पावलं पुढं जाऊन टॅक्सीत बसले आणि थेट पिकेट रोडला उतरले.

पण देवळात दुर्गी नव्हती.

ते एकदम बाहेर पडले. नाना विचार त्यांच्या मनात आले. कोपऱ्यावर येऊन त टॅक्सीसाठी उभे राहिले. तिच्या घरी जाऊन क्षमा मागावी. पुन: कधी असा अपमान करणार नाही असं तिला सांगावं असा त्यांनी विचार केला.

टॅक्सी थांबवली आणि ते आत बसले. टॅक्सीचा दरवाजा ओढणार तोच——

"बाबू.

त्यांनी बाजूला पाहिलं. त्यांचा स्वत:च्या डोळ्यांवर विश्वास बसेना. दुर्गी हसत होती. ती रागावण्याऐवजी हसत होती. त्यांना आनंद झाला; पण त्याहीपेक्षा आनंद झाला तो तिच्याकडे बघून! ती एकदम बदलून गेली होती. जादूची कांडी फिरावी तशी. मोरपिशी रंगाची इंदूरी साडी. नऊ वारीच. काळेभोर केस. भरगच्च अंबाडा. त्यावर मोगऱ्याचा गजरा. तीस वर्षांपूर्वीची दुर्गी आपण पाहातोय की काय असा त्यांना संशय आला.

"ओळखलं नाही?" असं विचारीत ती हसली आणि आपण-हूनच टॅक्सीत बसली.

खूप वर्षांनी स्नो-पॉवडर-फुलं आणि नव्यानंच घडी मोड-लेली साडी यांचा संमिश्र वास त्यांच्या सगळ्या रंध्रात दरवळला. क्षणभर ते काही बोललेच नाहीत. हृदय एकदम गलबलून गेलं. तिच्या खांद्यावर डोकं टेकावं असं वाटलं.

ते स्तब्ध बघत राहिले.

ती अजून गालातल्या गालात हसत होती.

"कहाँ साब?"

टॅक्सीवाला जागा झाला तेव्हा त्यांना जाग आली.

"कुठं जायचं?.....देवळात ना?" त्यांनी विचारलं.

"कशाला देवळात? आहे काय देवळात?" ती हसली. आज ती हसतच होती.

"मग?"

"कुलाबा—"

टॅक्सी सुरू झाली.

# नटमोगरी

किती उफाड्याची नार आली नवानिला धार
केली कापाकापी फार जाता येता देते मार
अशी ही मारू नटमोगरी
हौस हिला भारी। करी बळजोरी
असुन ही नार गड्या जातीची।
नेसली साडी नारिंगी। चाल बहुरंगी
बोलणं ढंगी। किती लुंगीसुंगी
लागली देशोधडीला पार।
ही यार कुण्या मर्दाची। बहु स्वानिची
उंची बेताची। मोहवी बांधा हिचा अनिवार
तनु सुकुमार। तरी बेजार जाहला रसिक
कामकैफात, हिच्या नादात, किती लोकात
नाम बदनाम, घेऊन इनाम इष्काचे
थवे स्वजनांचे ऐऱ्यागैऱ्यांचे थांबला फजित
इथे कविराज। शब्दांचा साज।
उतरला माज आज कवितेचा।

—अशोक परांजपे

"कुलाब्याला कुठं?"

"सिनमाला जाऊ या?"

बाबूराव एकदम चमकले. त्यांना वाटलं आपण रीगलमध्ये जाऊ आणि तिथंच नमका नंदा हेमाला घेऊन यायचा. ते काही बोलले नाहीत.

"मला वाटलंच होतं...." ती म्हणाली.

"काय?"

"तू मला एकदम ओळखणार नाहीस!

"किती चटकन् बदललीस तू?"

ओठ मिटून ती गुपचूप हसली.

"पण छान झालं!"

"काय?"

"तू बदललीस ते...मी नाही तरी तुला सांगणारच होतो..

"काय?"

"तू राहात होतीस तशी राहू नकोस म्हणून..."

"कां?"

"बरं नव्हतं वाटत तुला तशी बघायला."

डाव्या खांद्यावर वळून ते तिला पुन: पुन: बघत राहिले. मान वर करून चष्म्याच्या खालच्या काचातून तिला न्याहाळू लागले.

जशी मन्मथ रति धाकटी,
सिंहसम कटि
उभी एकटी,
गळ्यामधें हार ;
अंगि तारुण्याचा बहर,
जवानिचा कहर,
मारिते लहर
मदन तलवार
पायीं पैंजण झुबकेदार,
कुणाचि दार,
कोण सरदार
हिचा भरतार
कुलाविधाजडावटिकली
मनामधि टिकली
नाही हटकली,
तेज अनिवार

– शाहीर रामजोशी



अनुक्रमणिका

ती खाली मान घालून हातातल्या बांगड्या सरकवीत स्वस्थ बसली. आनंदानं फुलून गेली.

रीगल सिनेमाकडे टॅक्सीनं वळसा घेताच ती थांबायला सांगणार होती...पण एकदम खाली वाकून तिनं आपलं तोंड लपवलं.

टॅक्सी पुढं गेली.

"कां? काय झालं?"

"रीगलच्या पायरीवर ती मेली माणसं....."

"कोण?"

"मंगूची सासू...सासरा...वाईट नजरेची माणसं..."

"कां?"

"पाहिलं असतं त्यांनी आम्हाला तर काय काय उठवत बसली असती. त्यांना कुणाचं बरं बघवत नाही."

गल्लीतनं टॅक्सी वळवून ते गेटवे ऑफ इंडियाकडे गेले. दगडी कट्ट्यावर बसले.

"बरं सांग...."

"काय?"

"कशी दिसले मी?"

"सुंदर!"

"खरंच?"

"खरंच सुंदर! सावित्री तरुण होती तेव्हा सुद्धा ती इतकी सुंदर दिसली नाही!"

"असं बोलू नये आपण—"

"कां?" बाबूराव एकदम चपापले.

"तीही सुंदर होती. एकदाच पाहिली होती तिला. मुंजीत! त्याहीपेक्षा ती तुझी बायको होती. असं काही तरी बोलून आपण आपल्या बायकोचा अनादर करू नये.....!"

ते थक्क होऊन गप्प बसले.



काही क्षण गेले. काय बोलावं ते त्यांना कळेना. शिवाय मनात भीती होती. कदाचित इथंही नंदा आणि हेमा येतील.

"आपण इथं बसलोय खरे...."

"नकोच! आपण उठू या—" ती म्हणाली.

"कां?"

"येणारी जाणारी माणसं आपल्याकडे वळून वळून बघताहेत..."

ते उठले. ती पुनः म्हणाली,

"वाईट असतात एकेकाच्या नजरा..."

तीही उठली.

"आपण टॅक्सीनंच परत जाऊ..."

"व्हिक्टोरिया करूया ना?" तिच्या आवाजात वेगळाच लाडिकपणा उमटला.

"कां?"

"हळू हळू जाऊ!"

ती दोघं व्हिक्टोरियात बसली. व्हिक्टोरियाचं खाली पाडलेलं छप्पर तिनं वर करायला लावलं. व्हिक्टोरिया ठाकुरद्वारकडे वळली.

"तुझी तब्येत बरी आहे ना?"

"कां?"

"मग दोन दिवस कां नाही आलास?"

"एकदा नंदाच्या सासऱ्याकडे गलो. गेलो म्हणजे काय जावं लागलं. काल देवळात यायला निघालो तर वाटेत मोरोबा आडवा आला."

"तो कावळा नको तिथं कडमडेल....!"

"मलाही चुकल्या चुकल्यासारखं वाटत होतं..."

"पण दोन दिवसात जरा वाळलास तू! काळजी घे....!"

"कसली काळजी घेणार? नंदाच्या सासऱ्याकडनं डबा येतो. थंडगार जेवण! वातड चपात्या चावता चावता तोंडाला वळ येतात. मला तेल-तूप खायचं नाही. ते खावं लागतं. माझी कामं मलाच करावी लागतात. कुठं मिळतेय विश्रांती?....नंदाचं लग्न होईल तेव्हा....!" असं म्हणत त्यांनी एक लांबसा सुस्कारा टाकला.

ती थोडा वेळ गप्प राहिली. आणि मग स्वतःशीच बोलली,

"रोजच्या रोज मी गरम गरम जेवण घेऊन आले असते. पण मी वर आलेली तुला....."

"तसं नव्हे ग!...पण घरी नंदा असतो...कधी कधी हेमा असते... दिसायला बरं दिसत नाही."

ती स्वस्थ बसली. त्यांना वाटलं ती रागावली.

"सकाळी तुला घालवली म्हणून राग आला ना?"

"रागवायचे दिवस गेले रे..."

"हवी तर क्षमा मागतो..."

"नको....नको....मी रागावले नाही रे!"

"खरंच?"







अनुक्रमणिका

"खरंच नाही!"

त्यांना बरं वाटलं!

ती स्वस्थ बसली.

एकदम त्यांच्या लक्षात आलं. ती त्यांना खेटून बसली होती.

तेवढ्यात तिनं व्हिक्टोरियावाल्याचं खमीस ओढलं. आणि म्हणाली,

"दौडना नही! जरा आस्ते चलाव...!'

ती संधी साधून ते हलकेच थोडे बाजूला सरकले.

थोड्या वेळानं म्हणाले,

"पण तू आज एवढी सजली आहेस ती..."

"सहजच...!

"तरी पण—"

ती काही बोलली नाही. गळाभर पदर घेऊन स्वस्थ बसली. गोड तंद्री लागल्यासारखी!

मध्येच त्यांनी गाडी थांबवली.

"कां? अजून घर थोडं पुढं आहे—" ती झोपेतनं जागी झाल्यासारखी बोलली.

"तू इथंच उतर—"

"कां?"

"घरासमोर दोघंही एकदम उतरलो तर ते बरं नव्हे."

ती एक शब्द सुद्धा बोलली नाही. ढकलून दिल्यासारखी खाली उतरली.

व्हिक्टोरिया पुढं गेली—आणि थांबली.

खाली उतरताच बाबूरावांनी वर पाहिलं. नंदा आणि हेमा बाल्कनीत उभी होती. बाबूरावांना एकदम जीव बचावल्यासारखं वाटलं. दुर्गीला आधी उतरवलं, हा शहाणपणा झाला. सुटकेच्या जाणीवेनं सुद्धा त्यांचं काळीज धडधडलं.

लिफ्टसाठी ते उभे राहिले.

दुर्गी दिसताच त्यांनी तिथनंच हातरूमाल हालवला.

पण तिचं लक्ष नव्हतं.

ती चालता चालता मान वर करून नंदाला आणि हेमाला बघत होती.

* *

## [ १० ]

नंदा जेवला. आणि ऑफिसात गेला.

तो बाहेर पडण्याचीच वाट बघत बाबूराव चुळबुळत होते. तो रस्त्याला लागलेला पाहाताच ते उठले. आरशासमोर उभे राहिले. गेल्या पंधरा दिवसात त्यांचा चेहरा बदलला होता. दुर्गीकडनं येणारं गरमागरम जेवण त्यांना मानवलं होतं. वजन वाढतंय, पोट जरा आवळलं पाहिजे असं स्वतःशीच पुटपुटत ते दाढी करण्यांत गर्क झाले. नागपूरला होते तेव्हा तीन तीन, चार चार दिवसांनी दाढी होत होती. तोंडावर पिकलेले खुंट उगवत होते. तिथं ते चालायचं. इथं दर दिवशी हा नवीन उद्योग त्यांनी जबरून घेतला होता.

दाढी होताच नंदाच्या पेटीतनं त्यांनी छोटी कातर घेतली, मिशांना रेखीव आकार दिला आणि ते घाईघाईनं आंघोळीला गेले. मग नंदाचं सुवासिक पोमेड हातांना चोळून त्यांनी दोन्ही हात कानशिलांवरून मागं ओढले. टकलाच्या भोवतीचे केस पिकले होते. पण त्यावर कलप लावणं बरं दिसलं नसतं. नंदाच्या लक्षात आलं असतं.

ते बाल्कनीत उभे राहिले.

दुर्गी येताना दिसली. तिच्या हातात पिशवी होती.

ते घाईघाईनं स्वैपाकघरात गेले. खिडकीतनं दोरी खाली सोडली. दुर्गीनं दोरीला पिशवी बांधताच त्यांनी पिशवी वर ओढली. गरम डबा रिकामा केला. पिशवीत टाकून पिशवी खाली सोडली.

पिशवीतनं आलेली चिठ्ठी वाचत ते बाल्कनीत उभे राहिले:

'आज तुझ्या आवडीची मसाला कोलंबी आहे. आणि अंबोळघा. पोटभर जेव. उरली कोलंबी तर नंदा खाईल.'

चिठ्ठीचे तुकडे करीत त्यांनी खाली पाहिलं.

डबा पोटाशी धरून दुर्गी चालली होती. तिनं मान वळवून वर पाहिलं नाही. खाली मान घालून ती चालत राहिली. पायात नवीन चपला होत्या. लालसर चौकडीच्या लुगड्यातनं तिच्या पायाच्या गोऱ्या पोटऱ्या दिसत होत्या. अंबाड्यावर मोठा गजरा होता. अंगानंही जरा भरली होती.

हेमाच्या घरून आलेलं जेवण त्यांनी कागदात बांधलं आणि बाहेर फेकून दिलं.

टेबलावर ताट ठेवून ते जेवायला बसले आणि दार वाजलं. नंदा मागं वळला की काय या भीतीनं ते थरथरले.

दार उघडताच दारात मोरोबा उभा.

ते बघतच राहिले. हसण्याचं विसरून गेले.

मोरोबा आपल्याच घरी यावा तसा आत शिरला आणि म्हणाला,

"जेवायला बसला होतास की काय?"

धन्य ही गायनी कळा!!



"संगीताचा गायी-म्हशींवर परिणाम" या पुस्तकाचे लेखक राज्य-पारितोषिकाचा स्वीकार करीत आहेत.








"कां ?"

"कोलंबीचा वास आला—"

"तपकीर ओढतोस आणि वास वरे येतात.." असं म्हणत ते स्वैपाकघरात गेले.

पाठोपाठ मोरोबा आला आणि खुर्चीवर वसला.

"जेवणार आहेस का ?"

"म्हणत असशील तर जेवतो."

दोघेही जेवायला बसले.

"वा:! कोलंबी फक्कड आहे...." असं म्हणत मोरोबा तोंड वाजवू लागला.

"कसली आठवण आली ?"

"माईच्या हातच्या जेवणाची! तस्संच जेवण...."

बाबूराव निळ्या काचात बघत राहिले. पण त्याचं लक्ष नव्हतं. चारी बोटं तोंडांत सारून तो भुरके मारण्यात मग्न झाला.

"खूप दिवसांनी अशी कोलंबी खाल्ली! कधी कधी वाटतं, माई बोलवील जेवायला! पण त्या दोघांनीही नाव टाकलंय माझं..." असं म्हणत त्यानं बोटं चाटली.

मोरोबानं ताट घुतल्यासारखं स्वच्छ केलं. आणि बाबूराव बेसावध असतानाच एकदम विचारलं,

"हल्ली भेटली होती ?"

"कोण?" त्यांची छाती धडधडली.

"दुर्गी—"

"नाही बुवा!"

"खोटं बोलू नकोस!"

"खरंच नाही!"

निळ्या काचा रोखून तो बघत राहिला.

"कां ?" बाबूरावांना संशय आला.

"गेल्या पंधरावड्यात दुर्गी एकदम पालटलीय...पांढरं पातळ सोडून रंगीत....."

"अस्सं.....?"

"एकदम तरणी झालीय....अंगानं जरा सुटलीय हल्ली.. साली केसांना कलप पण लावते..."

"अस्सं...?"

"शोभतं का हे...या वयात...?"

"पण तुझं काय जातं?" त्यांचा आवाज एकदम तडकला

"माझं काय जातंय ? उद्या तू सुद्धा टकलांवर टोप बसव ना..माझं काय जातंय ?"

बाबूराव चपापून गप्प बसले.

"एकूण तिच्या रागरंग जरा बरा दिसत नाही...!"

"आपल्याला काय करायच्यात दुसऱ्यांच्या गोष्टी ? तू तुझ्या धंद्याचं सांग, मोरोबा!"

"कसले धंदे करणार ? वर्तमानपत्रांची लाईन आहे तेवढी पुरे !"

"दुर्गीकडे तूच टाकतोस ?"

"तिला काय करायचाय पेपर?....मोफत टाकत होतो...तर नको म्हणाली...नको तर नको!"

बराच वेळ तो दात कोरत स्वस्थ बसला.

त्याला घालवून देण्याच्या इराद्यानं त्यांनी जांभई दिली.

"तुला झोपायचं असेल....." मोरोबा उठून उभा राहिला.

"हो!"

"संध्याकाळी येणार ?"

"कुठं ?"

"रामाच्या देवळात ?"

"कां ?"

"येवलेकरबुवांचं कीर्तन आहे! आलास तर दुर्गी दिसेल!"

"कशावरनं ?"

"येते ती असल्या कीर्तनाला, माईला घेऊन—ये रे, बघ तर खरी!"

"छे! मला जायचंय हेमाच्या घरी! लग्नाचं सगळं ठरवायचंय!"

तो दाराकडे गेला.

"आता कुठं निघालास ?"

"जरा भटकणार! खोलीवर तरी जाऊन काय करायचं? रिकामी खोली खायला उठते. पहाटे तीन वाजता उठून कामाला लागतो....हे पेपराचं काम आहे म्हणून बरं...." असं स्वतःशीच पुटपुटत तो बाहेर पडला... * *

## [११]

संध्याकाळी बाबूराव खाली उतरले.

रस्त्यावर येताच त्यांनी व्हिक्टोरिया उभी केली. कुलाब्याला वळसा घालून परत येण्याच्या बोलीवर व्हिक्टोरिया ठरवली आणि ते आत वसले.

ठरल्याप्रमाणे पंधरा वीस पावलांवर दुर्गी उभी होती. व्हिक्टोरिया थांबताच ती आत चढली आणि त्यांना बिलगून बसली. फुलांच्या वासानं त्यांचं मन मोहरून गेलं. तरीही ते हळूच बाजूला सरकले.

"म्हटलं, आज तू रामाच्या देवळात कीर्तनाला जातेस की काय ?"

"चाललं होतं माईचं तुणतुणं! कसली कीर्तनं नि कसलं काय ?"

"रामाचं देऊळ म्हटलं की—"

"काय आठवतं ?"

"तू सांग—"

"देवळासमोरच उभं राहून 'देऊळ कुठं आहे हो ?'—ती हसत राहिली.

बाबूरावही हसले.

"पण तुला कसं कळलं आज कीर्तन आहे म्हणून ?" तिनं एकदम वळून विचारलं.

"मोरोबा म्हणाला....बोलावत होता...पण थाप मारली. म्हटलं, नंदाच्या लग्नाचं ठरवायला जायचंय!"








"खरंच कधी आहे त्याचं लग्न?"

"पुढल्या सोमवारी!...आणि बरी आठवण झाली. उद्या-पास्नं जेवण नको आणू हं!"

"कां?"

"आता लग्नासाठी माणसं जमतील. उद्या सकाळी नंदाची मावशी येणार...ती करील जेवण!"

"म्हणजे आजच तुला मसाल्याची कोलंबी पाठवली ते बरं झालं म्हणायचं...आवडली की नाही?"

"वा:! कुणी केली?"

"केली माईनं...पण सगळं वाटण मीच करून दिलं....!"

"कशाला एवढा त्रास घ्यायचा?"

"कसला त्रास?...आवडतं मला.....!"

"कित्ती वर्षांनी खाल्ली....!

"नंदाला उरली?"

"त्याला कशी ठेवणार?"

"कां?"

"मग चौकशी होणार....कुणी पाठवलं जेवण....?"

"मग सांगावं—"

"काय सांगावं?"

ती कांही बोलली नाही. तेही थोडा वेळ गप्प बसले. त्यांनी हातात नेहमीसारखी काठी घेतली नव्हती. त्यामुळे चुकल्यासारखं वाटत होतं. तिच्या हिरव्या साडीचा गुलाबी पदर पाहात ते नुसते बसून राहिले.

"हल्ली तुझी तब्येत बरीच सुधारलीय ग—"

ते ऐकून ती सुखावली. तरंगल्यासारखी हसली, आणि म्हणाली,

"आजच माई म्हणत होती—"

"काय?"

"तुझ्या तोंडावर तेज आलंय म्हणून!"

"माईला एवढ्या जाड चष्म्यातून दिसलं बरं!"

"कुठं दिसतंय तिला? पण हल्ली दोन घास माझ्या पोटात जातात. रात्रीची झोप बरी लागते....नाही तर बिचारी माझ्या कपाळावर मगजशुद्धी चोळत बसायची...मला झोप येत नाही म्हणून....त्या कर्मातनं ती सुटली!"

ते एकून बाबूरावांना बरं वाटलं. म्हणाले,

"माई म्हणतेय ते खरं आहे—"

"काय?"

"हल्ली तू खरोखरच सतेज दिसतेस...छान दिसतेस—!"

आनंदानं तिचे गाल फुगले. हातातल्या बांगड्या फिरवीत तिनं मान खाली घातली. आणि हळूच त्यांच्या जवळ सरकली.

व्हिक्टोरिया खडबडत चालली होती.

थोड्या वेळानं ती हळूच म्हणाली,

"एक विचारायचंय...."



अनुक्रमणिका

"काय ?"

"तू सांग—"

"मला नाही माहीत—"

"खरं म्हणजे हे तूच विचारायला हवंस!...पण तुला उशीर करायची आणि मागून रडायची खोडच आहे!"

त्यांचं काळीज एकदम गडबडलं! श्वास रोखून ते गप्प बसून राहिले.

"मागं एकदा उशीर केलास आणि मग सगळे भोग मी भोगले....हा नंदा....माझ्या पोटी यायचा....सोमवारी देवक ठेवलं असतं आपण.....!"

त्यांना एकदम गरगरल्यासारखं झालं. ते कोपऱ्यात टेकले.

तिला पत्ता नव्हता. आपल्याशीच बोलल्यासारखी ती थांबून थकून बोलत होती.

"....माझ्या सगळ्या आशा राहून गेल्या...पत्रिकेत चांगल्या नवऱ्याचा....चार मुलांचा योग....पण शेवटी ही अशी दशा झाली......!"

तिला श्वास लागल्यासारखा झाला.

"...दारंखिडक्यांना पडदे करायचे...उशांना अभ्रे...ते भरायचे... अंगडी टोपडी शिवायची....काही नाही...!

ती भ्रमिष्टासारखी बोलतच होती.

"कोटांना बटणं लावायची...उष्ट्या ताटात जेवायचं...आपल्या घरावर, आवडत्या माणसावर प्रेम करायचं...सगळं सगळं राहून गेलंय.....!"

ती वेड लागल्यासारखी स्वतःशीच चमत्कारिक हसली.

"एक दोन अक्षरी गोडसं नाव सुद्धा ठेवलं नाही...रेखा...शुभा ....चित्रा....!"

तिनं एकदम वळून पाहिलं.

"कुणी ?" गुंगीत बोलल्यासारखा त्यांच्या तोंडातून शब्द फुटला.

"आपल्या कर्मानं!" ती तुच्छतेनं थुंकल्यासारखी बोलली.

"काय म्हणायचंय तुला ?"

"कोण ?"

"रत्नाकर...."

"मेला धड कधी बोलला असेल तर ना! आता बरा लुळा होऊन पडलाय....अर्धांगानं!"

"आणि आप्पा–?" पुनः एकदा आपण हे विचारायला नको होतं असं त्यांना वाटलं.

"तो मेला डिअर डिअर करून नाचायचा...उगाच नाही रक्त ओकून मेला....! घाणेरड्या थेटरात घेऊन जायचा!"

"कुठल्या ?"

"बॉक्स असलेल्या थेटरात...चाळे करायला...थू:!" ती बाहेर वाकली, खरोखरच थुंकली आणि म्हणाली,

"आपल्या माणसाबरोबर कधी सिनेमाला सुद्धा...."

गळ्यात कढ जमले. तिला पुढं बोलता येईना. तिनं हळूच आपला हात त्यांच्या हातावर ठेवला.

हात उचलून त्यांनी हातरूमाल काढला आणि आपलं नाक पुसलं.

ती एकटक त्यांच्याकडे बघत राहिली. तिला आता आतुरतेनं ऐकायचं होतं.

"झालं....होऊन गेलं....आता हे सगळं विसरायला हवं...!"

"विसरलेच आहे....म्हणून तर झोप लागतेय्..."

"आणि लग्नाचं सुद्धा...."

"कां...कां ?"

"या वयात लग्न ?"

"कां नाही ?"

"अंगात जोम असतो तेव्हा लग्न..मग एकमेकांचं समाधान होता होता आपुलकी वाढते... प्रेम वाढतं....या वयात लग्न.... एकमेकांना बघत बसायचं.....!"

"कां ?.....सुखदुःखाच्या गोष्टी बोलायच्या...हिंडायला जायचं ....एकदा तरी त्या मेल्याच्या घरावरून ....सिनेमाला...लग्न समारंभाला...हक्काचा नवरा असला म्हणजे उजळ माथ्यानं फिरता येतं....नाही तर एकटीनं बसून राहायचं म्हणजे....." एकदम तिचा आवाज रडवेला झाला.

बाबूरावांना सुद्धा गदगदल्यासारखं झालं. तरी सुद्धा ते हाललेल्या आवाजात म्हणाले,

"आता काय अर्थ आहे लग्नात ?"

"कां नाही ?"

"कां! कसं सांगायचं ?"

असं म्हणून ते स्तब्ध राहिले. त्यांना काही तरी सांगायचं होतं. अगदी आतलं, मनातलं! गुप्त असं! पण ते बोलले नाहीत.

पण त्यांनी काही तरी बोलावं म्हणून ती डोळे रोखून बघत राहिली.

"काय उरलंय आपल्या अंगात ?"

"अंगात नसू दे! मनात तरी ?"

"खुळी आहेस—"!!

"असू दे!"

"तुला माहीत आहे...दोनदा हार्टअॅटॅक येऊन गेलेला माणूस मी....."

"मी घेईन तुमची काळजी...तुमचे जेवणखाण बघेन...."

"हं!" ते चमत्कारिक हंसले.

"कां ?"

"मृत्यूच्या दाढेत आहे मी...संडासात...न्हाणीत...कुठंही कढ येईल....!"

"असं बोलू नका तुम्ही!"

"सकाळी लग्न करशील...दुपारी विधवा होशील....!"

"राहीन तशी...तुमची म्हणून....!"









त्यांनी उद्विग्न होऊन फक्त मान हालवली.

"कुठं साव ?" व्हिक्टोरियावाला ओरडला.

"वापस फिराव...." त्यांचा आवाज खरचटला.

गाडी मागं वळली. डुलक्या घेत चालत राहिली.

बाबूराव मान टेकून स्वस्थ बसले. गळ्यातून तुटल्यासारखं त्यांचं डोकं लटलट हालत होतं. मन शान्त करण्याचा ते प्रयत्न करीत होतं. अचानक छातीत कळ येईल अशी त्यांना भीती वाटत होती.

ती आक्रसून गेली. कण्यातनं वाकली. म्हातारीसारखी बसून राहिली.

ते बोलले नाहीत. तीही बोलली नाही.

वीस पंचवीस पावलांवर घर आलं.

"ठैरो...." तिनं व्हिक्टोरियावाल्याचं खमीस ओढल.

"कां ?"

ती काही बोलली नाही.

व्हिक्टोरिया थांबताच ओळखदेख नसल्यासारखी खाली उतरली.

व्हिक्टोरिया चालू झाली.

त्यांनी मागं वळून पाहिलं.

ती खाली मान घालून तुटल्या-मोडल्यासारखी चालत होती.

* *

## [१२]

बाबूरावांना स्वस्थ वसवत नव्हतं !

त्यांनी पुनः एकदा कागदाच्या चिटोऱ्यांच्या गोळ्या केल्या. बराच वेळ दोन्ही बोटांनी चुरून चुरून त्यांनी चिटोऱ्याचे चिंचोके केले. मेजावर टाकले आणि काही क्षण रुसते बघत बसले. काळोखात मांजराचे डोळे दिसावेत तशा त्या गोळ्या दिसल्या. त्यांनी धडधडत्या काळजानं डोळे मिटले.. एक गोळी उचलली. ती सोडली. चिटोरा मेजावर पसरला आणि नाकावर चष्मा ठेवला.

करा !

त्यांना नको होता तोच शब्द त्या चिटोऱ्यावर होता—करा ! लग्न करा !

त्यांचं डोकं आतून चिवडल्यासारखं झालं. डोक्यावरचं गुळगुळीत कातडं त्यांनी बोटांनी करकरा खाजवलं आणि भयभीत होऊन ते खाटेवर आडवे झाले. डोळे मिटून स्वस्थ पडून राहिले.

समोर नंदा उभा राहिला. तापट मुद्रा ! तारवटलेले डोळे !

काय ?

तुम्ही पुनः लग्न करताय ? . त्या नवऱ्यानं टाकलेल्या आणि सासऱ्यानं नासवलेल्या थरडीशी ?

होय !

काही वाटायला पाहिजे तुमच्या मनाला ! चार दिवसांवर माझं लग्न आलं ! जमलेली सगळी माणसं हसतील. छी: थू करतील... शेण घालतील तोंडात !

घालू दे ! घालू दे !

पण एवढं काय अडलंय आता ? या वयात हवंच कशाला लग्न ?

कां हवं ? तुला कसं कळणार ? कसं कळणार तुला ? मनासारखं जेवण नाही. चार शब्द बोलायला कुणी नाही... बरोबर फिरायला कुणी नाही. दातांचा डबा कळकटलाय तर त्यावर कुणी हात फिरवीत नाही !

तिच्याशी लग्न करून तुम्हाला इथं राहाता येणार नाही !

ठीक आहे ! मला दुर्गीचं घर आहे ! दुर्गीच्या उंबरठ्यावर भरलेलं माप...सनईचे सूर !

बाबूराव दुर्गीच्या झोपाळ्यावर झोके घेत बसले. दुर्गीनं शेजारी बसावं मला मोठा मोगऱ्याचा गजरा माळून, असं त्यांना वाटलं. पण तिला वेळ नव्हता. ती दातांवरून ब्रश फिरवीत होती. दातांचा डबा घासून स्वच्छ करीत होती. धोतराची घडी करण्यात मग्न झाली होती. माई गरमागरम फुलके करीत होती.

कुसुम, चित्रा, अशी जवळ बैस !

कुसुमावती पदर खोवून समोर उभी. स्थूल अंगाची. अंबाड्यावर गजरा माळून. गालावरल्या त्या जुन्या खळीतून हसणारी. तेव्हा दिसत होती तशी. जरासुद्धा न वाढलेली ! शेजारी उभी राहून झोपाळ्याला जोरजोरानं झोके देत होती.

बाबूरावांना अकस्मात गरगरल्यासारखं झालं. सगळी खोली आपल्याभोवती गरगरते आहे असं वाटलं. भयभीत होऊन त्यांनी डोळे उघडले आणि दोन्ही हातांनी खाट गच्च आवळून धरली.



अनुक्रमणिका








रिकामं घर त्यांच्या अंगावर आलं. खरेदीसाठी, आमंत्रणासाठी बाहेर गेलेली माणसं अद्याप परतली नव्हती. स्वतःला पुरून घेतल्यासारखे ते अंधारात पडून राहिले.

डोक्यातला विचार सुटत नव्हता. लग्नाआधीपासून कुसुमावतीची एकच एक प्रतिमा डोक्यात आहे. मनातली कुसुमावती वाढलेली नाही. पोरसवदाच आहे. सावित्रीला जवळ घेताना सुद्धा त्याच पोरसवद्या कुसुमावतीला जवळ घेतल्याची कल्पना केली आणि मगच सावित्रीशी रंगलो...आणि आता या वयात दुर्गीच्या हाडांची जुडी...सुरकतून गेलेलं शरीर... गळणारं... लोंबणारं...सगळ्यांनी भोगलेला नागडा-उघडा देह ! त्यांना तो विचार सुद्धा नकोसा वाटला !

लग्न ! .. ते तुच्छतेनं हसले ! या वयात लग्न ! एकमेकांची तोंडं बघत बसायचं... हातात हात घालून रत्नाकर रांगणेकरांच्या घरावरून जायचं. त्यानं बघावं म्हणून ! हे सगळं तीन दिवस... चार दिवस... मग पुनः दोघांना एकमेकांचा वीट येईल... ज्या कुसुमावतीला इतकी वर्षं मनात घोळवली तिचा वीट ! तसं व्हायला नको ...! आणि अशा लग्नानं प्रेम टिकत नाही. वाढत नाही... तरुणपणी एकमेकांचा उपभोग घेऊन मनाचं...शरीराचं समाधान करता करता प्रेम वाढत असतं. हेमाच्या वडिलांनी दुसरं लग्न केलं... पण त्यावेळी ते छत्तीस वर्षांचे होते. ते ठीक होतं... प्रेम फुलायला अवधी होता.. पण दुर्गीला हे सगळं सांगणं कठीण... तिला ते समजणंसुद्धा कठीण !

एक लांब सुस्कारा सोडून ते क्षणभर स्वस्थ राहिले.. आणि मग सारं शान्त असताना एखाद्या फांदीवरून कावळ्यानं काव काव करावी तसा तो विचार त्यांच्या डोक्यात कावकावला... ती तरुण असताना त्या म्हाताऱ्या सासऱ्यानं तिच्याशी कसले चाळे केले असतील ? तिनं कसे करू दिले असतील ? बॉबकट कुणी करायला लावला... सासऱ्यानं की नवऱ्यानं. मोरोबानंसुद्धा तिच्या उघडया मानेचा मुका घेतला. ! कधी रागावली तर म्हणेल, यापेक्षा आप्पा रांगणेकर बरा होता.. ती आणखी विटंबना नको...!

नकोच...ती कटकट नको ! त्यापेक्षा जुन्या आठवणी आहेत त्या बऱ्या ! आयुष्याचे चार दिवस उरले आहेत. तेवढ त्या आठवणीवर काढायचे !

ते निर्धारानं उठून उभे राहिले. पटापट सर्व खोल्यातून दिवे लावले.

एकदम त्यांना स्वच्छ चांदण्यात आल्यासारखं वाटलं !

तेवढ्यात दरवाजाची कडी वाजली. ते सशासारखे म्याले. दुर्गी तर नसेल ना ? त्यांनी हळूच कडी काढली—नंदाची मावशी उभी होती !

"आजही नाहीच का बाहेर गेलात ?"

"नाही गेलो—".

"कां ?"

"सहजच !"

"तब्येत बरी आहे ना ?"

"कां ?"

"दोन दिवस घरीच बसून आहात-! म्हणत्ये... चेहराही त्रासलेला दिसतोय... !"

"छे !"

असं म्हणून ते बाल्कनीत गेले. तिनं आपल्या चेहऱ्याकडे बघू नये म्हणून.

रस्त्यावरनं दुर्गी जातेय की काय असा त्यांना संशय आला. पण नाकावर चष्मा नव्हता !

* *

## [१३]

आडोसा धरून बाबूराव खिडकीकडे उभे राहिले.

समोर दुसरं काही दिसत नव्हतं...ते एकच चित्र... ते खाटेवर झोपले आहेत. त्यांच्या कुशीत डोकं खुपसून कुसुमावती ओक्साबोक्सी रडते आहे. बंद दाराला बाहेरून कान लावून सगळीजणं खो खो हसताहेत...रडू नकोस, दुर्गी, उगी रहा ! तुला सांगत होतो मी. तुझ्या कल्पनेत होतो तो मी हा नव्हे... माझ्या कल्पनेत होतीस ती ही कुसुमावती नव्हे. तोंडात दात नाहीत...डोळ्यात दृष्टी नाही. अंगात रग नाही. मनात जोम नाही... कुशीवर वळण्याची सुद्धा ताकद नाही. हे सुकलेलं...सुरकतलेलं काष्ठ.. मनातल्या टपोऱ्या पुष्ट कुसुमावतीला ठार करतं आहे ग ठार करतं आहे. सावित्री शेजारी पहुडलेली असायची. .तळमळत. तडफडत. आणि बाजूला माझा दगड. .स्तब्ध...थंड ! दिवसचे दिवस. महिन्यामागून महिने. मग कल्पना. कल्पना. .सावित्रीला मिठीत घेऊन तिच्या जागी तुला बघत होतो. तुझं मांसल अंग. तुझे डोळे.. तुझं नाक. तुझे ओठ. तुझे श्वास. मग माझ्या नाकातोंडातून तुझेच उष्ण श्वास सुटत होते. अंग धगधगत होतं... तापत होतं. एकदम एवढा कुठला जोर येतो. .सावित्री विचारीत होती. .पण तुझ्याच आवाजात... आणि मग तृप्तीनं निजत होती. .मोगऱ्याच्या गजऱ्यावर नाक ठेवून मी वेड्यासारखा जागत होतो. ! ती कुसुमावती... आणि आता तू.. गळ्यातली जपमाळ तरी बाजूला ठेव. नीट दात लाव. .आणि डोक्यावरली मगजशुद्धी धुवून काढ.. ! ! .. अशी रडू नकोस. कल्पनेतला बाबू तू घालवून बसली आहेस !

! कल्पनेतली कुसुमावती निघून गेली आहे !

होतं तेही सुख गेलं !

तुझ्या हट्टानं तू घालवलंस !

आता अशी रडू नकोस ! एक अखेरची कळ येईल... सकाळीच.. आणि मग तुला रडावं लागेल. जन्मभर रडावं लागेल.. सावत्र मुलगा छळतो म्हणून !

टपकन टिपं गळली. काचा ओल्या झाल्या.

मन शान्त करीत ते उभे राहिले.

* *













अनुक्रमणिका

## [१४]

बराच वेळ झाला. बाबूराव तसेच खिडकीकडे उभे होते. खिडकीवरला नवा पडदा किंचित बाजूला सारून ते बाहेर बघत होते... काल रात्री हेमा लग्न होऊन आली. आज दारा-खिडक्यांवर कोरेकरकरीत पडदे चढले. सगळं घर सावलीत वसल्यासारखं दिसू लागलं. त्यांनी पुनः जरा पडदा बाजूला केला. त्यांची छाती विलक्षण धडधडली. कमरेत आणि कण्यात वेदना सळसळली. ढिलेपणा आला. पोट वाफरल्यासारखं झालं. गेले सहा–सात दिवस ते खाली उतरले नव्हते. काल लग्नासाठी उतरले तेवढेच !

घरात अजून पाहुण्यांची गडबड चालू होती. बायकांचं बडबडणं...पोरांचं बागडणं !... काल रात्री अहेरांची नोंद झाली. सगळ्या वस्तूंची ओळख पटली. एक चांदीची गुलाबदाणी ताटीत पडली होती.

"ही कुणी दिली ?... कुसुमावती साखरदांडे कोण ?"

एक प्रश्न सर्वजणं एकमेकांना विचारीत होती. बाबूरावांच्या तोंडाकडे पाहात होती. क्षणभर वाटलं, सांगावं ! कुसुमावती साखरदांडे...माझी जुनी... ! पण जीभ लोळागोळा होत होती. नको उगाच ! नाना प्रश्न उद्भवतील.

हॉलमध्ये मोरोबा सारखा विचारीत होता,

"दुर्गीला आमंत्रण दिलं होतंस ?"

ते नकारार्थी मान हालवीत होते.

तेवढ्यानं सुद्धा मोरोबाला बरं वाटत होतं. पण बरं वाटत होतं हे कळू नये म्हणून तो म्हणत होता,

"येणं, न येणं, तिची मर्जी ! पण तू आमंत्रण द्यायला हवं होतंस... !"

मोरोबा हे मुद्दाम म्हणत होता हे त्यांच्या लक्षात आलं होतं. पण त्यांनासुद्धा मनापासून वाटत होतं, तिला घरी जाऊन आमंत्रण द्यायला हवं होतं; पण पुनः तिची भेट घेणं त्यांना जमलं नव्हतं !

दुर्गी लग्नाला आली नव्हती. आपल्याला चकित करण्यासाठी ती आमंत्रणाशिवाय सुद्धा येईल असं त्यांना सारखं वाटत होतं. पण ती आली नाही... मग तिच्या नांवाची गुलाबदाणी कशी आली ? कोण घेऊन आलं होतं ? तो एक प्रश्न त्यांचं मन पुनः पुनः पोखरत होता.

"नवलच आहे बाई ! ही कुसुमावती साखरदांडे कोण ?" एकमेकींना विचारलं जात होतं.

"कुणी नंदाची पूर्वीची प्रेयसी वगैरे नव्हे ना ?" असं हसत हसत नंदाच्या मावशीनं हळूच बाबूरावांनाच विचारलं होतं.

त्यावेळी आपण हसलो नाही गाची त्यांना सारखी रुखरुख वाटत होती.

त्यांनी ती गुलाबदाणी पुनः पुनः पाहिली होती. कुसुमावतीच्या लग्नात आपण तिला दिलेली गुलाबदाणी तिनं परत करून टाकली की काय असा त्यांना संशय आला होता. आपलं नांव काढून त्या जागी तिनं आपलं घातलं असेल का ? त्यांनी ती गुलाबदाणी वाटोळी फिरवीत न्याहाळून पाहिली होती. पण ती नवीन होती. अगदी नवी कोरी होती... मध्येच त्यांनी एकदम दचकून गुलाबदाणी उघडून पाहिली होती. पण आत काही सुद्धा नव्हतं. दुर्गीच्या लग्नात तिला गुलाबदाणी देताना त्यांनी एक चिटोरा तिच्या हातात खुपसला होता...घडायचं होतं...पण घडलं नाही... तो चिटोरा तिनं या गुलाबदाणीत ठेवला असेल असं क्षणभर वाटलं होतं; पण आत काही नव्हतं. त्यांना एकदम सुटल्यासारखं झालं होतं !

सगळं मनात घोळवीत ते खिडकीपाशी उभे होते. मुद्दामच उभे होते. त्यांनी पुनः पडदा बाजूला केला आणि चष्म्यातून डोकावून पाहिलं. एकदम त्यांचं अंग थंडगार पडत गेलं... रस्त्यावरनं कुसुमावती चालली होती. पुनः मूळ पदावर आली होती. केसावरचा कलप उडत होता. मानेवर सुपारीएवढ्या आंबाड्याची गाठ लोंबत होती. गळ्यात काळ्या मण्यांची जपमाळ ! मळकट पांढरं पातळ. हातात निऱ्या धरून ती स्वतःला ओढत पिकेट रोडला चालली होती. एकशिवडी रेघ पुढं पुढं सरकत होती.

पाठीमागनं चोरासारखा मोरोबा पावलं टाकीत होता.

मगजशुद्धीचा उग्र दर्प नाकात शिरल्याचा त्यांना भास झाला मात्र...

हजारो कावळे काव काव करीत जमिनीवरून वर उडाले... डोळ्यांसमोर अति घट्ट काळाकुट्ट काळोख. ते एकदम खाली कोसळले.

मध्यच एकदा अर्धवट जाग आली. खूपसे चेहरे दिसले. पण ओळखता आले नाहीत. नाका-तोंडातल्या नळ्यांनी ते अवघडले होते. मिटलेल्या डोळ्यांसमोर विचित्र वलयांची आवर्तनं उठत होती. रंगी-बेरंगी ! आणि कानात हजारो कावळ्यांचा आकान्त..!

तरीही मनातल्या मनात ते बजावीत होते... पाहिलंस ना... तुला सांगत होतो...मी मृत्यूच्या दाढेत आहे म्हणून !
पण तिला त्याचं काहीच नव्हतं...हातातल्या हिरव्या बांगड्या फिरवीत ती ओठातल्या ओठात हसत होती... म्हणत होती... उठा... हातात हात घालून आपण बाहेर पडू... त्या मेल्याच्या वरावरनं जरा मिरवीत जाऊ... मेला लुळा पडलाय... बघेल आपल्याला डोळे फाडून... !

उठण्यासाठी ते चुळबुळले.

पण व्यर्थ ! जणु ती त्यांच्या छातीवरच बसली होती. खूप जड जड वाटत होतं... श्वास अधिकाधिक कोंडत होता !

•••












अनुक्रमणिका



# नरकासूर
## आसूर की आर्य

—माधव राजवाडे

**दिवाळीच्या पहिल्या दिवशी ( नर्कचतुर्दशीला ) घरोघरी ' नरकासुराला ' चिरडण्यात येते, हा नरकासूर होता तरी कोण ? त्याचा आणि नर्काचा संबंध काय ?...**

ऑक्टोबर १९६८ च्या पहिल्या आठवड्यात तीस्ता नदीने विराट आणि रौद्रस्वरूप धारण केले आणि उत्तर वंग व पश्चिम आसामला अननभूत महापुराचा तडाखा बसला. सर्वत्र हाहाःकार उडाला. तेलधेनू आटली. तेलाची पाईपलाईन दुभंगली. परिणामतः बरौनी रिफायनरी बंद पडली व गौहत्ती रिफायनरीस पुराची जबरदस्त झळ लागली. नीट मार्गस्थ असलेले तेल वितरण विस्कटले. अक्षरशः काल-प्रलय झाला. त्याची पाहणी करण्यास्तव दौरा काढणे व करणे भाग पडले. दिवाळीच्या सुट्टीचा फायदा घेऊन सहाध्यायींच्या समवेत विमानमार्गे सिलीगुढीस पोहोचलो व लगेच हेलीकॉप्टरने पुढील प्रवासास निघालो. भंगलेल्या पाईपलाईनची टेहळणी करीत रात्रीच्या मुक्कामास नूनमातीस पोहोचलो. अतिथीगृहात वाचावयास ठेवलेल्या पुस्तक संचयात संसदीय सदस्य श्री. हेम बारुआ यांच्या 'नीलाचल व लोहित्य नदी' या इतिहासबजा पुस्तकाने लक्ष वेधून घेतले. सकाळी उठलों तेव्हा संथपणे वाहणाऱ्या लगतच्या नदीचे अफाट पात्र व क्षितिजाकडील टेकडीचे दृश्य पाहून पुराच्या संदर्भात सहज संस्कृत पंक्ती आठवली—

> कतिपय दिवस स्थायी पूरो दूरोन्नतोऽपि भविता ते ।
> तटिनि ! तरद्रुम पातन पातककेमं चिरस्थायी ॥

**(हे वाहणाऱ्या प्रवाहा ! आज कितीही प्रचंड महापूर आलेला असला तरी तो फार थोड्या दिवसांचा सोबती आहे. तो लवकरच निघून जाईल. पण त्याच्या संगतीने तू बेफाट होऊन, तुझे चिरमित्र जे तटतरु त्यांना तू उपटून टाकलेस हे पाप मात्र तुला चिरकाल जडून राहणार आहे हे विसरून कसे चालेल).**

टेकडीवर कामाक्ष्य मंदीराचे शिखर झळकत होते तर नदीचे तांबूस पाणी तळपत होते. कामाक्ष्याचा डोंगर म्हणजेच 'नीलाचल' व लालसर पाणी असलेली ब्रह्मपुत्रा म्हणजेच 'लोहित्य नदी.' वेळात वेळ काढून पुस्तक वाचले आणि योगायोग असा की तो दिवस म्हणजे 'नरक चतुर्दशी.'

बुद्धधर्माच्या व शाक्तपंथाच्या समन्वयातून तांत्रिक पंथ निर्माण झाला असावा. त्या तांत्रिक पंथाचा कामाक्ष्य मंदिराशी संबंध जोडला जातो. प्राग्ज्योतिषपुराचा प्रबळ किराताधिपती नरकासूर ह्याने सदर मंदिराची महाभारतपूर्व काळात स्थापना केली व कोचवंशीय अधिपती नरनारायण याने १५६५ मध्ये त्याचा पुनरुद्धार केला. तिबेटी-बर्मन भाषेतील 'खमोच' ( Khamoch ) ह्या शब्दातून कामाक्ष्य शब्दाचा उगम झाला व त्याचे संस्कृतकरण 'कामाक्ष्य' असे झाले, असे असामीय विद्वान भाषातज्ञ डॉ. बी. के. काकोटी ह्यांनी प्रतिपादिले आहे. 'खमोच' म्हणजे 'कुणाचे तरी शव' असा तद्देशीय प्राचीन भाषेतील वाक्प्रचार—विष्णूने शरीराचे तुकडे तुकडे केले. शिव ते शरीर खांद्यावर वाहून दऱ्याखोऱ्यात इतस्ततः भ्रमण करीत असताना शक्तीच्या शरीराचा 'योनी भाग' ह्या टेकडीवर पडला व त्याच जागी कामाक्ष्यीच्या मंदिराची स्थापना नरकासुराने केली असा दृढ समज आहे. निळ्या आकाशाच्या मनोहारी पार्श्वभूमीवर आसामचे पर्वत व डोंगर वर्षाऋतूत अधिकच निळे दिसतात म्हणून कामाक्ष्यीच्या टेकडीला 'नीलाचल' असे समर्पक व सार्थ नाव पडले.

### लोहित्य नदी

आसामी आदिवासी आपल्या भाषेत ब्रह्मपुत्रा नदीस 'नाम-दाओ-फी' अशी संज्ञा देतात. संस्कृतात तिला 'लोहित्य नदी' असे नाव आहे. वर्षा ऋतूत नदी लाल मातीतून सुसाट्त वाहते व लालावते; परंतु पुराणात त्याला निराळेच व विपरीत वळण व भाष्य लाभले. असे म्हणतात की परशुरामान अनेक पापे केल्यानंतर आपले रक्तलांछित शरीर त्या नदीत पापक्षालनार्थ धुतले व तो पुनीत झाला, पुनश्च








पुण्यसलील बनला. त्याचाच परिणाम म्हणून ही नदी लाल झाली. म्हणून ब्रह्म पुत्रा ही 'लोहित्य नदी.'

ऑईल इंडिया कंपनीचे एक महाराष्ट्रीय तज्ञ एंजिनियर श्री. करोडे भेटण्यास आले व त्यांनी जाणीव करून दिली की तो दिवस दिवाळीचा पहिला दिवस म्हणजेच नरक-चतुर्दशी. महाराष्ट्रात किशोर किशोरी किंवहुना प्रौढसुद्धा सूर्योदयापूर्वी उठून उटणे वगैरे सुगंधित पदार्थ लावून अभ्यंग-स्नान करतात. का तर आई बाळाला सांगते की सूर्योदयापूर्वी स्नान नच आटोपले तर नरकात पडशील. किती विपरीत विडंबन हे! किती ही कोती कल्पना! अर्थात् नरकचतुर्दशी नरकासुराच्या वधाची स्मृती म्हणून पाळली जाते. या अनुषंगाने पहाटे लवकर उठून लवकर स्नान केले जाते आणि त्या समयी नरकासुराला प्रत्यक्ष वधल्याची कृती म्हणून पायाखाली कारंट नावाच्या एका वेलीचे फळ चिरडले जाते त्यात काही औचित्य तरी आहे. कारटावर लहान लहान काटे असतात. ह्या दृष्टीने नरकासुराला प्रतीक म्हणून हे फळ वापरण्यात योजना-प्रयोजन कळण्यासारखे आहे.

## नरकासूर

नरकासूर कोण होता? नरकाशी त्याचा काय संबंध? आर्यांचा इतिहास ज्यांना परिचित आहे त्यांना हे ज्ञात आहे की आर्यांच्या लाटावर लाटा हिन्दुस्थानात अति प्राचीन काली आल्या व एतद्देशीय लोकांशी त्यांनी वैर धरले. विजेत्यांनी असा बरचष्मा व गुरगंड दर्शविणे व आचरणे हे त्या काळाच्या आदानप्रदानाला अनुसरूनच होते. ह्या बाबतीत असामीय आदिवासी अपवाद ठरले नाहीत. पूर्व भारतातील, करातोया नदीच्या पूर्वेकडील म्हणजे पूर्वपाकिस्तानातील रंगपूर जिल्ह्याच्या पलीकडील भागास म्लेंच्छ अथवा असूर देश असे महाभारतात संबोधिलेले आहे. ह्या देशाचे राजे व रहिवासी तिबटी-बर्मन जमातीचे असावेत ह्याला महाभारतात पुरावा मिळतो. प्राग्ज्योतिषपूरच्या महा-भारतकालीन राजा भगदत्तास यवन म्हटलेले आहे. नरकासुराच्या ह्या ज्येष्ठ पुत्र भगदत्तास भगवान श्रीकृष्णाने नरका-सुराच्या वधानंतर माता पृथ्वीच्या आग्रहा-वरून प्राग्ज्योतिष्पुरात राज्याभिषेक करवला असा विष्णु पुराणात उल्लेख आहे. कौरवांतर्फे तो क्षात्र धर्माला अनुसरून लढला व आर्यांनीच लिहिलेल्या महा-भारतातसुद्धा त्याच्या शौर्याचा गुणगौरव लेखकाने मुक्तहस्ताने केलेला आहे. तरी-सुद्धा त्यास महाभारतात पीतवर्णीय यवन असे संबोधले आहे. प्राग्ज्योतिषपूरचा नरकपूर्व किरात राजा चातक ह्याचे जणू सोनेरी कांबाप्रमाणे पीतवर्ण आहे असे म्हटले आहे. ह्या सर्व वर्णनांचा रोख एकाच बिंदूकडे आहे. आणि तो म्हणजे तद्देशीय जनतेला अनार्य अर्थात् 'म्लेंच्छ' 'दानव' 'असूर' अशी संज्ञा देऊन आर्यांनी त्यांच्याबद्दलचा प्रगट केलेला आपला द्वेष! याचा परिणाम म्हणून विपरीत कल्पना निर्माण झाल्या व आर्यांना अप्रिय अशा नरकासुराने केलेल्या कृतीवरून त्याचा नरकाशी संबंध जोडला गेला अशा आशंकेस यामुळे वाव मिळतो. तेलधेनूस दोहता दोहता प्राचीन प्राग्ज्योतिषपुराशी म्हणजे आजच्या कामरूपाशी माझा परि-चय घडला आणि मराठी जनतेस माझा ऐतिहासिक शोधबोध निवेदावा अशी तीव्र इच्छा झाली. प्राग्ज्योतिषपूरचा आदि इतिहास म्हणजे नरकासुराचाच इतिहास असे म्हणावे लागते. अतएव इतिहासप्रेमी महाराष्ट्रीय रसिकांपुढे नरकासुराचे हे साद्यंत वर्णन सादर करीत आहे.

## नरकासुराचा उद्भव

नरकासुरास वराहपुत्र म्हणतात. पण तो कोणत्या संदर्भात वराहाचा पुत्र म्हणून निपजला? देवाच्या अनुग्रहाने धरित्री देवीच्या गर्भात पोषण होऊन जन्मला आणि असूर म्हणून कसा विख्यात झाला? मार्कण्डेय उत्तर देतात की, नरकासूर रजस्वला धरित्रीच्या गर्भात, ब्रह्मदेवाच्या उरसाने प्राप्त झाला.

> 'रजस्वला गोत्राया गर्भे वीर्येण प्रोत्रिणः।
> यतो जातस्ततो भूतो देव पुत्रोहपि सोहं सुरः॥'

पृथ्वीच्या गर्भात महावीर उत्पन्न होणार व तादृश महाबली असुराच्या उत्पत्तीने अनिष्ट ओढवणार ह्या विवंचनेने देवगणांनी स्वकीय देशभक्तीच्या बळाने पृथ्वीचा गर्भ कठीण करण्याच्या हेतूने पुत्रसंभवात बाधा आणली. जगद्धात्री पृथ्वी प्रसवकाल

## 'चक्राकार' साहित्यिक



यज्ञून ठेपल्यावरही अपत्यप्रसव न झाल्या-कारणाने शोकाकुलं झाली व विपदापन्न स्थितीतून मुक्त होण्यासाठी नतमस्तक बनली. विनीतभावाने जगत्पती मधु-सूदनाची आळवणी करू लागली.

'त्वया वराहरूपेण मलिनी कामिला पुरा।
तेन कामेन कुक्षो मे यो गर्भोयम् त्वया-हिताः ॥
काले प्राप्ते ऽपि गर्भो ऽयम् न प्रच्यवती माधव।
कठोर गर्भा तेनाहम् पीडितास्मि दिने दिने ॥'

दुर्वह गर्भभार सहन करण्यास अक्षम झालेल्या व निरंतर दुःख असह्य झालेल्या पृथ्वीवर भगवान प्रसन्न झाले. तिचे ते दुःख चिरस्थायी होणार नाही व आदि-सृष्टीपासून अठ्ठावीस चतुर्युगाच्या अंत-र्गत त्रेतायुगात जेव्हा श्री रामचंद्र रावण-वध करतील तेव्हा पुत्रप्रसव होईल असे वरदान देऊन भगवान अन्तर्धान पावले. अर्थात् पुत्रप्राप्तीनंतर स्मरण करताच पुनः येऊन पुत्राच्या प्रतिपालनाची सोय करीन असेही अभय भगवंतांनी दिले.

'अष्टाविंशतिमे प्राप्ते आदिसर्गाच्चितुर्युगे।
त्रेता युगस्य मध्ये तु सुतम् त्वम् जन-यिष्यसि ॥'

विदेशीपती राजा जनक अनेक काळ निरपत्य असल्याने विमनस्क व चिंताग्रस्त होते. राजा दशरथाने ऋष्यश्रृंग प्रभृती मुनिजनांचे अनयन करून यक्षफलरूपे पुरंदरसदृश्य चार पुत्र प्राप्त केले असे नारदमुनीकडून कळल्यानंतर अंतःपुरात कानगोष्टी केल्या. पुरोहित गौतम व पुत्र शतानन्द ह्याच्या उपदेशानुसार राजा जनकानेही यज्ञास आरम्भ केला. ह्याच यज्ञभूमीतून त्यांना पृथ्वी पुत्री भुवन-मोहिनी कन्या प्राप्त झाली. ही कुलपावनी मंगलमयी कन्या जानकी राजा जनकास अर्पण करताना पृथ्वीने अट घातली की रावण निहत होताच याच यज्ञभूमीत ती ज्या पुत्रास प्रसवेल त्याचे शैशव पूर्ण होईपर्यंत राजा परिपालन करील. पुरोहित गौतमासमक्ष राजा जनकास प्रतिज्ञा करा-वीच लागली. पृथ्वीची इच्छा राजाने मान्य केली. यथासमय, रावण वधानंतर, ज्या यज्ञभूमीत सीतेची उत्पत्ती झाली होती तेथेच पृथ्वीस मध्यरात्री पुत्र झाला. पुत्र झाला पण त्याच्या अस्तित्वाची निश्चिती नव्हती. म्हणून पृथ्वीने स्मरण करताच भगवान विष्णू पृथ्वीस सांगते झाले की तिचा हा पुत्र मनुष्यभाव धारण करील, पराक्रमी बनेल आणि चिर-काल सुखी राहील. परन्तु जेव्हा तो मनुष्यभाव त्यजील तेव्हा त्याच्या जीव-नाची आशा राहणार नाही—

'यावन्मानुषभावम् ते तनयो भावमिष्यति।
तावत् कल्याणभागभूत्वा चिरम् राज्यम् करिष्यति ॥
त्यक्त मानुषभावस्तु यदा च अयम् विचेष्टते।
तदा तू नास्य सूचिरम् जिवितम् संभ-विष्यति ॥'

—आणि १६ व्या वर्षानंतर धन-रत्न-गज ऐश्वर्यस्थ समूहाने समृद्ध राज्यभार त्याला लाभेल.

नरकासूर हा विष्णूचा भूमीपासून झालेला पुत्र आणि त्याला भगवंताचे अभय लाभले. भगवान अन्तर्धान पावल्यानंतर पृथ्वीने राजा जनकास यथासमय संदेश पाठवला आणि पूर्वसंकेतानुसार राजा येताच आपला पुत्र त्याच्या स्वाधीन केला.

मार्कण्डेयकृत नरकासुराच्या जन्माच्या वर्णनावरून त्या काळच्या सामाजिक भेदाभेदावर काही अनुमाने काढता येतील काय? वरील कथेवरून जे दिसते ते असे की, आर्यांना आर्येतर मंडळींची घृणा असावी. देवगण हे आर्य व भगवान विष्णू हे त्यांचे एक श्रेष्ठी. विष्णूनी आर्येतर महि-लेशी संग करून पुत्रसृष्टी करावी यावर आर्यांची कृपादृष्टी कशी वर्षावी? पृथ्वी उद्देशीय महिला म्हणजे अनार्य, तेव्हा तिचा हा अनौरस पुत्र देवांना म्हणजे आर्यांना कसा खपणार जन्मापासून आर्यांनी त्याच्याशी साहजिक वैर धरले. गर्भवती असताना झालेल्या आर्यांच्या त्रासापासून वाचवण्याकरिता तिने आपल्या अपत्यास अज्ञात स्थळी जन्म दिला व निपुत्रिक राजा जनकापासून त्याचे सुर-क्षित प्रतिपालन होईल याची पुरोहिता-समक्ष प्रतिज्ञाही करविली. या संदर्भात आणखीही एक विचार अन्वर्थक ठरेल. 'पुराणात नरकाची नावे कोणती' असा प्रश्न नारदांनी एकदा श्री विष्णूना विचा-रता त्यांनी त्याचे उत्तर खालीलप्रमाणे दिले :—

१ तामिस्त्र, २ अंधतामिस्त्र, ३ रौरव, ४ महारौरव, ५ कुंभीपाक, ६ काळसूत्र,














बघुन अशी—
सुरत सावळी उमर कोवळी
पोर येर्वाळी खुळी होणार ऽऽ ॥
शेलाटी—
परी बळकटी हिची कृश कटी
चाल लटघटी हत्ती हरणार ऽऽ ॥
आरक्त—
कपोली खळी दिसे आगळी
दिलाची तळी हीच भरणार ऽऽ ॥
मर्जरी—
शाल लिंबोळी असा झुळझुळी
पदर सुनंळी मधुन ढळणार ऽऽ ॥
बघुन हिचे—
नितळ ते अंग चोळी रे तंग
नजर ती दंग गुंग होणार ऽऽ ॥
हिज संगे—
करिता क्रीडा तोडिता विडा
हातीचा चुडा खास पिचणार ऽऽ ॥
एकान्ती—
चंद्र पुनवेत घेता कवेत
ढगा समवेत चंद्र दडणार ऽऽ ॥
करताना
शृंगारचेष्टी देईल पुष्टी
बोलता गोष्टी रात्र सरणार ऽऽ ॥
जोबन भार—
हिचा भरदार स्पर्श उबदार
मदन सरदार 'गार' होणार ऽऽ ॥

—सुरेश जगताप

७ आसिपत्र, ८ सूकरमुख, ९ अंधकूप, १० कृमिभोजन, ११ सदंश, १२ तप्तसूर्मी, १३ वज्रकंटक, १४ शाल्पली, १५ वैतरणी, १६ पुतोद, १७ प्राणरोध, १८ विशसंव, १९ लालाभक्षक, २० सार्मेयादन, २१ अवीची, २२ अयःपान, २३ क्षारकर्दम, २४ रक्षोगणभोजन, २५ शूलप्रेत २६ दर्दशक, २७ अवरोध, २८ पर्यावर्तन व २९ सूचीमुख. 'मानव भूतलावर राहात असताना जी बरीवाईट कृत्ये करतो त्यास अनुसरून कोणत्या तरी एका नरकाची प्राप्ती त्याला होते आणि तेथील यातना त्याला भोगाव्या लागतात.' (प्रभुदेसाई-कृत 'देवीकोश' – भाग २ रा) यावरून असे दिसते की पुढे यालाच नैतिकतेचे अवगुंठन लाभले. नराचा नारायण किंवा नराधम होऊ शकतो. नराधम हा नरकाचा धनी झाला आणि नारायण स्वर्गाचा. याचे मूळ नरकासुराशी असावे.

## पितृदर्शन

नृपश्रेष्ठ जनकराजाने गौतम महर्षीद्वारा चिरंजीवावर आर्यधर्माप्रमाणे विधिवत संस्कार करवले. मनुष्य मस्तकावर मस्तक न्यस्त केले म्हणून मुनी गौतमाने पुत्राचे नाव नरक ठेवले.

'नरस्य शीर्षे स्व शिरो निधाय
स्थितवान यतः।
तस्माद् तस्य मुनिश्रेष्ठो नरकः
नाम बैव्यधात्॥

अशा रीतीने जनकाने सोळा वर्षे होईपर्यंत नरकाचे प्रतिपालन केले. या अवधीत त्यास नीतिशास्त्र धनुर्युद्ध, गदायुद्ध वगैरे शिक्षण मिळाले. हृया सर्व ज्ञानार्जनात तो इतर राजपुत्रांपेक्षा सरसच राहिला. केवळ सोळा वर्षाचा असूनही तो वीरवर्गात अजय राहिला. नरकाचा हा प्रभूत पराक्रम व अन्य राजपुत्रांना हीनवीर्य केलेले पाहून विदेहाधिपती पण विशेष सुखावले नाहीत. कालक्रमानंतर हा महावीर आपल्या इष्टपुत्रांना निराश करून राज्यग्रहण करील अशी त्यांची भावना झाली. इतर राजपुत्रांना पाहून विदेहापती जितके प्रफुल्ल होत तितके नरकास पाहून होत नसत. राजमहिषीने ही त्यांची मनःस्थिती ताडली. त्यांनी चितेचे कारण विचारता राजाने तीन महिन्यांचा वेळ मागून घतला. नरकमाता वसुंधरेस हृया तीन महिन्यांचा अर्थ उमगला; कारण या अवधीत नरक सोळा वर्षाचा होणार होता. विदेहाधिपती जनक राजा व महामुनी गौतम यांची एकांतात एकत्र गाठ घऊन वसुंधरेने पुत्राचे योग्य परिपालन करून, त्याला राजपुत्रास अनुरूप केले, हृयाबद्दल आभार मानले आणि पूर्व योजनेनुसार मार्गक्रमणा करण्याच्या अनुरोधाने नरकासह प्रच्छन्नरूपाने जाण्याची आज्ञा मागितली. अनार्य राजपुत्र आर्यपुत्रापेक्षा सरस ठरावा ही गोष्ट आर्यवंशीय राजास अस्वस्थ करण्यासारखी होती. पण १६ वर्षे प्रतिपालन करण्याचे वचन दिल्यामुळे गौप्यस्फोट होऊ न देण्याची त्याला काळजी असावी. अनार्य महिला वसुंधरा हुषार खरीच. म्हणूनच योग्य वेळी तिने नरकास आपल्यासह गंगागमन करण्यास आवाहन केले. परन्तु पिता जनक व गुरुपुत्र शतानन्दाची आज्ञा मिळेपर्यंत न येण्याचा नरकाने आग्रह धरला, तेव्हा पृथ्वीने नरकास त्याच्या जन्माचे रहस्य सांगितले व गंगाकिनारी आल्यास त्याच्या खऱ्या पित्याची म्हणजे जगत्प्रभू महात्म्याची भेट घालून देण्याचे आश्वासन पण दिले. आर्यधर्म स्वीकारण्यास तयार असलेल्या मातेस आर्यांच्या छळाची झळ लागलेली होती. म्हणून पुत्रास त्याचे जन्मरहस्य उघड करून सांगण्यासाठी तिला गंगाकिनारी रात्रसमयी जाणे भाग पडले असावे. एवंच, रथत्याग करून नरक माता वसुंधरेसह गंगाकिनारी गेला.

'न ते पितायम् जनको यः सर्वजगताम्
प्रभुः।
स ते पिता तम् गंगायाम् पश्य गत्वा मया
सह॥

गंगाकिनारी पोहोचल्यावर वसुंधरेने नरकास तो खरा वराहदेवाचा पुत्र कसा व यज्ञभूमीत जन्म झाल्यानंतर विदेहाधिपतीस कोणत्या शर्तीवर अर्पण केला याचे सविस्तर वर्णन इत्थंभूत सांगितले. अर्थात् नरकाचा हृया गोष्टीवर विश्वास बसला नाही व स्वतः महाप्रभू विष्णू प्रकट होऊन खात्री दिल्याशिवाय विश्वास पटणार नाही.







असे म्हणाला. नरकाच्या मनातील संदेहाचे निरसन करण्याकरिता जगत्पती विष्णूंनी दर्शन द्यावें म्हणून पृथ्वीने प्रार्थना केली.

स्मृतमात्रस्तदा क्षित्यामाधवो गरुडध्वजः।
प्रसंतो जगताम् नाथः प्रत्यक्षत्वम् मतस्तदा ॥

तत्समयी गरुडारूढ माधव प्रसन्नवदनाने प्रगट झाले. सर्वदेव ईश्वर नारायणास पाहताक्षणी आपली प्रतिज्ञा पालन करावी अशी प्रार्थना वसुंधरा पृथ्वीने केली. नरकास उत्तम राज्य दिले आहे असे सांगून पृथ्वी व नरकासह भगवान विष्णूंनी रातोरात गंगेत प्रवेश केला. यथासमय तिघेही कामरूप देशातील प्राग्ज्योतिषपूर स्थळी पोहोचले. जेथे कामाक्ष्यादेवी नायिका होती तोच देश (आजचा गौहत्ती) महाप्रभूने नरकासाठी राखून ठेवला होता. तेथे अत्यंत कर्कशकाय किरातगणांचे वास्तव्य होते. त्यांच्या राजाचे नाव घटक. तो अत्यंत वीर्यवान, सुवर्णस्तंभ सदृश्य आणि अग्निप्रमाणे प्रदीप असा होता. महाबली नरकास नारायणासह पाहताच किराताधिपती घटकाने त्यांच्यावर चतुरंग सेनेसह आक्रमण केले. नरक व घटक यांच्यामध्ये तुंबळ युद्ध माजले व अखेर नरकाने भल्लनामक अस्त्रानिशी घटकाचा शिरच्छेद केला. नरकाने किरातांचा अपहार केला. व विष्णूने नरकास प्राग्ज्योतिषपूरचा राजा म्हणून अभिषिक्त केले. हे राज्य करातोया नदीपासून ललितकान्ता देवीच्या स्थानापर्यंत पसरलेले होते. ह्याच ठिकाणी ब्रह्मयाने पूर्वी प्राङग नक्षत्राचा परित्याग केला म्हणून ह्या इन्द्रपुरीसमान पुराचे प्रागज्योतिषपूर असे यथार्थ नांव पडले.

अस्य मध्ये स्थितो ब्रह्मा प्राङग नक्षत्रम्
ससर्ज ।
ततः प्राग्ज्योतिषाख्येयम् पुरी शत्रुपुरी
समां ॥
अत्र त्वम् वस भद्रम् ते अभिषिक्तो मया
त्वयम् ॥
कृतदारः सहामात्ये राजा भूत्वा महाबलः॥

त्यानंतर स्वतः विष्णूनी विदेह कन्या माया हिस वधू निश्चित केली व विवाहसमारंभ यथासांग पूर्ण करून दोघांनाही राज्याभिषेक केला. किरात राजाचे हस्ती प्रभृती सैन्य अश्व, भूषणे व किरातध्वज देऊन सर्वशक्ती विनाशिनी शक्ती पण दिली. ही शक्ती देताना त्यास ताकीदही दिली "मनुष्यावर निक्षेप करू नकोस— वैदेही माया, तू जोपर्यंत सद्वर्तनी आहेस तोपर्यंत तुझ्याजवळ राहील. त्रेतायुगात पुत्रासाठी प्रयत्न कर. द्वापार युगाच्या शेवटी पुत्र होईल. ब्राह्मण मुनिवर्ग व देवगणावरोबर विरुद्धाचरण करू नकोस. मी आदेशिलेल्या नियमाविरुद्ध आचरण केल्यास तुझा प्राण नष्ट होईल. ह्या नियमांचे अवधानपूत प्रतिपालन कर."

नरकाच्या राज्याभिषेकानंतर विदेहाधिपती राजा जनक आप्तेष्टांसह प्राग्ज्योतिषपुरी राजा नरकास भटण्यास आले व त्याचे ऐश्वर्य पाहून समाधान पावले.

**नरक चरित्र**

दीर्घायुषी नरकाने बराच काळ आर्यांच्या प्रथेनुसार राज्य केले. तेव्हां ते निष्कंटक व निर्वैर होते व संघर्ष उरला नाही. पुढे त्याची शोनितपूरच्या (आजच्या तेझपूर) राजा वाणासुराशी मैत्री झाली. या मैत्रीपूर्वी नरक देवभक्त होता. राज्यभोग व ऐश्वर्याने तो भोगलोलुप बनला.

वाणासुराशी ह्या टप्यावर त्याची मैत्री झाली. वलीपुत्र वाणासूर हा अत्यन्त बलवान राजा शिवाचा भक्त होता. अकूताच्या भयाने वाणाने असूर न्याय विचरण करण्यास आरम्भ केला व त्याच्या संसर्गाने नरकानेही असूरभाव अनुसरण सुरू केले. यज्ञज्ञानादी धर्मकार्ये पूर्ववत करणे बंद केले. पृथ्वी आणि कामाक्ष्या देवीची भक्ती सोडली. एवढ्यात ब्रह्मपुत्र वसिष्ठ मुनीस कामाक्ष्या देवीचे दर्शन घेण्यासाठी प्रागज्योतिषपुरात प्रवेश करू दिला नाही. हे वसिष्ठ मुनींच्या क्रोधास बलवत्तर कारण झाले व त्यांनी पापात्मा नरकास शाप दिला की ज्या वराहदेवाचा तो पुत्र आहे तोच महात्मा त्याचा विनाश करील. जोपर्यंत नरक जिवंत राहील तोपर्यंत जगज्जननी कामाक्ष्यादेवी अंतर्धान पावेल. वसिष्ठमुनी स्वस्थानी परतले व नरकासूर नीलकूट पर्वतावरील कामक्ष्यादेवीच्या मंदिराकडे गेला; पण तेथे त्यास देवीचे योनीमंडळ दृष्टीस पडले नाही. माता वसुंधरा व पिता विष्णूची प्रार्थना करूनही दोघांचेही दर्शन झाले नाही. देवी माया पण अंतर्धान पावली. नगरात यज्ञक्रिया व उत्सवही झाले नाहीत. राज्यात विप्लव उत्सव झाले व लोक नाश पावले. लोहित्य

**अतितप्त साहित्यिक**



'गेरा'गबाळांचे उपद्व्याप





नदी शुष्कप्राय झाली. ब्रह्मशापाने मरण अतिनिकट आले. काळ घोर ठरला या भीतीने नरकासूर शोकाकुल झाला व अखेर प्राणप्रिय मित्र बाणासुराकडे धावला. त्यास ब्रह्मशापाची कहाणी सांगता झाला. बाणासुराने त्यास उपदेशिले की-शोक करणे वीरोचीत नाही. दुःख झाल्यावर त्याचा प्रतिकारच मंगलजनक होय. उदासीनता पुरुषार्थाचे लक्षण नव्हे. अशा रीतीने बाणासुराने नरकासुरास प्रतिकारार्थ व तदर्थ ब्रम्हदेवाची प्रार्थना करण्यास उद्युक्त केले. या अनुषंगाने नरकाने ब्रम्हपुत्र लोहित्य नदीच्या किनारी ब्रम्हाची आराधना करण्यास प्रारंभ केला—व अनेक वर्षे व्रताचरण केले. ब्रम्हदेव नरकाच्या सुव्रत उपासनेने संतुष्ट झाले व नरकास वर. मागण्यास सांगितले. सुरासुर व देवयोनीपासून अवध्यता, अविच्छिन्न संतान, अखंड ऐश्वर्य व अधिपत्य, रूपगुणसंपन्न स्त्रियांचे पतित्व असे वर नरकाने प्राप्त करून घेतले. रूपगुणसंपन्न स्त्रियांच्या बाबतीत वर देताना ब्रम्हाने नरकास जाणीव दिली की उक्त स्त्रियांमध्ये एक सुरकन्या असेल. तिच्याशी नारदमुनी तुझ्या पुरात येईपर्यंत संभोग करता कामा नये. नरकाने एकंदरीत त्याच्या दृष्टीने सर्व बाजूने सुरक्षित असे वर मागून घेतले खरे पण एक वर मागण्यास तो विसरला व मुनी वसिष्ठांचा शाप अबाधितच राहिला.

बलिपुत्र बाणासूर नरकाची ही कहाणी ऐकून विशेष आनंदला नाही व जे वर नरकाने प्राप्त केले त्याची परीक्षा पाहण्याचा उलट उपदेश केला. मातेशी आर्यांनी वैर धरले ही गोष्ट तरुण नरकास जाचली असणे अशक्य नाही. त्याच्याच प्रमाणे असुरधर्मी बाणासुराशी संसर्ग होताच आर्यांवर आपला राग काढण्यास तो पेटला असल्यास नवल नाही.

## पुत्रोत्पत्ती

कालक्रमाने नरकासुरास भगदत्त, महाशीर्ष, मदवान् व सुमाली नामक चार पुत्र झाले. हे सर्वच बलवान व दुर्दमनीय ठरले. भगदत्ताने पुढे भारतीय युद्धात कौरवांच्या बाजूने शौर्याने भाग घतला ह्याचे महाभारतात सरस वर्णन सापडते. बाणासुराने उपदेशिल्याप्रमाण नरकाने हयग्रीव, मुरू, सुन्द, निसुन्द, विरुपाक्ष इत्यादी शूर असूर सेनानींना आपल्या दरबारी नियुक्त केले. पूर्व परिचित मनुष्यभाव परित्याग करून त्याने असूरभाव धारण केला व देवदेवताना पीडा देऊ लागला. इन्द्रासही त्याने उपद्रव देण्यास आरम्भ केला व अदितीचे कुण्डलद्वय हरण केले. १६००० मनोहारिणी देव व गंधर्वकन्या हिमम्य पर्वतावर क्रीडा करताना भूमीपुत्र नरकाने पाहिल्या आणि तो लोभावला. हयग्रीवाच्या साहाय्याने त्याने त्यांचे अपहरण केले प्रागज्योतिषपुरास नेऊन अलकानगरीमध्ये नजरबंद केले. प्रागज्योतिषपुरात नारदमुनी येईपर्यंत संभोगाविषयी निवृत्ति ठेव ही ब्रम्हदेवाची आज्ञा मनी बाळगून तो निवृत्त मात्र राहिला. वरुणाचे जलवर्षक छत्र व मंदिराचलाचा मणिपर्वत त्याने छिनून घेतला. अर्थातच तो आता आर्यांना जड झाला व इन्द्राचा ऐरावत हिरावून घेण्यापर्यंत जेव्हा त्याची मजल जावू लागली तेव्हा घाबरलेला इन्द्र द्वारकेस कृष्णदर्शनासाठी पोचला व चिरंजीवी नरकासुराच्या दुराचरणाचा इतिहास कथन केला विष्णू आणि पृथ्वी मातेची अवज्ञा करून पूर्वीचा व्रतशील नरक वर्तमानात कसा असूरभाव धारण करून सर्वांना म्हणजे अर्थात आर्यांना पिडीत आहे याचे साग्र व सविस्तर वर्णन इंद्राने केले. देव व गंधर्व कन्यांचे कसे अपहरण केले हे सांगताना इंद्राने; नारदमुनी येईपर्यंत नरकाने संभोग कां वर्ज्य केला हे वर्मही स्पष्ट केले. त्याच्या विनाशासाठी इंद्राने माधवाला प्रागज्योतिषपुरास जाण्यासाठी पाचारण केले. कृष्ण सत्यभामेसहित गरुडावर आरूढ होऊन प्रागज्योतिषपुरास रवाना झाले. त्याचसमयी नारदमुनी प्रागज्योतिषपुरात उपस्थित झाले. नरकाने देवकन्येशी संभोग करण्यासंबंधी विचारपूस करता नारदाने उपदेश केला की 'शुक्लपक्षातील नवमीपर्यंत त्यास महाविपद आहे, त्यानंतर चतुर्दशीस ह्या स्त्रिया जर चारूतेने ऋतुस्नाता झाल्या तर त्यांच्याशी रत होण्यास बाधा राहणार नाही.' नरकासूर भयभीत झाला व त्यान पुराच्या रक्षणार्थ बंदोबस्त प्रारंभिला. त्याच सुमारास गरुडध्वज कृष्ण प्रागज्योतिपपुराच्या पश्चिमद्वारी पोहोचले. कृष्ण व असूर यांच्यात घनघोर युद्ध जुंपले व त्यांचा पूर्ण पराभव झाल्यानंतर प्रागज्योतिषपुरात कृष्णाने प्रवेश केला. सर्व असूर पतन पावलेले पाहून नरक युद्धास उद्युक्त झाला. गरुडारूढ शंखचक्र गदाधारी, किरीटकुंडल विभूषित कृष्णाबरोबर त्याने युद्ध आरंभिले. सुदर्शन चक्रद्वारा हरीने नरकासुरास द्विखंड केले व तो भूमीवर निचेष्ट पडला. पुत्रास भूमीवर पडलेला पाहून पृथ्वी वसुंधरा उपस्थित झाली व गोविंदास आदितीची कुंडले देऊन म्हणाली,

सोऽयम् त्वयैव दत्तो मे त्वयैव विनिपातितः।
गृहाण कुण्डले चे मे पालयास्य च संततिम् ॥

**—विष्णु पुराण**

दत्तस्त्वयैव गोविंद त्वयैव विनिपातितः।
इये ते कुण्डले देव प्रजातस्यानु पालय ॥

**—हरिवंश—विष्णुपर्व**

राजपुत्र भगदत्तास राज्याभिषेक करून माधव इंद्रलोकास आदितीची कुण्डले परत करण्यास रवाना झाले.

पूर्व भारतातील अनार्य जनतेच्या आर्यकरणाच्या प्रक्रियेची प्रारंभीची ही एक ऐतिहासिक पण पारंपारिक कथेतील घटना असावी. विष्णूने प्रारंभिलेल्या या प्रयत्नांना इतर आर्यांनी विरोध केला असावा. पृथ्वी वसुंधरासारख्या स्त्रीला ह्या विरोधाची झळ लागली व तिच्या पुत्राने खरा इतिहास समजल्यानंतर आर्यांचा प्रतिकार केला हाच बोध नरकासुराच्या इतिहासावरून निघतो. आर्यांचे शिक्षण ग्रहण केलेल्या व प्रारंभी आर्यधर्माप्रमाणे व्रताचरण करणाऱ्या नरकाने असूर मित्र जोडल्यावर आर्यांच्या अतिरेकावर आपला राग काढलेला असावा. ही मनुष्यवृत्तीस साजेल अशीच कहाणी आहे. सर्व आर्यांनी एकत्र होऊन त्याचा युद्धात संख्येच्या जोरावर पाडाव केला व त्यास यमसदनी पाठवले एवढ्यावरून नरकासुराचा नरकाशी सम्बन्ध जोडावा ही कल्पना तरी मनावर बिंबत नाही. किंबहुना ती कोती वाटते. तिबेटी—बर्मन जमातींचे हे आर्यकरण युगायुगातून सतत चालूच राहिले आणि तदर्थ आजची आसामीय जनता बव्हंशी तिबेटी—बर्मन जमात व आर्यांची जात यांची मिश्रित अशी झाली आहे. • • •







अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

(पान १२८ वरून—स्वगत)

गेल्या तीन वर्षांत २६ नाटके, सहा लघुकथासंग्रह, पाच ललितलेख संग्रह, तीन कविता संग्रह आणि दोन एकांकिकांचे संग्रह अशी माझी ४२ पुस्तके झाली. काही काही प्रकाशकांनी माझी पुस्तके पाचुंद्याने घेतली आणि सवलतीच्या योजनेखाली प्रसिद्ध केली. समाधानाची गोष्ट म्हणजे माझ्या पुस्तकांचा आणि त्यांचा लेखक म्हणून माझा खूप बोलबाला झाला. साऱ्या वर्तमान-पत्रांतून माझ्या पुस्तकांवर व नाटकांवर अभिप्राय आले. हुकमी अभिप्राय अर्थात चांगले होते; परंतु काही काही समीक्षक जातीवर गेले. माझ्या बहुप्रसवतेमुळे जणु त्यांचीच कंबर ढिली झाली असा आव आणून मला "जरा आस्ते कदम" असा त्यांनी इशारा दिला. परंतु माझ्या दृष्टीने अभिप्राय काय असणे, कसा असणे, याच्यापेक्षा तो निश्चितपणे येणे हे महत्त्वाचे. एखाद्या प्रसिद्ध दैनिकात एखाद्या नामवंत समीक्षकाने आपल्या नाटकावर लिहिणे हेही माझ्या दृष्टीने थोडके नव्हते. माझा या साऱ्या खटाटोपामागील उद्देश एकच. आपले नाव वाचकांच्या समोर सतत राहिले पाहिजे.

आतापर्यंत मी ३२ पुस्तके लिहिली. नाटकांचे नसले तरी पुस्तकांचे रौप्य-महोत्सव, सुवर्ण-महोत्सव, हीरक-महोत्सव करीत करीत १४८ पुस्तकांचे लक्ष्य गाठण्याचा माझा संकल्प आहे. येत्या दोन चार वर्षांतच मी तो पुरा करणार आहे. खरं म्हणजे १४८ या आकड्याला तसा काही विशेष अर्थ नाही. रामन राघवला ४२ खून करावेसे वाटले ते ४२ या आकड्याला काही अर्थ होता म्हणून नव्हे. कदाचित् रामन राघवप्रमाणे मलाही 'वरून कानूनचा हुकूम' आला असे फार तर समजा.

मी इतके विपुल साहित्य कसे लिहू शकतो हा मराठी साहित्यां-तील आजचा मोठा चर्चेचा विषय होऊन बसला आहे. माझ्या या असामान्य कर्तृत्वामुळे बरेच बिनीचे साहित्यिक हवालदील झाले आहेत. काहीना पोटशूळ झाला आहे. काही मत्सराने जळायला लागले आहेत. "हुं. त्यात काय झालं ? कागदाचा व्यापारीच तो. त्याचे लेख छापणे संपादकांना भागच पडते. प्रकाशक त्याची पुस्तके न छापून सांगतात कुणाला ? पैसा ओतल्यावर नाटक काय कुणीही बसवील." अशी टीका काही नतद्रष्ट करताना दिसतात. परंतु या लोकांना एवढं कळत नाही की छापून येण्यापूर्वी लिहावं लागतं. आणि ते मी स्वतः लिहितो—स्वतःच्या हाताने लिहितो. विपुल लिहिणाऱ्या लेखकाचे लिखाण गुणवत्तेच्या दृष्टीने हिणकसच अस-णार अशा कावीळ झालेल्या दृष्टीने माझ्या लिखाणाकडे अकारण पाहिले जाते. बहुप्रसव किंवा सहजप्रसव लेखकाचे हेच दुर्दैव असते. जणू कण्हत कुंथत वर्षाकाठी आठ दहा कथा किंवा एखादे नाटक लिहिले म्हणजे जन्माबरोबर ते गुणवत्ता घेऊनच येते.

आता एवढे मात्र कबूल केले पाहिजे की घाईत लिहिताना आणि घाईघाईने ते प्रसिद्ध करून घेताना शुद्ध लेखनाकडे नाही म्हटले तरी दुर्लक्ष होते. ऱ्हस्व दीर्घांची उलटापालट होते. चुकीचे वाक्प्रयोग

आणि उपमा उत्प्रेक्षा तशाच राहून जातात. कधी कधी 'काळाकुंतल केशकलाप' असे मी लिहून जातो आणि टीकाकार मला कुंतल आणि केश यांतील साधा फरकही कळत नाही म्हणून माझी हजामत करतात. 'कौमुदीच्या धवल चांदण्यात ती न्हाऊन निघत होती' असा वाक्प्रयोग मी करून जातो आणि कौमुदी म्हणजेच चांदण एवढे समजण्याइतकीही मला अक्कल नाही म्हणून हे टीकाकार स्वतःची अक्कल पाजळतात. साहित्य प्रसवताना भाषेच्या ओघाला महत्त्व असते. या ओघात वहात येणाऱ्या असल्या क्षुल्लक दोषांना नसते हे या भाषापंडितांना कोण सांगणार? नाटकाच्या कथासूत्रात एखादे पात्र येते आणि मग कथा पुढे सरकत असताना ते माग पडते, इतके मागे पडते की ते पुढे रंगभूमीवर कधी येतच नाही; परंतु नाटकात आलेली पात्रे शेवटपर्यंत रंगभूमीवर तळ ठोकून बसली पाहिजेत असा यांचा आग्रह का? प्रत्येक लेखकाचे काही लाडके शब्द, आवडते वाक्प्रयोग, ठरलेली प्रतीके असतात. ती साहित्यात किंवा नाटकात पुन्हा पुन्हा आली म्हणून यांचे डोके कां उठावे? एकच टाइप फार वापरावा लागतो म्हणून फार तर छापखानेवाल्याने तक्रार करावी किंवा तेच तेच शब्द सर्वत्र विखुरल्यामुळ 'क्यू' मिळताना अडचण पडते म्हणून नटांनी तक्रार करावी.

साहित्य म्हणजे शब्द. माझे सारे साहित्य शब्दमय आहे. प्रत्येक शब्दाला अर्थ असतो असे मानले तर माझ्या साहित्यालाही काही अर्थ असला पाहिजे. परंतु माझे साहित्य म्हणजे 'निरर्थक शब्दांचा फाफटपसारा' 'नुसता शब्दजंजाळ' 'शब्दांची उधळपट्टी' अशी टीका झाली. होवो बापडी. मी आपला रोज नियमाने लिहिणारा लेखक आहे. 'दिसामाजी काही तरी ते लिहावे' हा रामदासांचा हितोपदेश प्रत्यक्षात उतरविणारा माझ्यासारखा दुसरा समर्थ लेखक मराठी सारस्वतात नाही. मी दिवसाकाठी काहीना काही तरी लिहितो. परंतु माझे टीकाकार समर्थांचाच श्लोक उद्धृत करून मी दिसामाजी 'काहीतरीच' लिहित असतो अशी कुचेष्टा करतात. मी शपथपूर्वक सांगतो की हवी तरी आणखी शंभर नाटके लिहिण्याइतके मजजवळ लक्ष लक्ष शब्द आहेत; परंतु या दुर्धर टीकाकारांवर लाखोली वाहण्यासाठी मजजवळ शब्द नाहीत.

भवभूतीप्रमाणे काल निरवधि आणि पृथ्वी विपुला आहे असे मला वाटत नाही. उलटपक्षी टेनिसनप्रमाणे काल थोडा आणि कला मोठी अशी माझी धारणा आहे. म्हणूनच रात्र थोडी असल्यामुळे जितकी सोंगे सजविता येतील तितकी मजविण्याचा मी प्रयत्न करतो. आता कुणी असा सवाल करील की तुमचे एवढे विपुल साहित्य वाचकांना वाचणे कसे शक्य आहे? डिझरायलीने एके ठिकाणी म्हटले आहे की मला जेव्हा चांगलेसे पुस्तक वाचावेसे वाटते तेव्हा मी ते स्वतःच लिहून काढतो. डिझरायली स्वतःला वाचण्यासाठी तरी पुस्तके लिहीत होता. मी माझी पुस्तके स्वतःसुद्धा वाचत नाही—म्हणजे छापली जाताना किंवा छापली गेल्यावर. असे म्हटल्यावर इतरांनी माझे साहित्य वाचलेच पाहिजे असा आग्रह मी कशाला धरू? मी जे लिहितो ते इतरांनी वाचावे म्हणून नव्हे तर लेखक म्हणून मला मिरविता यावे म्हणून. माझा हा हेतू साध्य झाला आहे. आता माझे साहित्य कुणीच वाचत नाही म्हणून प्रकाशकांनी माझ्या डझनावारी पुस्तकांचे गठ्ठे माझ्या बोडक्यावर आणून मारले तर तीही जबाबदारी मी शिरावर घेण्यास तयार आहे. मी सरळ नव्या कागदाच्या दुकानाला जोडून जुन्या कागदाचे—रद्दीचे दुकान थाटीन! • • •

# जिणे न माझे लाजिरवाणे

—प्रभाकर अत्रे

...आम्ही पटगृहात प्रवेश केला मात्र, साऱ्यांच्या नजरा
आमच्यावर खिळल्या —त्या अनुभवीत असताना
मनात विचार येई, 'स्वर्ग स्वर्ग म्हणतात
तो हाच तर नसेल ? '—





फ्रँकॉट टोन

टॉम नील

जेम्स कॅग्ने

गॅरी कूपर

फ्रँक सिनात्रा

ग्रेगरी पेक

सत्य हे कल्पिताहूनही चमत्कृतीपूर्ण असतं हेच खरं ! ते एकरंगी, एकढंगी, एकसुरी असत नाही. त्यामुळेच पाऱ्यासारखे असणारे हे मानवी जीवन शब्दात पकडण्याची शब्दसृष्टीच्या ईश्वराची धडपड वर्षानुवर्षे चालू असूनही त्यांना "अवघे जीवन" शब्दांकित करणे शक्य झालेले नाही. जीवनाप्रमाणेच जीवनाच्या कादंबरीला–चरित्र, आत्मचरित्रालाही एक रंग, एक सूर नसतो. त्यामुळेच काही चरित्रे, आत्मचरित्रे कादंबरीलाही लाजवतात.







अनुक्रमणिका

अशीच एक सुरस, सुरम्य कादंबरी अलिकडेच वाचनात आली. त्या कादंबरीची नायिका आहे हॉलिवुडची एक विख्यात चित्रतारका! आता माजी चित्रतारकाच म्हणायला हवं. त्या नायिकेचं नाव आहे **बार्बारा पेटन**! मुक्त जीवन हाच जेथे धर्म मानला जाऊ शकतो अशा हॉलिवुडच्या चित्रपुरीशी तिचा ऐन तारुण्यातच संबंध येतो आणि मग जीवनाला लाभतात विविध स्तर! हे स्तर केवळ लैंगिक अनुभवांचे नाहीत, प्रीतीचेही आहेत, करुणेचे आहेत तसेच काही मानसशास्त्रीयही आहेत. उपभोगाचे आहेत, तसेच कर्मभोगांचेही आहेत. आणि हे सारे भोग भोगून उरतात फक्त अनुभव–बरे वाईट! त्यातून गवसतो काही अर्थ! पण त्या अर्थाकडे तटस्थतेने पाहणे सान्यांनाच जमते असे नाही. त्याला मनाची एक आगळी बैठक लागते. मुक्त मन लागतं. स्वतःबद्दल सुद्धा कठोर होण्याची किमया साधावी लागते–लौकिक लाज-लज्जा-भीती यांची स्वतःच्याच मनाने निर्माण केलेली कुंपणे मोडून फेकण्याची तयारी करावी लागते. म्हणूनच पुष्कळदा आत्मचरित्रे वाचताना कादंबरीचा आभास निर्माण होतो. हे आत्मचरित्र वाचत असताना सापडलेली तटस्थता मला महत्त्वाची वाटते. जीवनातले उत्तम व अधम, मंगल आणि अमंगल, आनंदमय व यातनामय अशा साऱ्याच प्रसंगाकडे ती 'ना खंत ना खेद' ह्या भूमिकेने पाहू शकली आहे हे महत्त्वाचे. बेताल मी, बेधुंद मी (एरॉल फ्लिन्) प्रीत पिऊनिया मीही रिती (नोरा ॲडिंग्टन–एरॉलची एकेकाळची पत्नी) ह्या आत्मकथांप्रमाणेच हीही आत्मकथा रसिक वाचकांना आवडेल हा विश्वास!!

## ही तर नांदी...

१९५० साल असेल. तेव्हा मी प्रसिद्धी व कीर्तीच्या शिखरावर होते. अभिनयगुणांना मोल होते. ते सप्ताहाला १०,००० डॉलर्स येवढे मोठे होते. मला सतत मागणी होती. ग्रेगरी पेक, गाय मेडिसन ह्यांच्यासारखी नामवंत कलाकार मंडळी माझ्या सहवासाची मागणी करीत होती. माझ्या बारीक सारिक हालचालींना प्रसिद्धी दिली जात होती. अशीच एक जाहिरात मला आठवते. "बार्बारा ही जवळजवळ नग्न अवस्थेत सूर्यस्नान करते ह्याबद्दल एका न्यायाधीशाची तक्रार" असा तिचा मथळा होता. 'बार्बारा' ह्या अपूर्ण नावाने बार्बारा कोण हे लोकांना कळू शकत होते. लोकप्रियता, पैसा, वैभव, गडी-नौकर आणि नामवंत आणि कीर्तीवंत कलाकारांचा सहवास हे सारं मला लाभलं होतं. त्यावेळी माझ्या जीवनमार्गावर जणु फुलंच फुलं पसरलेली होती. काटे कमी.

आज मी माझ्या मित्राच्या खोलीवर राहते. काही उरलं नाही. शरीराच्या वजनमापांची आता मला क्षिती नाही. मी कशी दिसते ह्याचा विचार मी करीत नाही. आरसा पाहणे मी सोडून दिलं आहे. भरपूर मद्य पिते. मागील येणं, कविता व पुरुषसहवासाचे लाभणारे मोल यातून भाडे भरण्यापुरते पैसे मिळतात. मला आज निग्रो माणसे आवडतात. फक्त त्यांचाच पैसा मी घेते.

माझं हे आयुष्य जाणून घ्यायचं असेल तर विलासी स्वप्ननगरीपासून तर भयाण भूतनगरीपर्यंत भटकावं लागेल. खरं सांगू? खरं तेच सांगेन असं म्हणत मी सांगायला बसले खरी. पण तसं तं अघडच, नाही का?

पायपर लॉरी, मोना फ्रीमन, डेबी रेनॉल्डस्, मॅला पॉवर्स व बार्बारा बेटस् ह्यांच्या बरोबरच सहावी गुणी बालनटी म्हणून माझं नाव वृत्तपत्रात झळकत होतं. मी सुंदर होते. माझं सौंदर्य मादक होतं. शाळकरी पोरं स्वाक्षरीसाठी आणि निर्माते शय्यासोबतीसाठी धडपडत होते. मोठ मोठ्या नटी म्हणत होत्या "तुझ्या यशाचा मार्ग गुलाब पुष्पांनी सजला आहे." यशाचा कैफ चढतो. गंधाने मन धुंद होतं हेच खरं!

वायुदलातील कॅप्टन जॉन **पेटन** ह्याने लग्नानंतर मला विचारलं, "मधुचंद्रासाठी कुठे जाऊ या?" मी तडक उत्तर दिलं "हॉलिवुडला!" एकाच माणसाबरोबर रुक्षतेने, बाळबोध आयुष्य काढण्याची कल्पना मला मान्य नव्हती. पण कॅप्टन पेटनच्या व्यक्तित्वाने मी भारावून गेले होते 'शरीरसंबंध' ही एक अननुभूत गोष्ट होती. मी तरुण होते. मोहक होते. अखेर शरीरांच्या संबंधातून जे घडायचे तेच घडले. मला दिवस गेले. मला चीड आली. जॉनने मला जणु बंदिस्त केले आहे अशी जाणीव झाली. मी त्याला परत जायला सांगितले. गर्भाचे दायित्व मला अडचणीचे वाटले नाही. मी घटस्फोट घेतला. मला चित्रतारका व्हायचं होतं. पण जॉन पेटनने एका नृत्यप्रसंगी लांड्या फ्रॉकात आपल्याला पाहिले नसते तर आपल्याला हॉलिवुड काही दिसले नसते असे मला वाटते. तेव्हा चित्रतारका व्हायचं असलं तर मुलींनो, लांडे फ्रॉक घालून नृत्य करा!

माझ्या आयुष्यातला सर्वात रोमहर्षक प्रसंग कोणता बरं सांगू? सांगते.

**जिमी कॅग्ने**बरोबरच्या एका फार मोठ्या चित्रपटाची दुसऱ्या दिवशी सुरुवात व्हायची होती. आदल्या दिवशी मी **फ्रॅंकॉट टोन**बरोबर एका ऑपेराला गेले होते. आम्ही पटगृहात प्रवेश केला तेव्हा साऱ्यांच्या नजरा आमच्यावर खिळल्या...कामे थांबली. साऱ्यांच्या त्या रोखलेल्या नजरा पहात असताना मनात विचार येत होता, "स्वर्ग स्वर्ग म्हणतात तो हाच तर नसेल?"

त्यानंतर सतत यश, पैसा, कीर्ती, नवे नवे करार, अधिकार, आणि नवे नवे रोमान्स आणि उज्वल भवितव्याची रमणीय स्वप्ने! बस्स! दुसरं काही नाही. तुमचा विश्वास बसणार नाही. मला ठाऊक आहे ते. तुम्ही मला मूर्खही म्हणाल. पण ते सत्य होते.

आणि आज––

खूपशा रिकाम्या बाटल्या. पडक्या भिंती, गळके छप्पर, मोडकेतोडके व तोकडे फर्निचर. नाही म्हणायला एक सोनेरी नक्षीकाम केलेली खुर्ची आहे. पडेल ती किंमत देऊन मी ती जपणार आहे. ती माझी सखी आहे. तिच्या सहवासामुळेच तर मला माझ्या सुखद स्मृती जपता येतात.












अनुक्रमणिका

मला एक मुलगा आहे. मोठा गोड पोरगा आहे. जर्मनीत शिकतो. माझं त्याच्यावर खूप खूप प्रेम आहे. त्याने माझा अभिमान बाळगावा अशी माझी मनोमन इच्छा आहे.

हॉलिवुडला मला चित्रपटात कामे मिळत होती. पण म्हणावे तसे यश–प्रसिद्धी मिळत नव्हती. त्यामुळे 'येनकेन प्रकारेण' प्रसिद्धी मिळावी अशा पद्धतीने मी अनेक अडचणीत व लफड्यात स्वतःला झोकून देत असे. अनेक प्रमुख नटांच्या बरोबर मी हिंडले. . त्यांना माझं शरीर हवं होतं आणि मला माझ्या यशासाठी, करियरसाठी त्यांच्या नावाचा लाभ उठवायचा होता. दरदिवशी सकाळी वार्ताहर येऊन विचारीत "काल रात्री कुठे होतात ?" कधी कधी मी खरं तेच सांगून टाकीत असे. कधी तसे सांगणे शहाणपणाचे नसे, म्हणून मी मौन धरीत असे.

ह्या सुमारासच **टॉम नील** माझ्या आयुष्यात आला. तो बलदंड होता. खेळाडू होता. त्याच्या बोलण्यात गुंजारवाचा गोडवा होता. त्याच्या स्पर्शात रोमांचकारी जादू भरलेली होती. एकमेकांच्या सहवासात गुंतून पडावं असं मला वाटत नव्हतं. तरीही ओढ प्रचंड होती. प्रभावी होती. मी घरी नसले तर टॉम दाराशी बसून राही. त्याने तसे बसावे असे मला मनोमन वाटे. टॉमच्या सहवासात कळ्यांची फुले होत. प्रणयराज मदन अनेक सुवर्ण पदकांची शर्यत जिंकत असे. कधी कधी विचार येई तुझ्या करियरच्या दृष्टीने टॉमचा उपयोग काय ? पण त्याच्या सहवासाची ओढ मोठी. विचार मनातच रहात आणि शरीर त्याच्या मिठीत विसावे. सकाळ झाली की, पुन्हा करियरच्या विचाराची भुतं नाचू लागत. मार्ग हवा होता. पण निघत नव्हता. अखेर अचानकपणे मार्ग निघाला. फ्रँकॉट टोनने आपल्याबरोबर नाटकात काम करशील का म्हणून विचारले. मी होकार दिला. ती मागणी करियर संबंधात उपयोगी पडणारी होती. न्यूयॉर्कमधल्या कामाचे वृत्तपत्रांनी खूप गोडवे गायले. सौंदर्य व अभिनय ह्या दोन्ही दृष्टींनी गौरव केला. दिवस फार मजेत गेले. उणीव फक्त टॉमची होती. मला आपलं हे उगीचच वाटतं. इतक्या दिवसात त्याने कधी लग्नाची मागणी केली ? दूर राहिले म्हणजे कळेल त्याला माझं मोल. मग तरी येईल की नाही धावत ? घालील की नाही मागणी ? या विचाराने हॉलिवुडला येईपर्यंत मी फ्रँकॉटची साथ–सोबत सोडली नाही. हॉलिवुडला परत आले तेव्हा मला प्रथम व तीव्रतेने जाणवलं की, टॉमला माझं फक्त शरीर हवं आहे. त्याला विवाहाचं बंधन नको होतं. उलट फ्रँकॉट टोनला माझ्याशी लग्न करायचं होतं. मी त्याची मागणी मान्य केली. पण टॉमचे आणि माझे संबंध त्याला ठाऊक होते. ते संपले आहेत की नाहीत ह्याची खात्री करून घेण्यासाठी त्याने टॉम, मी व तो स्वतः यांनी एका टेबलावर बसून विविध समस्यांचा विचार करण्याची कल्पना मांडली. त्याला वाटत होते की, मी तडक लग्न करायला तयार असताना हिने टॉमसाठी कां वरं अडून रहावं ? आणि टॉमला वाटत होतं की आमची शय्यासोबत झकास जमलेली असताना हिने लग्नाचा घोळ तरी कशाला घालावा ? तरीही आम्ही एकत्र जमलो. टॉम फ्रँकॉटला म्हणाला "तुम्ही हिच्यापेक्षा वीस वर्षांनी मोठे आहात. ही एक अति-प्रमाथी स्त्री आहे. आणखी दहा वर्षांनी तुम्ही हिचे समाधान करू शकाल ?"

फ्रँकॉट सभ्य, सुसंस्कृत माणसासारखा बोलत होता. पण भावना तापल्या. आणि ते दोघे मुद्यावरून गुद्यांवर आले. टॉम बलदंड होता. त्याने फेकलेल्या पंचमुळे फ्रँकॉटच्या नाकाला जबर जखम झाली. त्याला दवाखान्यात न्यावे लागले. पोलिस व वार्ताहरांनी प्रश्न विचारून विचारून भंडावून सोडले. "मी फ्रँकॉटशी लग्न करणार आहे" असे सांगितले व १९५१ च्या मेमध्ये आम्ही विवाह-बद्ध झालो. एखाद्या परिकथेचा तो आनंदमय शेवट ठरायला हवा होता. पण तसा तो ठरला नाही.

काही दिवसांपूर्वी **बर्जेस मेरिडिथ** माझ्याकडे आला. म्हणाला "चित्रपटात काम करशील?" मी नकार दिला. "मला तुझ्याबद्दल फार वाईट वाटतं" तो म्हणाला. "मलाच तुझ्याबद्दल वाईट वाटतं" मी म्हणाले. खरं सांगू ? मला चित्रपटसृष्टीचा, त्यात कराव्या लागणाऱ्या विविध भूमिकांचाच वीट आला आहे. मी चित्रपट, टेलिव्हिजन शो पहात नाही. आरशात सुद्धा पहात नाही. कुणाची चित्रं पहायला मला आवडत नाही. मी फक्त माझ्या मुलाची चित्रे पाहते. ह्या अंधःकारमय जीवनाचीच मला आता सवय झाली आहे. हेच माझे जीवन आहे. चित्रपटाच्या दुनियेत सतत कुणासाठी तरी काही तरी करीत रहावं लागतं. मला आता माझं जीवन जगायचं आहे. फक्त माझं !!

फ्रॅंकोटचं आणि माझं लग्न सुखाचं झालं नाही. माझे आणि टॉमचे पूर्वीचे संबंध विसरायला तो तयार नव्हता. मी दिसले की, त्याला माझ्या आवती भोवती अन्य पुरुष आहेत असा भास सतत होतच राहिला. त्याचं मन सतत संशयानं पछाडलेलंच राहयलं. त्या संशयापायी तो स्वतःही झुरत राह्यला आणि माझे भावजीवन त्याने उध्वस्त करून टाकले. "मला प्रेम हवंय् रे" असं मी त्याला सतत विनवीत राहिले. पण तो ते कधीच देऊ शकला नाही. शेवटी मी घटस्फोट घेतला. मानसिक छळवादाला मी फार फार कंटाळले होते.

पुन्हा मी टॉम नीलकडे वळले. "शेवटी जे अटळ होतं तेच घडलं" असं मी मनाला समजावलं. त्याची प्रीती होतीच. मधल्या काळातल्या विरहाची भरपूर भरपाई केली. "हे सारं संपलं पाहिजे" असं मी स्वतःच्या मनाला वारंवार बजावीत होते. पण ते थांबणार नव्हतं हेही खरं.

आज मी त्या साऱ्या घटनांकडे पाहयलं की वाटतं आज आत्ता कुठे बार्बारा पेटनच्या खऱ्याखुऱ्या जीवनाला सुरुवात होतेय्. हा आहे प्रारंभ. त्यावेळी जी मुलगी वावरत होती, सारं काही करीत होती, पहात होती, ती होती माझी बाह्याकृती ! तो होता इतरांसाठी धारण केलेला मुखवटा ! !

मला इंग्लंडला जाऊन दोन चित्रात भूमिका करण्याची मागणी आली. खूप द्रव्य मिळणार होते. नाकारणे अशक्य. पण टॉमला सोडणेही कठीण होते. पण मी ते केले. इंग्लंडला गेले. चित्रपट गाजले. काही काऊंटस् व लॉर्डस् मागे लागले. त्यापैकी काहींना मी काही सुखाचे क्षण दिलेही. परंतु टॉम इंग्लंडला आला आणि ह्या मानव देहधारी सावल्या एकदम अंधारात गडप झाल्या. इंग्लंडमध्ये आम्ही एका चित्रपटात एकत्र भूमिका केल्या. त्याच्याबरोबर काम करण्यात गंमत होती. नंतर आम्ही हॉलिवुडला परत आलो. उद्योग नव्हता. मग आम्ही एकमेकांना भरपूर शिव्या दिल्या. आणि आमचे संबंध संपुष्टात आले. प्रेमाची प्रकरणं रहदारी नियंत्रक दिव्यासारखी असतात. "जा" म्हटलं की चालू होतात. "थांबा" म्हटलं की थांबवताही येतात. ह्या खेळात टॉम फार मोठा होता असं मी आजही सांगते.

एके काळी मजजवळ खूप पैसा होता. तो चित्रपट व्यवसायात मला मिळाला. फ्रॅंकॉट टोनकडूनही घटस्फोटाच्या वेळी पैसा मिळाला. पैसा आला तसाच गेला. जादूने खूप नोटा व्हाव्यात आणि त्या तशाच अचानक नाहीशा व्हाव्या तसेच ते घडले. अशा वेळी तरुण, देखणी व सुडौल शरीर लाभलेली मुलगी काय करील ? लग्न ! ! मीही अशीच चार लग्ने केली, पण ती यशस्वी ठरली नाहीत. नवऱ्यांना फक्त माझं शरीर हवं होतं. मी नको होते. आज तरी तसं वाटतं. कधी वाटतं की ह्या माणसांनी माझ्याशी कां बरं लग्न केलं असेल ?

पर्समध्ये पैसे नसत तरीही मी प्रवास करीत असे. कधी तरी मी गोत्यात येणार आहे हे मला कळत होतं. आणि तसंच घडलं. हजारो डॉलर्स मी ज्या स्टोअरमध्ये पूर्वी खर्च केले होते अशा एका सुपर मार्केटात मी शंभर डॉलर्सचा एक चेक दिला. खात्यात पैसे असतील अशी माझी भावना होती. पण खात्यात पैसे नव्हते. मला पोलिसांनी अडकवून ठेवले. त्या पैशांची मी बरीचशी दारूच विकत घेतली होती.

माझ्या वकिलांनी कसलीही फी न घेता, मला शंभर डॉलर्स तावडतोब देऊन तो चेक वठविण्याची व्यवस्था करू शकतील अशा मित्रांची नावे विचारली, दुकानाच्या मालकांकडे माझी रदबदली केली. शंभर डॉलर्सचा धोका पत्करणाऱ्या एकाही मित्राचे नाव मला आठवेना. अखेर सिरोच्या नाइट क्लबचा मालक **हर्मन होवर** पुढे झाला. त्याच्या नाइटक्लबात मी आणि माझ्या मित्रांनी बराच पैसा खर्च केलेला असल्याने अशा प्रसंगी धावून येणे त्याला कर्तव्य वाटले. परंतु त्याच सुमारास मी एका वृत्तपत्रकर्तीच्या अपमानाच्या खटल्यात गोवले गेले. आणि 'गुन्हेगार' म्हणून मला शंभर डॉलर दंडाची शिक्षा झाली.

पैसा ! पैसा ! ! आणि तुफान अडचणी ! मार्ग निघत नव्हता. शेवटी मी मेक्सिकोला परत गेले. आणि एका कोळ्याची माझी गाठभेट झाली. मासे पकडणे, शिजवणे व एकमेकांच्या सहवासात सुखमय रात्री काढणे—काही वर्षं फार चांगली गेली. मला नुसते सुख नको होते. परमोच्च सुखाचा स्वर्ग मला हवा होता. इथंच तर सारं चुकत होतं. मला ते कळत नव्हतं असंही नाही. पण इलाज नव्हता. माझी घरंगळ चालू होती. कधी मनात विचार येत होता

"खरंच मी ग्रेगरी पेकची नायिका होते? मग अशी अवस्था का म्हणून? भूक लागली तर एखादं सफरचंद सुद्धा स्टॉलवरून पळवून खाण्याची पाळी माझ्यावर यावी अं?"

दुसऱ्याच्या अनुभवाने कुणी शहाणं होत नाही हेंच खरं! एका नाट्यशाळेत शिक्षिका म्हणून काही काळ काम केलं. चालावं कसं, बोलावं कसं, बसावं कसं हे मी त्यांना शिकवलं. पण चित्रपट अभिनय विषयातल्या धोक्याच्या जागा मी दाखवू लागले की साऱ्यांचे कान जणु बंद होत. हॉलिवुडचे यश म्हणजे त्यांच्या दृष्टीने जणु थंडगार वाऱ्याची झुळुकच!!

माझ्या बाबतीत जे घडलं ते त्यांच्या बाबतीत कधी कधी घडणार नाही ह्या विश्वासाने त्या साऱ्या जणी वावरत असतात—कान आणि मन बंद करून!!

आज मी पस्तिशीत उभी आहे. तडीपार झालेली. मद्याने झिंगलेली आणि पाच डॉलर्ससाठी कुणाही पुरुषाची शय्यासोबत स्वीकारणारी एक स्त्री उरले आहे. पण अजूनही मी कविता लिहू शकते. 'डबलडे'ने मला कवितांचे पुस्तक लिहिण्यासाठी ॲडव्हान्स दिला होता. त्याच्या प्रत्येक पानापानावर अश्रु आणि रक्ताचे थेंब ठिबकलेले दिसतील आणि सहानुभावी वाचकाला त्यांचा अर्थ कळेल.

विश्वास, श्रद्धा, निष्ठा ही एक फार प्रचंड शक्ती आहे. श्रद्धेने पर्वतही गदगदा हलवता येतात. माणूस पालटू शकतो. पुन्हा हे घडेल. जीवन बदलेल. ह्या श्रद्धेच्या सामर्थ्यावर तर मी जगते.

## स्वप्न उरींचे...

माणसं आपल्या आयुष्याबद्दल बोलायला लागली की 'मी तेव्हा चार वर्षाचा होतो.' अशी सुरुवात करतात. काहींना दोन वर्षापासूनच्याही आठवणी आठवतात. मला जीवनाची जाण नेमकी केव्हा आली ते मला आठवत नाही. पण एक स्वप्न मात्र मला अजून आठवतं. चांदणी रात्र होती. मी एका माणसाकडे पहात होते. ती आकृती पुढे पुढे सरकत आली आणि माझ्या अंगावर कोसळली. मी एका खडकावर आदळले. आणि ती प्रचंड व बलदंड आकृती माझ्या अंगावर सारा भार टाकून पडली. मी भेदरले. किंकाळी फोडली — त्या किंकाळीने मी जागी झाले आणि सारे घरही! ते स्वप्न चांदण्यात, भर उन्हात वाटेल तेव्हा माझा पाठलाग करीत असे. मला वरे दिवस आले तेव्हा मी मानसोपचार तज्ञाकडे गेले. तो म्हणाला "आतून तुम्ही पुरुषांना व त्यांच्या व्यक्तित्वाच्या प्रभावीपणाला भ्यालेल्या आहात" मी वाद घातला नाही.

मी तेव्हा नऊ वर्षाची असेन. मला ते वय फार आवडे. आजही आवडते. ओडेसाच्या जवळच्या एका झऱ्याच्या काठाकाठाने मी अनवाणी चालत होते. मी मुक्त होते. कसलीच चिंता नव्हती. मी आपल्याच तंद्रीत होते. तेवढ्यात आवाज आला, "ए कोण ग तू? माझ्या झऱ्याचं पाणी खराब करते आहेस ती!" एक अकरा वर्षाचा मुलगा मला विचारीत होता.

"तुझा झरा? तुला कुणी आंदण दिला रे?"

त्याने पायातल्या चपला फेकून दिल्या आणि पाण्यातूनच तो सरळ माझ्याकडे चालत आला. आणि माझ्या पुढ्यात येऊन म्हणाला, "मी म्हणतो तो झरा माझा आहे. मी म्हणतो म्हणून तो माझा आहे" त्याला एक फटका मारावा, रडावं की पळून जावं ते मला कळलं नाही. मी सरळ डोळ्याला डोळा भिडवला. तेव्हा माघार घेत तो म्हणाला "ठीक आहे. त्या वरच्या खडकापर्यंतचा झऱ्याचा भाग तुझा" असं म्हणत तो निघून गेला. माझ्यातल्या एका वेगळ्याच शक्तीची मला जाणीव झाली. मी त्याच्या बाजूच्या पाण्यात चालत गेले. आणि सरळ त्याच्याकडे पाहू लागले. "तुझं नाव काय?"

"बार्बारा!" आणि "चल, दूर हो माझ्या पाण्यातून!" असं त्याला म्हणाले. तो दूर झाला नाही तेव्हा मी चालत गेले व त्याला ढकलून दिले. त्याला ते आवडले नाही, पण तो काही पावले मागे हटला.

"तू सुंदर आहेस."

"असेन! तुला त्याच्याशी कर्तव्य नाही" असं म्हणत मी आणखी भाग व्यापला. आणि जणु त्या खडकाचे स्वामित्वच माझ्या पायाशी चालत आले. नुसते सुंदर असण्याचे फायदे प्रथमच माझ्या ध्यानी येत होते.

"माझं नाव एडवर्ड. मी हा संपूर्ण झरा तुला देऊन टाकला तर मला एक मुका देशील?" तो म्हणाला.

"आधी मांजराचं एक पिल्लू आणून दे मला."

"हूं! त्यात काय आहे?" असं म्हणत माझं चुंबन घेण्यासाठी तो पाण्यातून तो पुढे धावला.

"आधी मांजराचं पिल्लू—मग मुका" मी म्हणालो. तो धावत पळत निघून गेला. त्याने पिल्लू दिले की नाही वा मी त्याला मुका दिला की नाही ते मला आठवत नाही. पण तो प्रसंग मला नवे जागरण देऊन गेला.

[पान १८० वर पहा]

[पान १०७ वरून–सरळ चालीचा उंट]

चारित्र्याची खातरजमा करीत होतास तू तिच्याशी. कशाकरता ?" आणि बोलता बोलता रडवेली होत ती म्हणाली, "फार प्रेम केलं रे मी तुझ्यावर. फार प्रेम केलं. कुणी कुणावर करू नये, एवढं केलं. आणि तरीही" आणि– एकदम हुंदके देऊन ती रडू लागली. तिला जवळ घेत मी म्हटलं, "असं काय वरं वेड्यासारखं आनंदी ?" माझा तिला स्पर्श झाला आणि ती हमसाहमशी रडू लागली. रडता रडताच तिने विचारले, "अखेरीस मी तुझी आहे तरी कोण ?" न बोलता मी तिच्या केसातून नुसता हात फिरवीत राहिलो. कारण ह्या प्रश्नाला माझ्यापाशी उत्तर नव्हते. खरेच आनंदी माझी कोण होती ? आसावरी माझी धर्मपत्नी होती. पण बायकोने नवऱ्याला जे सुख द्यावे, ते सुख मला देणारी आनंदी माझी कोण होती ? ती वासुदेवाची धर्मपत्नी होती. आणि त्याला जे सुख द्यायचे, ते सुख ती मला देत होती. तिचे माझे हे नाते चोरटे होते. बाहेर त्याचा उल्लेख करता येणार नाही, असे होते. हे जसे मला ठाऊक होते, तसेच तिलाही ठाऊक होते. फसव्या शब्दांच्या आवरणाखाली आम्ही सत्य झाकले आणि एकमेकांच्या मनाचे समाधान केले, तरी खरे काय ते आम्ही मनोमन जाणून होतो. आणि तरीही ती मला विचारीत होती, 'अखेरीस मी तुझी आहे तरी कोण ?'

मी थोडा धीट असतो, तर हा प्रश्नच उभा राहिला नसता; पण मी भित्रा होतो. अगतिक होतो. ही भीरुता आणि अगतिकता आसावरीवरील माझ्या प्रेमातून उत्पन्न झाली होती. मी तिच्याशी एकनिष्ठ आहे, अशीच तिची समजूत होती. आणि ह्या समजुतीला तडा जाऊन तिला दुःख होईल, असे उघडपणे काही करायला मी बिलकुल तयार नव्हतो. ह्याविषयी कधी स्पष्ट बोलणे झाले नाही, तरी आनंदीला हे ठाऊक होते. आणि तरीही माझ्याकडे पहात ती पुनः पुन्हा विचारीत होती, 'सांग ना, मी तुझी कोण आहे ?'

तिला हृदयाशी धरीत मी म्हटले, "आनंदी, तू माझा प्राण आहेस. त्याहूनही प्रिय आहेस मला. जशी आसावरी तशी तू." मला वाटले होते की ह्या बाबतीत ती मला आणखी छेडील. आणि कटुता निर्माण होईल. पण तसे काही झाले नाही. माझ्या उत्तराने तिचे समाधान होऊन मला बिलगत तिने विचारले, "खरं ना ?"

"अगदी खरं."

"तू माझा एकटीचाच आहेस ना ?"

वातावरणातला ताण आता जरा सैल झाला होता. तो पुरता नाहीसा करावा, म्हणून मुद्दामच मी विचारले, "आता पुन्हा भोगावकरबाई आठवली काय ?"

रागावल्यासारखं दाखवीत ती माझ्या मिठीतून बाजूला झाली. आणि बेडरूमकडे वळली. तिच्या पाठोपाठ आत जात मी तिला जवळ ओढून घेतली. आणि म्हटलं, "अगदी वेडी आहेस बघ तू."

"असू दे." माझ्या मिठीत येत तिने विचारले, "मी तुझ्यापाशी काही मागितलं, तर देशील मला ?"—

"तू मागितलंस आणि मी दिलं नाही, असं कधी झालं आहे ?"

"म्हणून तर मागते–"

"सांग, काय हवं ?" माझ्या छातीवर डोकं टेकीत अस्पष्टपणे, कुजबुजल्यासारखं करीत ती म्हणाली, "तुझ्या मुलाची आई होऊ दे मला." ती बोलली. आणि माझ्या नकळत माझी तिच्यावरची पकड सैल झाली. ती म्हणत होती, तसे काही होऊ नये, म्हणून आम्ही किती खबरदारी घेत होतो. आणि जे आम्ही इतके दिवस टाळले, तेच आता नेमके ती मागत होती. सावध होत मी म्हटले, "हे काय आज नवीन काढलंस?– "

"इतके दिवस मनोमन जपलं. आज बोलले." माझ्या मानेवर, गालावर, कपाळावर आपले ओठ बेभानपणे टेकीत ती म्हणाली, "विश्वनाथ, फार आवडतोस तू मला. पण किती कमी वेळ माझ्या सहवासात असतोस ? तू असतोस तेव्हा माझ्या आयुष्याला खरा अर्थ प्राप्त होतो. तू निघून गलास की सगळं निरर्थक वाटू लागतं. तू यतोस. आणि जातोस. येतोस तो नेहमीकरताच यावास, असं वाटतं. पण ते शक्य नाही, हेही कळतं. तू गेलास की विरहाचे चटके सहन करीत तुझ्या वाटेकडे डोळे लावून बसते मी." आणि माझ्या डोळ्यात पहात तिनं विचारले, "मी सुखी व्हावं, असं तुला वाटतं की नाही ?"

"वाटतं. फार वाटतं. म्हणून म्हणतो की वेडे, असा खुळा हट्ट करू नकोस. आनंदी, अग हे अशुभाचे डोहाळे आहेत."

"असू देत. तरीही तुझ्या रूपानं तू मला हवा आहेस. नेहमीकरता–"

काही सांगण्यापलीकडे ती आता गेली होती. ह्या बाबतीत आणखी काही बोलण्यात अर्थ नव्हता. काही बोललो असतो, तरी तिने गैरसमज करून घेतला असता. मी बोलावे आणि मोडता घालावा, अशी ही वेळ नव्हती. मी असा विचार करीत होतो आणि त्याच वेळी तिची ही लहर क्षणिक नाही, हेही मला कळत होते. काय करावे, कसे वागावे, हे लक्षात यईना. माझी ही चलबिचल स्थिती तिच्या लक्षात आली असावी. माझ्यापासून ती दूर झाली, आणि उशीत डोके खुपसून पलंगावर पडून राहिली.

तिच्यापाशी जात मी म्हटले, "आनंदी, किती छळणार आहेस मला ? किती अंत पहाणार आहेस माझा ?"

"तेच मी तुला विचारणार होते." आणि पुरुषाने बाईला मिठीत घ्यावे, तसे तिने मला मिठीत घेतले.

रतिसुखाचा बहर ओसरत आला, तेव्हा सावध होत मी विचारले, "नहमीची खबरदारी घतेस ना ?"–

"आजपर्यंत घेतली."

"तशीच नेहमी घ्यायला हवी." काकुळतीला येऊन विचारले, "घेशील ना"?

ती काय बोलते, ते ऐकायला मी अधीर झालो होतो. पण तिच्या बोलण्याऐवजी एकदम मोटारचा हॉर्न वाजलेला ऐकू आला. माझ्यापासून दूर होत ती म्हणाली, "अगबाई, आमच्या गाडीचा हॉर्न ह्या वेळी कसा?" क्षणभर आमचा गोंधळ उडाला कपडे सावरीत ती खिडकीपाशी गेली आणि खिडकीवरचा पडदा किंचित् बाजूला करून खाली वाकून पाहू लागली. एकदम आत वळत म्हणाली, "घात झाला. हेच आले. बाहेर हॉलमध्ये जाऊन बैस आणि मी दचकलो. दरवाजा उघडायला आनंदी पॅसेजमधून पुढे गेली, ते माझ्या लक्षात आले. पुढ्यातले वर्तमानपत्र उघडून मी डोळ्यासमोर धरले. पण कान मात्र उघडल्या जाणाऱ्या दाराकडे होते. दार उघडीत तिने विचारले, "हे काय ! ह्या वेळी कसे? प्रकृती बरी आहे ना?"

"महत्त्वाची फाईल राहिली, ती न्यायला आलो."



"आलेत ते छानच झालं. आनंदाची बातमी आहे. आणि ती द्यायला कोण आलं आहे ठाऊक आहे का?"

"ह्या वेळी आपल्याकडे कोण येणार बुवा ?–"

"पहा तर खरं."

ती दोघं चालत हॉलपाशी आली. मी दिसलो, तेव्हा आश्चर्यचकित होत त्याने विचारले, "ह्या वेळी तुम्ही इथं ?"

तेवढ्या अवधीत मी स्वतःला सावरले होते. हसल्यासारखे करीत मी म्हटले, "मी आलो, आणि पाठोपाठ तुम्ही आलात."

"पण बाहेर तुमची गाडी तर कुठं दिसली नाही ?" त्याने केलेला गाडीचा उल्लेख अनपेक्षित होता. पण नेहमीच्या धोरणानेच तिच्या दाराशी गाडी उभी केलेली नसल्यामुळे त्याचे उत्तरही माझ्यापाशी तयार होते. न डगमगता मी म्हटले, "आनंदाच्या किंवा दुःखाच्या क्षणी मी कधी गाडी बाहेर काढत नाही." आणि विषय बदलून म्हटले, "आनंदाची बातमी होती. अवेळ होती, तरी मुद्दाम सांगायला आलो." मी बोलत होतो आणि तो माझ्याकडे निरखून पहात होता. त्याच्या ह्या अशा पाहण्याने मला बावचळल्यासारखे झाले. आणि वेड्याखुळ्यासारखा मी बसून राहिलो. पण आनंदी माझ्या मदतीला आली. आनंदाची बातमी त्याला सांगून ती म्हणाली, "तुम्हाला त्यांनी मुद्दाम बोलावलं आहे." हे सगळे ऐकून त्याला बरे वाटल्याचे माझ्या लक्षात आले, तेव्हा मी म्हटले, "तुमच्या तीर्थाचा गुण आला."

भिंतीवर टांगलेल्या गणपतीच्या तसविरीकडे पहात तो म्हणाला, "सगळी त्याची कृपा. आपण केवळ निमित्तमात्र."

टेबलाचे ड्रॉव्हर उघडून त्याला हवी असलेली फाईल तो शोधू लागला, तव्हा आता सटकायला हरकत नाही, हे माझ्या लक्षात आले. उभा रहात त्या दोघांना उद्देशून मी म्हटले, "संध्याकाळी वाट पाहतो." आणि त्याचा पुरता निरोप न घेता मी घाईघाईत बाहेर पडलो.

मी बाहेर पडलो आणि मला एकदम सुटल्यासारखे वाटले. केवढ्या भयंकर प्रसंगातून मी वाचलो होतो ! तो थोडा आधी आला असता, तर माझ्या त्रधातिरपिटीला सीमाच नव्हती. लांब लांब टांगा टाकीत मी त्याच्या घरापासून दूर झालो. पहाता पहाता गल्ली ओलांडली. आडवाटेला उभ्या करून ठेवलेल्या गाडीपाशी आलो, आणि मागपुढे न पाहता गाडी घराकड हाणली.

## [१७]

संध्याकाळ टळत आली, तरी वासुदेव आला नाही. तेव्हा अस्वस्थ होत तिने विचारले,

"तुम्ही त्यांना सांगितलेत ना ?"

"किती वेळा तेच तेच पुन्हा विचारशील ?"

"रागावलात ?"

"एवढं सांगूनही तो आला नाही, त्याला मी तरी काय करू?"

"पण भाऊजी असं कधी वागले नाहीत. एवढा आनंदाचा दिवस आणि ते आले नाहीत असं कधी व्हायचं नाही" कानोसा घेतल्या-सारखं करीत ती म्हणाली, "दरवाजा वाजल्यासारखा वाटतो. पहा बरं. "

तिच्या समजुतीसाठी मी उठलो. आणि दरवाजाच्या दिशेने चालू लागलो. तो येईल की नाही, ह्याविषयी मी साशंक होतो. तो येईल, अशी मी तिला आशा दाखवीत होतो. आणि त्याच वेळी कदाचित् तो येणार नाही, हेही मला कळत होते. त्याने न यावे, असाच मी दुपारी वागलो होतो. माझे गैर वागणे त्याच्या दृष्टीस पडले नसले, तरी तो आल्यावर माझा उडालेला गोंधळ त्याच्या नजरेतून सुटला नव्हता. माझी धपापणारी छाती आणि चुरगळलेला शर्ट नको त्या गोष्टी तर बोलून गेल्या नव्हत्या? त्याने प्रत्यक्ष काही पाहिले नसले, तरी संशय यायला एवढे पुरेसे होते. आणि त्याच्या मनात काही किल्मिष अले असले, तर तो येणार नाही हे मी पुरेपूर जाणून होतो.

मी दरवाजाशी आलो. आणि तेवढ्यात दारावरची बेल वाजली. घाईघाईत मी दरवाजा उघडला. आणि दारात तो दिसला तेव्हा मला एकदम सुटल्यासारखे वाटले. त्याला आत घेत मोठ्या उत्साहाने मी म्हटले, "या. या. आसावरी केव्हाची वाट पहाते आहे" आणि मोठ्या खुषीत येऊन आत जात मी म्हटले, "कोण आलं पाहिलंस का?"

तो दिसला तेव्हा आसावरी म्हणाली, "तरी मी ह्यांना सांगत होते की भाऊजी यणार नाहीत, असं व्हायचं नाही." आणि त्याच्या-कडे पहात तिनं विचारलं, "एकटेच कसे?"

प्रश्न ऐकून त्याचं उत्तर देण्याऐवजी त्यानं माझ्याकडे पाहिलं. आणि माझ्या काळजाचा ठोका पुनः एकदा चुकला. म्हणजे तो आला, त्यावरून मी मनाशी अंदाज बांधला; तो चुकीचा तर नव्हता? तो आला, तो केवळ उपचार सांभाळण्यासाठी तर नव्हे?

तसेच असावे. कारण आला तो उशीरा आला. एकटा आला. आल्यावर वागला तेही, अवघडल्यासारखा. तिच्या प्रकृतीची त्याने चौकशी केली तीही वरवर. आता भराभर गुण येईल असे त्याने तिला सांगितले. तेही तोंडदेखले. त्याच्या वागण्या बोलण्यात कुठेही भाव-नेचा ओलावा नव्हता. पंधरा वीस मिनिटातच तो जायला उठला. त्यान आणखी थोडा वेळ थांबावे, म्हणन तिने आग्रह केला, पण त्याने घाईगर्दीत असल्याचे सांगितले. थोडा वेळ रेंगाळल्यासारखे केले. दरवाज्याच्या दिशेने तो चालू लागला.

त्याचे हे वागणे आसावरीच्याही लक्षात आले. तो गेल्यावर हिरमुसली होत ती म्हणाली, "भाऊजींचं आज काहीतरी बिन-सलेलं दिसतं." न बोलता मी तिच्या उशागती जाऊन बसलो. तिला झालेल्या ह्या मनस्तापाला मीच जबाबदार होतो. बाहेरची ही माझी भानगड मी घरापर्यंत आणली, हीच माझी चूक झाली. ही चूक कशी निस्तरावी, त्याचा विचार करीत मी मनाशी काही खूणगाठ बांधली होती. बोलायचे असेल, तर हीच वेळ आहे; हे ध्यानात येऊन तिच्या बोलण्याचा धागा पकडीत मी म्हटले, "बिनसायला काय झालं? हे लोक असेच. दुसऱ्याच्या दुःखात तव्हडं ह्यांना सामील होता येतं. आनंदाच्या वेळी मात्र पळ काढतात. दुःख दिसलं की हे दया दाखवतात. कारण दयचं बाहेर भांडवल करता येतं."

"पण वासुदेवभाऊजी--"

"तोही त्यातलाच. काय झालं असतं ह्यून खेळून वागला असता तर?" आणि विषय बदलून मी म्हटलं, "आजचा हा एवढा आनंदाचा दिवस आणि अशा वेळी तुझ्या माझ्यात इतरांचे विषय कशाला? शेवटी तुला मी आणि मला तू," आणि तिच्या ओठावर मी ओठ टेकले.

आज किती दिवसांनी मी आसावरीचे चुंबन घेतले होते!

माझ्या कुशीत डोके खुपशीत ती म्हणाली, "मी आता खात्रीनं बरी होणार."

हळुवारपणे तिला थोपटीत मी म्हटले, "उद्या मी फिजिओ-थेरॅपिस्टला घरी बोलावणार आहे." आणि त्यानंतर किती तरी वेळ आम्ही नाना विषयावर बोलत राहिलो. नाना बेत रंगवीत राहिलो.

हे सगळे ठीक होते...

पण भवितव्याच्या पोटात अखेरीला काय दडले होते?—

* *





अनुक्रमणिका

[१८]

वासुदेव घरी नसेल, अशा बेताने संधी साधून मी तिला फोन केला. फोनवर तिचा आवाज आला, तेव्हा म्हटले, "मी विश्वनाथ."

"मी आनंदी."

ती एकटीच आहे, हे ऐकून मला एकदम बरे वाटले. घाईघाईत मी विचारले, "सगळं ठीक आहे ना?"

"नेहमीसारखं."

हलक्या आवाजात विचारलं, "मी निघून गेल्यावर तुला कितपत त्रास झाला?"

"मुळीसुद्धा नाही."

"म्हणजे त्याला संशय नाही आला?"

"कणाचा सुद्धा नाही?"

गुदमरलेल्या माणसाने श्वासासाठी धडपड करावी आणि त्याच्या अंगावर वाऱ्याचे झोतच्या झोत यावेत, तसे हे चालले होते. धीर यऊन मी विचारले, "मग काल तू का नाही आलीस?"

"घरी अचानक पाहुणे आले" आणि तिने विचारले, "पण ते आले ना?"

"आला, पण थोडाच वेळ थांबला."

"त्यांनाही तावडतोब घरी येणं भाग होतं."

"पण होता, तेवढ्या वेळातही विचित्र वागला."

"त्याला दुसरं काही कारण असेल."

"खरं म्हणतेस?"

"तुझ्या माझ्यात खोटं कशाला वोलू?"

"मग ठीक आहे. मला वाटलं—"

"छे! छे! तसं काही नाही. उगाच घाबरू नकोस."

"आता काही दिवस सावध वागलेलं बरं."

"म्हणजे तू मला भेटणार नाहीस. असंच ना?"

"उगाच गैरसमज करून घेऊ नकोस."

"मग केव्हा येतोस?"

"आता एवढ्यात नाही."

"मग आसावरीला बघायला मी येऊ काय?"

"नको नको. मी सांगतो, ते ऐक. आता काही दिवस एकमेकांना न भेटणं चांगलं."

"अरे पण—"

"आता उगाच घोळ घालू नकोस." आणि सुचली ती सबब सांगून मी घाईघाईत फोन बंद केला.

मी भिला होतो, हे तर खरेच. पण नुसता नव्हतो, तर भ्याडही होतो. त्याला संशय आला असेल, अशा नुसत्या कल्पनेनेच मी घाबरलो होतो. रात्रभर विचार करीत तळमळत होतो. आततायी विचार मला घेरून टाकीत होते आणि डोळ्याला डोळा लागत नव्हता. सगळे संपवून टाकावे, असे हजार वेळा मनात आले. त्याच वेळी असं संपवू म्हणून संपत नाही, हे मला कळत होते. हीच एक गोष्ट अशी असते की ती संपल्यावरही चालू राहते. शिवाय हयावावतीत असा एकतर्फी निर्णय घेण्यात काही अर्थ नाही, हेही मी जाणून होतो. आणि त्यामुळेच अंदाज घेण्यासाठी मी फोन केला होता. जे सांगावे, असे माझ्या मनात होते; तेच ती आपणहून वोलेल, अशी माझी कल्पना होती. किंबहुना ती पार भेदरून गेली असेल आणि मलाच तिला धीर द्यावा लागेल; असे मला वाटत होते. पण फोनवर ऐकले, ते निराळेच. त्याला कणाचासुद्धा संशय आलेला नसून मी उगाच घाबरू नये, असे ती मला सांगत होती. एवढेच नव्हे, तर मी पुन्हा केव्हां येतो त्याची चौकशीही करीत होती. एक तर घडल्या प्रकाराचे तिला आकलन झाले नसावे. अथवा त्याच्यावरील फाजील विश्वासाने ती फसत असावी. काही असले, तरी हे तिला आणि मला गोत्यात आणणारे होत......

अखेरीला ह्या सगळ्या प्रकारात मी फसणार तर नव्हतो?



[१९]

त्यानंतर बरेच दिवस मी कुणाला भेटलो नाही. की कुणाला फोन केला नाही. सगळे लक्ष घरात गुंतवून टाकले. मिळेल तेवढा वेळ आसावरीच्या सहवासात राहू लागलो. डॉ. सचदेव येऊन तिचे पाय तपासून गेले. आणि त्यानंतर त्यांची असिस्टंट रोजच्या रोज येऊन ट्रीटमेंट देऊ लागली. ही ट्रीटमेंट तशी तापदायक होती. तिला सहन करायला. आणि मला पहायला. पण असे असले, तरी ट्रीटमेंटचा गुण येऊ येऊ लागला होता. लोळागोळा झालेले पाय थोडेफार हलू लागले होते. ते हलवताना आता दिवसेंदिवस तिला कमी त्रास होऊ लागला होता.

चुकलेले गणित सुटण्याच्या मार्गावर होते.

पण हे खरे का?

जे मी संपवू पहात होतो, ते संपणारं होतं का? की संपवू म्हटले, तरी तसेच पुढे चालू राहणार होते?

सुटत आलेले गणित पुन्हा चुकणार तर नव्हते?

कुणी सांगावे?

ऑफिसमध्ये शिरलो आणि रिसेप्शनरुममध्ये आनंदी दिसली, तेव्हा मी एकदम चमकलो. ऑफिसमध्ये मी तिला आजपर्यंत कधी आणली नव्हती. की आपणहून ती कधी आली नव्हती. मग आजच का आली? गेल्या कित्येक दिवसात मी भेटलो नाही आणि फोनवरही दाद दिली नाही, म्हणून तर नव्हे? माझ्यावरील अतीव प्रेमाने वेडीपिशी होऊन तर ती अशी धावत आली नव्हती? की आणखी काही कारण होते? मी तिच्या दृष्टीस पडलो, तेव्हा ती बसल्या जागेवरून एकदम उभी राहिली. आणि हसून माझ्या-

कडे पाहू लागली. तिला घेऊन मी केबिन-मध्ये आलो आणि विचारले,

"काय झालं ?"

"काही सुद्धा नाही"

"मग इथं ?"

"तुला भेटायला."

"शहाणी आहेस."

"तूच केलंस"!

"तेच नडलं."

"पण त्याला आता फार उशीर झाला." आणि मिस्किलपणे ती माझ्याकडे पाहू लागली.

न सांगता न सवरता ती ऑफिसमध्ये आलेली पाहून मी चमकलो होतो. मनात नाना शंका येऊन गेल्या होत्या; पण केवळ मला भेटायला अगदी सहजपणे ती आली, हे ऐकून मनावरचे दडपण दूर झाले होते. ती आली, म्हणून मी रुष्ट झाल्यासारखे दाखवत होतो, पण ते खरे नव्हते. खरे सांगायचे, तर तिला पाहिली आणि तिचा आवाज ऐकला, तेव्हाच मी विरघळलो. मनात आले की केवढया सुखाला गेल्या महिन्याभरात मी वंचित झालो होतो!

भावना अशा विकारवश होतात, म्हणूनच महाभारत घडते.

सावध होत मी विचारले, "वासुदेव काय म्हणतो?"

"मजेत आहेत."

"अशी उडवाउडवी नको. खरं काय ते सांग." तिच्याकडे रोखून पहात विचारलं, "माझ्यावरून त्याने तुला काही विचारले की नाही ?"

"नाही रे बाबा."

"ऑफिसातून तो वेळी अवेळी घरी येऊन जातो की नाही ?" माझा प्रश्न ऐकून ती हसली आणि म्हणाली, "तुझ्याइतके ते धूर्त नाहीत. साधे-भोळे आहेत."

अबोल आणि साधी भोळी वाटणारी माणसंच बिघडली की फार बिघडतात हे मला ठाऊक होते. ते लक्षात घेऊन मी म्हटले, "म्हणूनच जपून वागायला हवं." माझ्या बोलण्यावर ती हसली, तेव्हाच माझे बदलेले वागणे तिला पसंत नाही, हे माझ्या लक्षात आले. आणि त्याच वेळी ह्या विषयावर तिच्याशी आणखी न बोलता मनाशी ठरवले, त्याप्रमाणे वागायचे; असे मी ठरवून टाकले.

विषय बदलून मी विचारले, "तू कशी आहेस ?"

"कशी दिसते ?"

"नेहमीसारखीच सुरेख."

"नेहमीइतकीच !" तिने मला बरोबर पकडले होते. फार दिवसानी भेटल्यामुळे ती आकर्षक दिसत होती. माझ्या नजरे-वरून हे तिच्या लक्षात आले असावे. आणि त्यामुळेच ती असा प्रश्न विचारीत असावी. मी तिच्याकडे पहात राहिलो, तेव्हा ती म्हणाली, "सांग ना."

बसल्या जागेवरून उठून मी केबिनचा दरवाजा आतून लावून घेतला आणि तिच्यापाशी जात म्हटले, "फार सुरेख दिसतेस तू आज."

"आता दिवसेंदिवस अशीच सुरेख दिसेन."

तिची थोडी थट्टा करावी, असा विचार

करून मी विचारले, "आता माझा त्रास नाही म्हणून तर नव्हे ?"

"अंऽहं." आणि चेहऱ्यावर हाताचे पंजे घेऊन बोटांच्या फटीतून माझ्याकडे पहात ती म्हणाली, "आता घडी घडी छळायला तू आहेस म्हणून–"लाडिकपणे पण कोड्यात टाकावं, तसं ती बोलत होती. मी तिच्याकडे पहात राहिलो, तेव्हा ती म्हणाली, "काहीसुद्धा समजत नाही तुला ?"

"स्पष्ट बोललीस, तर समजेल."

"हे रे काय ? ह्या अशा गोष्टी कुणी कधी बोलतात का ?" आणि कधी नव्हे, इतकी ती लाजली. वीज चमकावी, तसे माझ्या मनात एकदम लक्कन झाले. तिच्या बोलण्याचा आशय माझ्या लक्षात आला. आणि मी साफ गडबडलो. पायाखालची जमीन निसटून जावी, तसे झाले. हा माझ्या कसोटीचा क्षण होता. मी विचारले, "वासुदेवाला सांगितलंस की नाही ?"

"इतका कसा रे तू रुक्ष !" आणि ती एकदम गप्प झाली. मर्जी गेल्याप्रमाणे स्वस्थ बसून राहिली.

आतून बंद केलेले केबिनच्या दरवाजाचे लॉक मी मोकळे केले. आणि खुर्चीवर येऊन बसलो.

दुखावल्या आवाजात ती म्हणाली, "तुला सांगितलं. आता त्याना सांगेन. सांगायलाच हवं. शेवटी नाव त्यांचंच लागायचं आहे."

"कदाचित्–" ती काय बोलणार, ते लक्षात येऊन तिन माझे बोलणे एकदम तोडून टाकले. रागास येत ती म्हणाली, "आता आणखी प्रश्न विचारू नकोस."

"पण आनंदी.

"भलतं सलतं बोलून माझा अपमान करू नकोस."





बोलण्यासारखे पुष्कळ होते. काही सांगावे, तर हीच वेळ होती. पण सांगितले, तर ते ऐकून घेण्याच्या ती मनःस्थितीत नव्हती. तिचा हा आत्यंतिक स्वभाव माझ्या ओळखीचा होता. त्यामुळेच वेळोवेळी मी पड खाल्ली होती. आणि त्याचे हे असे फळ मला मिळत होते. जे घडू नये, म्हणून मी धडपडत होतो; ते अखेरीस घडले होते. मला विश्वासात न घेता घडले होते. घडल्यावर मला कळत होते. आणि पुन्हा वर शिरजोरपणा करून ती मला बोलू देत नव्हती. अप्रिय असले, तरी ते बोलले पाहिजे; हे मला कळत होते. ते कसे बोलावे, त्याचा मी विचार करीत आहे; तोच ती म्हणाली, "तुला भटायला अशी धावत पळत आले. आता मला घरी नेऊन सोड."

तिची ही सूचना माझ्या फायद्याचीच होती. बोलायचे, ते मोकळचावर बोलता येईल; असा विचार करून मी पुढच्यातल्या डायरीवर नजर फिरवू लागलो. मी डायरी पहात आहे, हे लक्षात येऊन ती म्हणाली, "माझ्यासाठी नाही, पण आता दुसऱ्या कुणासाठी तरी तुला आलंच पाहिजे." माझ्यावर अशा प्रकारचा हक्क सांगू पाहणारी तिच्या बोलण्यातली ही बळजोरीची भाषा नवीन होती. डायरीवरची नजर वर न उचलता मी म्हटले, "मला आता काम आहे. पण ड्रायव्हरची व्यवस्था करतो."

"त्याची जरूरी नाही." आणि तटकन् उठून ती चालू लागली. उठावे आणि तिच्या पाठोपाठ जावे, असे मनात आले. पण खर्चीच्या मुठी घट्ट पकडून मी तसाच बसून राहिलो.

किनाऱ्याकडे यायला मी धडधपत होतो. आणि ओहोटीचे पाणी मला आत खेचत होते.

* *

[२०]

नशिबाचेसुद्धा काय एकेक दशावतार असतात !

गेला महिनाभर मी तिला टाळीत होतो. आणि आता मीच तिच्या दाराशी येऊन उभा राहिलो होतो.








ऑफिसमधून ती रागारागात निघून गेली. आणि मी विचारात पडलो. उलट-सुलट विचारांनी मन भोवंडू लागले. ह्या सगळ्या प्रकारात मी विनाकारण तर गोवला जात नव्हतो ? जन्माला येणारे मूल जितके माझे असण्याची शक्यता होती, तितकेच ते वासुदेवाचेही असण्याची शक्यता होती. मी की वासुदेव ? वासुदेव की मी ? की आणखी कुणी ? मनात असा विचार आला. आणि माझा मीच धिक्कार कर-णार, तोच शंभराची नोट आणि भोगाव-कर बाई डोळ्यांसमोर उभी राहिली. कधी नव्हे, तो एक अगदी जुना प्रसंग काल-परवा घडल्याइतका अचानकपणे सजीव झाला. ओळख झाल्यावर महिनाभरातच मी आनंदीचा हात हातात घेतला होता. जवळ ओढून तिला मिठीत घेतली होती. आणि ती गुदमरून जाईल, इतका तिच्या-वर चुंबनांचा वर्षाव केला होता. घुसमटल्या आवाजात विचारले होते, "तू आता माझी केव्हा होणार ?"

"तुझीच आहे."

"तशी नव्हे. सर्वार्थानं–"

माझ्यापासून लटके लटके दूर होत तिने विचारले होते, तुम्ही सगळे पुरुष असे कसे रे ?

"कसे ?"

"बाई मिठीत आली की सगळ्यांना तेच हवं !"

त्याच वेळी मी सावध व्हायला हवं होतं. त्याच वेळी प्रश्न पडायला हवा होता की पुरुषांच्या सलगीविषयी इतक्या अधि-कार वाणीने बोलणाऱ्या हिला किती पुरुषांचा अनुभव आहे ? पण बाई मिठीत आल्यावर सारासार बुद्धीचा लोप व्हावा, तसेच माझे झाले होते. पण मनाने मात्र कुठे तरी तिच्या बोलण्याची नोंद करून ठेवली होती. म्हणूनच; हे सगळे सांग-ण्याला प्रपंच सुरू केला, तेव्हा विचारले होते की आनंदीचे गणित कुणी चुकवले ? मी की वासुदेवाने ? की आणखी कुणी ? आणि ही शंका वेळ पडली, तेव्हा तस-ल्याच प्रकारच्या प्रश्नाने माझ्यासमोर पुन्हा उभी राहिली. पुनः पुन्हा मनात येऊ लागले की ह्या सगळ्या प्रकारात मी विनाकारण तर गोवला जात नाही ? एकदा वाटले की ती म्हणते, त्याप्रमाणे खरोखरीचा मीही जबाबदार असेन. पण तसे असले, तरी परिणामी ते वाईट होते. भयंकर होते. ती समजत होती, तितके ते सोपे नव्हते. हे सगळे तिला सांगावे, विलंब न करता सांगावे आणि सावध करावी; असा विचार करून मी ऑफिस सोडले. आणि तिच्या दाराशी येऊन उभा राहिलो.

मी दिसलो, तेव्हा तिने विचारले, "तू इथं कसा ? तुला फार काम होतं ना ?"

"होतं. पण तू रागारागात निघून गेलीस–"

"मग त्याच वेळी यायचं." नेहमीप्रमाणे ती घोळ घालून बोलू लागणार, हे लक्षात यताच गंभीर होत मी म्हटले, "आनंदी, मला तुझ्याशी काही बोलायचं आहे."

"मग त्यासाठी एवढं गंभीर कशा-करता ?"

"विषयच तसा आहे."

"समजलं." माझ्याकडे पहात तिने विचारलं, "काय सांगणार आहेस ?"

शब्दांसाठी धडपड करीत मी म्हटलं, "तुझा आनंद मी समजू शकतो."–

"मग त्यात सहभागी हो. माझं कोड-कौतुक कर."

"तेही केलं असतं. पण हे सगळं तू वासु-देवाला कसं सांगणार आहेस ?"

"तुला सांगितलं ना; तसंच. लहर लागली, तर गणपती पावला; असंही सांगेन." आणि हे बोलताना ती स्वतःशीच हसली. तिचे हे बोलणे आणि हसणे मला मुळीच आवडले नाही. जबाबदारीचे दायित्व वासुदेवावर टाकून ती मला मोकळं करीत असली, तरीही आवडलं नाही. नाही, मुळीच आवडलं नाही. तिची लहर लागली, तर ती कुठे, केव्हा आणि काय बोलेल; त्याचा भरवंसा नव्हता. तिच्या-कडे रोखून पहात मी विचारलं, "आणि जन्माला येणारं मूल माझाच चेहरामोहरा घेऊन आलं तर ?" –माझा प्रश्न ऐकून ती दचकली. पण लगेच खांदे उडवून तिने माझा प्रश्न उडवून लावल्यासारखे केले. माझ्या-कडे पहात ती म्हणाली, "पुढचं पुढे. माझा मुलगा माझ्यासारखाही होईल."

"होईल. पण मी म्हणतो, तशीही शक्यता आहे."

"असू दे. आता उगाच शंकाकुशंका काढून माझ्या आनंदावर विरजण नको घालूस."

"पण आनंदी.

"माझं मी पाहून घेईन." आणि माझ्या-कडे पाठ वळवून ती आत चालू लागली. तिचे हे नवे स्वरूप मला आजच कळत होते. मी काही बोलणार तोच ती वळली आणि म्हणाली, "पुरुष आहेस. पुरुषा-सारखा वाग."

"म्हणूनच सारासार विचार करून सांगतो की आनंदी,–" पण मला पुरतं बोलू




शासकीय धोरणे (आणि धोरणी राज्यकर्ते) :२:

न देता ती म्हणाली, "जाताना तेवढा दरवाजा ओढून घे." आणि माझ्याकडे पाठ वळवून ती आत निघून गेली.

ही आनंदी नेहमीपेक्षा निराळी होती. बिनओळखीची होती. फार निराळी होती. मला न समजणारी होती.

कोळ्याच्या मादीने कोळ्याला खाऊन टाकावे, तसे हे चालले होते. * *

[२१]

दिवस संपल्यावर रात्र सुरू होताना पडणारा उदासपणा आता वातावरणात भरू लागला होता. आसावरीकडे पहात मी विचारले, "आता आत परतू या ना ?"

"तेच मी तुम्हाला सांगणार होते. पायांना थंडी वाजू लागली आहे. गजराला मी आत पिटाळले आणि शाल घेऊन यायला सांगितले. आसावरी बरी होऊ लागली, तशा ह्या साध्या साध्या गोष्टी मी विसरू लागलो होतो. गजरा शाल घेऊन आली, ती मी तिच्या पायावर पांघरली; आणि हलके हलके व्हील-चेअर घराकडे वळवली. बिछान्यापाशी व्हील-चेअर आणीत म्हटले, "जेवायला अजून वेळ आहे. तोपर्यंत तू आराम कर. फार थकलेली दिसतेस." तिच्या अंगावर पांघरूण घालून मी बाजूला होणार, तोच ती म्हणाली, "माझं राहू दे. मला एक सांगा,"— आणि माझ्याकडे पहात तिने विचारले; "तुम्ही कसल्या काळजीत आहा ?"

"कुठे गं ?"

"एकदा आरशात पहा. मग कळेल."

"तुझं आपलं काही तरीच" म्हणून मी उडवाउडवी केली, तो हॉलमध्ये फोन खणखणू लागला. धावत पळत येऊन मी फोन उचलला. फोनवर आनंदी होती. आणि घाबऱ्या घाबऱ्या ती मला काही सांगू पहात होती. "काय झालं ? काय झालं ?"—म्हणून मी गडबडत होतो आणि ती सांगत होती, "घाई कर. घात झाला. त्यांना कळलं."

"कसं ?"

"त्यांना सांगायला गेले. आणि ते एकदम खवळले. 'मला मूल होणं शक्य नाही. ह्या जन्मी तरी नाही, नाही, नाही' . म्हणून आरडाओरड करू लागले. मला व्यभिचारी, कुलटा म्हणाले. जाराचं नाव सांग, म्हणून अंगावर धावून आले. तुझं नाव घेऊन बदडू लागले. सहन केलं.—सहन केलं, पण शेवटी—भयंकर पिसाळलेत ते. तुला शिव्या घालीत बाहेर पडलेत. विश्वनाथ, विसू. . विसू, तुला मारायला निघालेत. कुठे तरी बाहेर जा. दडी मार. हा ऐकलास ? हा ऐकलास मोटार चालू झाल्याचा आवाज ! मोठमोठ्याने हॉर्न देत निघालेत. हॉर्न—हॉर्न. विसू घाई कर. घाई कर. कुठं तरी नाहीसा हो." तिने फोन बंद केला की माझ्या हातून गळून पडला, काही आठवत नाही . . .

सुसाटपणे धावत सुटू की घरातच दडी मारून बसू ? बाहेरच जातो. झुकांडी देता येईल; पण नको, नको. बाहेर पडेन आणि आयता त्याच्या हातात सापडेन. पण घरात तरी कुठे दडू ? पोटमाळ्यावर ? बाथरूममध्ये ? संडासात ? नको. नको. तो घरात येईल आणि नेमक्या ह्याच जागा हुडकील. पण तो घरात येईलच कसा ? मोठमोठ्याने हाका मारून मी नोकरांना बोलावू लागलो. पण कुणी ओ देईल, तर शपथ. हरामखोर साले ! गेले कुठे ? गेले कुठे ? घरचा मालक मरतो आहे आणि हे हरामखोर गेले कुठे ! सैरभैर होऊन मी खोल्या खोल्यातून धावू लागलो. धावत पळत गेलो आणि दरवाजे आतून बंद केले. 'काय झालं ? काय झालं ?' म्हणून आसावरी आतून ओरडू लागली, तेव्हा मी म्हटलं, "घात झाला. घात झाला. तो मला मारायला येतो आहे."

"कोण तो ?"

"आता प्रश्न विचारू नकोस. मला वाचव. मला वाचव. मारायला येतो आहे तो." आणि लपण्यासाठी कुठे जागा दिसते का, ते मी शोधू लागलो. बाहेर मोटारीचा हॉर्न कर्कश वाजला. आणि माझ्या रक्ताचे पाणी झाले. आला. आला. मला मारायला आला. कुठे लपू ? कुठे ? आणि मागचा पुढचा विचार न करता मी एकदम तिच्या पलंगाखाली शिरलो. मला कुणी वाचवले असते, तर हिनेच वाचवले असते. हुडहुडी भरल्यासारखा मी पलंगाखाली अंग चोरून बसलो होतो. 'काय झालं ? काय झालं ?. मला सांगा ?'—म्हणून ती आक्रोश करीत होती. आणि माझे दातावर दात वाजत होते. बाहेर मोठा थोरला आवाज झाला. आणि मी मेलोच, असे मला वाटले. पलंगाखालून ओरडून मी म्हटले, "मला वाचव. आसावरी, मला वाचव. राक्षसासारखा केवढा मोठा आवाज करीत तो येतो आहे. ऐकलास तू आवाज ? आता कुठच्याही क्षणी तो इथं येईल. मला मारील. आसावरी मला वाचव." मी थरथरा कापत होतो. बाहेर मोठा गलका चालू होता. 'बाहेर पडा. आधी बाहेर पडा. मी जिवंत असेपर्यंत कुणी तुमच्या अंगाला हात लावणार नाही.' आणि माझ्या बाजूने हात सरकला. हा कुणाचा हात ? तो एवढ्यात इथपर्यंत आला ? इथपर्यंत आला ? पण मी हे काय पहात होतो ? हा आसावरीचा हात कसा ? ती पलंगावरून खाली कशी उतरली ? पलंगाखालून मी पाहू लागलो. आणि आसावरी उभी असलेली पाहून माझा

अनुक्रमणिका

माझ्यावर विश्वास बसेना. पलंगावाहेर येत मी म्हटलं, "आसावरी—आसावरी !"

"हो मीच."

"फार उशीर झाला गं. तू बरी झालीस. पायावर उभी राहिलीस. पण वेडे, फार उशीर झाला. तो राक्षस मला मारायला येतो आहे. आला. आला."

"मी जिवंत असेपर्यंत कुणी तुम्हाला मारणार नाही. मी मरेन. मी मरेन. पण कुणाला तुमच्या अंगाला हात लावू देणार नाही."

"त्या लायकीचा नाही गं मी."

रस्त्यावरचा गलका वाढला. आणि पुन्हा मी घाबरलो. तिला घट्ट पकडीत म्हटले, "उशीर झाला. उशीर झाला. किती उशीरा तू बरी झालीस ? मी चाललो.—मी चाललो. तो माझा गळा घोटणार आहे" तिला धरून मी थरथरत उभा होतो. एवढ्यात खिडकीवरती एकदम काही तरी वाजले. आणि मी पुन्हा पलंगाखाली शिरू लागलो. पण आसावरीने मला पकडून ठेवले. आणि खिडकीकडे पहात विचारले, 'काय गं गजरा ?"

"बाई—बाई—तुमच्याकडे ते काका येतात ना—गणपतीवाले—त्यांच्या गाडीला ॲक्सिडेंट झाला लोकांनी त्यांना नेलं. उचलून नेलं."

"तू पाहिलंस ?"

"होय बाई. काकांना लोकांनी गाडीतून नेलं" आणि काकुळतीला येत गजरा म्हणू लागली, —"दादा दार उघडा. मला भीती वाटते."

काय घडलं असावं, त्याचा अंदाज येऊन मी सावध झालो. हुशार होत म्हटले, "खुळी कुठची ! एवढं भ्यायला काय झालं ?" आणि एखाद्या शूरासारखा दार उघडायला मी पुढे सरसावलो.

अचानकपणे सगळे बदलले होते. मी जिंकलो होतो. हरता हरता जिंकलो होतो. मरता मरता वाचलो होतो. जगलो होतो. जिंकलो होतो. जिंकलो होतो. आणि त्याच वेळी. . . .

## [२२]

हॉस्पिटलमध्ये आतल्या खोलीत मृत्यूशी झुंज देत वासुदेव तडफडत होता. आणि बाहेरच्या खोलीत भिंतीचा आधार घेऊन डोक्याला हात लावून मी उभा होतो. आनंदी शेजारी खुर्चीवर बसून अस्फुट हुंदके देत होती. तिच्या शेजारी वासुदेवाचे नातेवाईक असलेले हॉस्पिटलचे मुख्य डॉक्टर निर्विकार चेहऱ्याने बसून होते. आता सगळे संपत आले होते. मान खाली घालून मुख्य डॉक्टर आतल्या खोलीतून बाहेर आले आणि खुर्चीवर येऊन बसले, तेव्हाच मी हे ओळखले होते. त्यांचे मदतनीस डॉक्टर अजूनही प्रयत्नांची पराकाष्ठा करीत होते. लगबगीने बाहेर येऊन डॉक्टरना काही तरी सांगत होते. आणि पुन्हा धावत पळत आत जात होते. अपराधी चेहऱ्याने मी हे सगळे पहात होतो. आणि क्षणाक्षणाला भिजून जात होतो. वासुदेव आत तडफडत होता. आणि त्याच्या मरणाच्या यातना बाहेर मी भोगीत होतो. माझे हातपाय थंडगार पडत होते. आणि घामाने मी डबडबून निघत होतो. घेरी येईल, असे वाटले; तेव्हा भिंतीला पकडण्याकरता मी धडपडू लागलो. पण तेही जमेना. मुंग्या आल्याप्रमाणे हात बधीर झाले होते. उभ्या जागीच मी खाली बसलो. तेव्हा खुर्चीवर बसलेले डॉक्टर एकदम उभे राहिले. माझ्यापाशी येत म्हणाले, "तुम्हीच असं वागलात, तर तिनं कुणाकडे पहायचं ?" आणि बळेबळेच त्यांनी मला खुर्चीवर आणून बसवलं. इतका वेळ आवरलेलं रडू एकदम बाहेर फुटेल, असं वाटलं. वाटलं की डॉक्टरना म्हणावं, 'माझी अशी कुणी काळजी घ्यावी, अशा लायकीचा मी माणूस नाही. नादान आहे. नालायक आहे. दिसतो तितका चांगला नाही. वाटतो तितका भला नाही. आत जे काही घडतं आहे—' काय बोललो काही आठवत नाही. पण आनंदी एकदम उठून माझ्या शेजारी येऊन उभी राहिली. हातवारे करून मला काही सांगू लागली. गोंधळून मी आजुबाजूला पाहू लागलो, तेव्हा माझ्या कानाशी लागत डॉक्टर म्हणाले,—"तिला घेऊन आता एकदा आत जाऊन या." यांत्रिकपणे मी खुर्चीवरून उठलो, आणि आनंदीच्या दंडाला धरून तिला घेऊन आत जाऊ लागलो. माझे पाय लटपटत होते. आणि तरीही सांभाळून हलके हलके तिला आत नेत होतो. खोलीत पाऊल टाकले आणि ऑपरेशन टेबलावर वासुदेवाचा देह दिसला. आणि शॉक् बसावा, त्याप्रमाणे मी आनंदीचा दंड सोडून दिला.

हलके हलके पुढे झालो. . .

सगळे संपत आले होते. आता काही मिनिटांचाच प्रश्न होता. "तुम्ही एकदा हाक मारून पहा. शक्य आहे. सावध होतील."—डॉक्टर हे कुणाला उद्देशून बोलले ? आनंदीला की मला ? आनंदीलाच असावे. तिने तसे करावे, म्हणून मी तिच्याकडे पाहिले. पण ती पुढे झाली नाही. उलट ती अतिशय घाबरली. आणि माझ्या शेजारी येऊन माझ्या आधाराने उभी राहिली. न बोलता टक लावून आम्ही त्याच्याकडे पहात होतो. मध्येच त्याचे ओठ हलल्यासारखे वाटले, म्हणून मी पुढे झालो. पण तो भासच होता. भास होता, तेच बरे होते. कारण बोलला असता, तर





अनुक्रमणिका

आनंदीला आणि मला अशी एके ठिकाणी पाहून काय बोलला असता, त्याची कल्पनाच करवत नाही. वाईट वागलो होतो आम्ही. आणि सहन करीत होता तो. गुन्हा केला होता आम्ही. आणि चालला होता तो. डोळ्यातून वाहणारे अश्रू आवरीत मी पुढे झालो आणि त्याच्या उशागती ठेवलेल्या पाण्यातून चमचाभर पाणी घेतले. आनंदीच्या हाती चमचा देत म्हटले, "गणपतीचं तीर्थ म्हणून हे त्याला पाज. तीर्थाचा अनादर करणार नाही तो."

पण पाण्याचा थेंबसुद्धा आत गेला नाही. सगळे जसेच्या तसे बाहेर आले.

, आमच्या हातचे पाणी त्याने घ्यावे, एवढी आमची लायकी कुठे होती ! * *

[२३]

गोष्ट आमच्या चौघांची होती. मी, माझी बायको आसावरी, माझी मैत्रिण आनंदी आणि तिचा नवरा वासुदेव अशा चौघांची !

आता तिघांची चालू झाली आहे. . . .

मी, माझी बरी झालेली बायको आसावरी आणि आनंदी अशा तिघांची !

ही गोष्ट कशी घडणार आहे, ते अज्ञात आहे. कारण आताच कुठे सुरुवात झाली आहे. आणि सुरुवातीला काही कळत नाही, हेच मोठे दुःख आहे. त्यामुळेच माझ्या मनात वेडेवाकडे प्रश्न उभे राहतात. तसे पाहिले असता मूलभूत प्रश्न एकच असतो. बाकी इतर त्याची उपांगे असतात. ह्या प्रश्नाचे संयुक्तिक असे उत्तर मला अजूनही मिळालेले नाही. मागे एकदा ते नको आहे, असे मी म्हटले होते. पण आता ते मला हवे आहे. फार हवे आहे. फार फार हवे आहे.

● ● ●





अनुक्रमणिका

# बॅकसीटर्स

....त्याची स्टॅण्डिग ऑफर आहे मला....
मेल्याला चांगली गोरीगोमटी नि देखणी बायको आहे....
पोरंटोरं आहेत....तरी मला म्हणतो, तुला राणीसारखी ठेवीन
—परदेशात नेईन.... लुब्रा मेला!...

## प्रभाकर नेरूरकर

त्या दोघी फोर्टमध्ये मुंबई विद्यापीठाच्या कोपऱ्यावर चार नंबरच्या एक्स्प्रेस बसची वाट पहात मघापासून उभ्या आहेत. दोघी तशा तरतरीत, देखण्या व ताजातवाना दिसताहेत. देहाची उभारी दोघींची पण सारखीच आहे. उफाडेपणही दोघींचं कसं उफाळून आलं आहे.

संध्याकाळ मात्र फोर्टमधील ओली ओली, भिजलेली व विवस्त्र वाटते आहे. पाऊस दरम्यान केव्हातरी पडून गेलेला आहे आणि आकाश त्या देखण्या संध्याकाळने अंगावर चढवलेल्या पांढऱ्या-शुभ्र पेटीकोटप्रमाणे दिसत आहे. स्त्री-पुरुषांची भलीमोठी रांग वेडीवाकडी होऊन बसची वाट पहात उभी आहे. रांगेत त्या दोघीजणी विशेष उठून दिसताहेत. सगळेच जण कंटाळलेले आहेत. पण त्या दोघींच्या कंटाळवाणेपणातही एक विनकंटाळलेले औत्सुक्य व चैतन्य त्याना नकळत कसे ओसंडून राहिले आहे.

'काय ग, आज बसने खूपच उशीर केलान्. अंधेरीला पोचणार तरी केव्हा आपण जाऊन्..' पहिली.

'जाऊं दे ग; एक दिवस बसला उशीर झाला म्हणून काय झालं?..' दुसरी.

'बरी भेटलीस. .' पहिली.

'तूच भेटत नाहीस. .' दुसरी.

दोघी तशा नेहमी बसनेच अंधेरीला जात असतात. पण एकाच बसला आजच्या-सारख्या त्या क्वचितच भेटतात. दोघीही छान, गोड, डौलदार मराठी बोलतात. मधून मधून इंग्रजी सुद्धा. त्यांच्या किणकिणाऱ्या नादमय वाणीत मधुर संगीत आहे. नजरेत व हालचालीत निरागस नजाकत आहे. मरगळलेल्या रांगेत त्या दोघींच्यामुळे जिवंतपणा आला आहे. संध्याकाळ हळुहळू अंगावर रंगीबेरंगी ढगांची आखूडलांब वस्त्रे चढविते आहे; गळयात लखलखणाऱ्या लहानमोठ्या विद्युद्दीपांचा कंठा घालते आहे; डोळ्यांवरून काळोखाची पिसे हळूवार हातांनी फिरविते आहे; तिचा कैफ़ रांगेतील त्या दोघींवर कळत नकळत चढतो आहे. दोघीही एकमेकीला लगटून व चिकटून उभ्या आहेत. न सांधलेल्या जुळ्या वहिणीसारख्या. पण त्या वहिणी नाहीत, मैत्रिणी आहेत हे रांगेतल्या लोकांना कळून चुकले आहे.

इतक्यात चार नंबरची मागे ट्रेलर जोडलेली, भली लांबलचक, जाडजूड, दुमजली, नवी कोरी, लाल बस अगदी रिकामी येऊन एकदाची थांब्यावर उभी रहाते. रांगेच्या बऱ्याच पुढे दोघी असतात व पाळी येताच चट्चट् उड्या मारीतच त्या मधल्या जिन्याने वरचा मजला गाठतात आणि थेट तुरुतुरु चालत जाऊन बॅक्सीट्वर डाव्या कोपऱ्यात एकमेकीला पहिल्यासारख्याच लगटून व चिकटून बसतात. एकीच्या डाव्या हाताकडच्या काचेतून व दोघींच्या मागच्या बाजूच्या लांबट काचेतून डुचमळलेल्या घागरीतील पाणी सांडत जावं तशी मुंबई सांडत व सरकत जाते. बस अगदी गच्च भरून जाते व क्षणातच सुरू होते.

बस हरली आहे व आपण दोघी जिंकलो आहोत अशा जेत्याच्या तोऱ्यात दोघीजणी सुखावन बसल्या आहेत. फ्लोरा फाऊंटनला वळसा घालून बस फिरोजशहा मेथा रस्त्यावरच्या क्रॉसिंगकडे येऊन किंचाळत उभी राहते तोपर्यंत त्या दोघीपैकी कुणीच कुणाशी बोलत नसत. दोघी अनवधानाने अंतर्मुख झालेल्या दिसताहेत. मात्र दोघींचीही नजर एकटक खिडकीच्या काचांतून मुंबईचे वाहचांग धुंडाळण्यात गढून गेली आहे. दोघी आपल्या मनगटांतील घडाळ्यांकडे एकाच वेळी पहातात आणि 'अच्छा' म्हणत आपापल्या हातातील पर्सेस मांडीवर नीट ठेवून देतात. आपल्या बायकी छत्र्या हातानीच पायाकडे नीट टेकतात. पुनः किंचित काल बाहेर पाहिल्यासारखे करतात व दोघींचीही नजर चटकन् एकाच वेळी एकमेकीच्या नजरेला भीडते. क्रॉसिंग ओलांडून बसने वेग धरलेला असतो. वाऱ्याच्या गारगार झुळूक दोघींच्या अंगाला गोड गोड गुदगुल्या करीत असतात दोघीही खुषीत येतात. मघापासून जाणवणारा ताटकळत उभा राहण्याचा शीण आपोआप विरून जातो. पहिलीच जरा दुसरीपेक्षा अधिक बोलकी वाटते. निमगोरी. किंचित् कृशांगी व धीट दिसणारी. दुसरी गोरीपान, धष्टपुष्ट वाटणारी, मऊ मऊ केसांची, किंचित लाजरी बुजरी व शिष्ट भासणारी. खरं म्हणजे दोघींच्या स्वभावाचं अचूक मर्म इतक्या उतावीळपणाने जाणता येणं कठीणच आहे. दोघींच्या नजरा दोघींनाही धुंडाळताना आणखीही काही दोघींच्या पलीकडचे किंवा अलीकडचे धुंडाळताहेत. बऱ्याचशा त्या अनावर दिसताहेत व तरीसुद्धा एकमेकींना आवरून व सावरून घेताहेत. दोघींच्याही देहावर खानदानीपणाची तुकतुकी उजळन दिसते










आहे. बसच्या आत पेटलेले दिवे त्यात आणखी भरपूर भर घालतात. इतक्यात पहिलीला एक भली मोठी जांभई येते व दुसरी मिस्कील-पणाने तिच्या तोंडासमोर आपले दोन्ही गोरे नाजूक हात नेऊन टाळ्या वाजवते आणि खदखदून हसते. दुसरी भानावर येते आणि चटकन् तिच्या टाळीला टाळी देते. बसचा वरचा डेक पुरुषांनीच भरून गेला आहे व एक दोन मधोमध व अगदी पुढे बसलेल्या पारशी, ख्रिश्चन, गुजराती बाया वयाने बऱ्याच मोठ्या व अनाकर्षक आहेत. त्या दोघींचंही आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्यांकडे चोरटं सुद्धा लक्ष नसतं.

"चावट आहेस..." पहिली चेकाळून म्हणते.

'काय ग मेले मी चावटपणा केला..' दुसरी अधिकच चेकाळून विचारते.

'कुणाकडे पहातेस मघापासून ?

'म्हणजे ? तुझ्याकडेच..'

'मी काय पुरुष आहे ?...'

'आता मात्र चावटपणा तुझा चालला आहे हं...'

'अग सारखा मागे मागे असतो...'

'कुणाच्या ?...'

'आणखी कुणाच्या ?... माझ्या...'

'छान..मग जमव की. किती दिवसाची अशी बिनलग्नाची राहणार आहेस ? आणि तो तुमच्याच हौसिंग कॉलनीत रहातो ना ग ?..मग तर छानच ! राजाराणीचा संसार. प्रथम चोरटं (खोटं खोटं) प्रेम..मग खरं खरं प्रेम..लग्न..कर बाई एकदाचं ! मला की नई तुझ्याकडे पहावत नाही..सुटायला लागली आहेस..



'अग हो...' पहिली एकदम गंभीर होऊन बोलते.

'काय ग ?..' दुसरीला गंभीर व्हावंच लागते.

'तो घनश्याम मडगावकर तुला आठवतो का ग ?

'इश्श ! न आठवायला काय झालं ? '

'टाईम्स ऑफ इंडियात तो कामाला आहे. कुठल्या तरी खात्याचा मॅनेजर म्हणून...'

'मग ? '

'आणि तुझं तरी काय ग ?.. तुझी अंगकाठी बारीक म्हणून दिसून येत नाही. पण तू सुद्धा काही अगदी कुक्कुलं बाळ नाहीस. माझ्याच वयाची आहेस ज़वळ ज़वळ. तू तरी कुणासाठी थांबली-आहेस ?..'

'मी कुण्णासाठी थांबलेली नाही व माझ्या मागे मागेही कुणी येत नाही...'

'तुझ्या पुढे पुढे येतात वाटतं ?..'

'पुरे ग तुझा चावटपणा. पैण मग घनश्यामचं काय झालं ?..'

'काय होणार ? टाईम्सच्या थांब्याकडे बस थांबली की येईल बघ तो बसमध्ये आत.."

'खरंच की काय ?

'अगदी खरं. पण आज मला त्याची पर्वा नाही. तू बरोबर आहेस. नाही तर सरळ येऊन बॅक् सीटवर बसला असता अन् अंधेरी येईपर्यंत हळूहळू मला येऊन भिडला असता. इतका लोचट पुरुष मी पाहिला नाही बाई...'

'तुझं काही तरीच. अग, त्याला तू हवी आहेस...'

'पण मला तो कुठे हवा आहे ?

'मग काय तू अशीच बँक ऑफ इंडियात खितपत पडणार आहेस ? बँक काय तुझ्या-वर व्याज थोडीच देणार आहे ?

'हा मात्र तुझा भलताच चावटपणा हं...मात्र एक बरं आहे '

'काय ग ? '

'तुम्हा रिसेप्शनीस्ट बायांचं बरं. दररोज कोण ना कोण तरी भेटतोच. आम्ही काय ? अकाऊण्टण्ट. टणटणत नि धुसफुसत दिवस काढणाऱ्या. मी आपली तुला हसरी खेळकर बाहेरून दिसते आहे. पण आतून आग लागली आहे बघ माझ्या जीवाला. '

'आणि माझं तरी काय ? तुला आतून आग लागली असेल तर मला बाहेरूनही आग लागली आहे. शिवाय एकच आग नव्हे तर आणखी आगाच आगा.

'हे मात्र तुझं आगाऊपण हं...तुला आग लागायला काय झालंय् ग ? '

म्हणजे काय तुलाच एकटीला आग लागते ? पण तुझी आग विझवायला घनश्याम तरी तुझ्या मागे मागे येतो. मला आग लावून मात्र लोक जातात पण ती विझवायला कुणीच येत नाही ग..'

"खरंच !...'

'अगदी खरं. पण थांब हं. टाईम्सचा थांबा आला...'

बस थांबते. दोघीही काचातून जितकं काही टक लावून पहाता येईल तितकं पदपथावरील लांबच लांब रांगेकडे पहातात. घनश्याम मडगावकर केव्हाच अदृश्य झालेला असतो. दुसरी किंचित् अस्वस्थ होते पण लगेच उसना आव आणून सुस्कावलेपणाने म्हणते.

'बरं झालं बाई. आज तरी सुटले एकदाची. '

'कोण ? तू की मी ? पहिली उगीचच तिला खिजवते.

'तुला कळलं का ग ? ' दुसरी पहिलीला प्रश्न विचारते व सारा विषयच बदलून टाकते.

'काय ?

'आपल्या वर्गात कॉलेजात ती हळदणकराची गोरी गोरी पान उंच भरल्या देहाची लाजवंती होती.

'हो..छान हसायची.

'तिनं एका पंजाब्याबरोबर लग्न केलन्. काय मजेत रहाते ती खारला. नाही तर आपण.

'तिच्याबरोबरच्याच. नाही का ग ?..'

'नाहीतर काय ?

'सांगू तुला ?

'सांग ना.

'आपण मराठी मुली की नाही धाडस करीत नाही. घनश्याम मडगावकर माझ्या मागे मागे येतो म्हणून काय मी त्याची होऊ ? त्याच्याकडे काय आहे ? फत्तरे ? अग, घरातच त्याच्या इकडतिकडची पाचपन्नास माणसे असतील. मी काय त्यांचं उष्ट खरकटं दिवसभर काढीत बसू ? की त्यांचे दिवसभर कपडे धूत बसू ? की त्यांचे रात्रभर विछाने घालीत उभी राहू ? काही किंचित् प्रायव्हसी तर आहे का त्याच्या घरात ? आमच्या ब्लॉकच्या खिडकीतून त्याच्या ब्लॉकमधील सगळचा घडामोडी दिसतात..दिवस रात्र आपली जेवणं नि झोपणी चाललेली असतात..'

'पण तुला काय त्यांचं ? सरळ सांगायचं घनश्यामला निराळं बिऱ्हाड कर म्हणून..'

'कमाल आहे हं तुझी ? अग तसं मला

म्हणवलं असलं तर मी नसतं का आमचंच घरदार सोडून स्वतंत्र जीवन जगले असते ? पण निसटता येतंय् का ? तूच सांग..'

'आणि मला तरी..माझ्या पगारावर घरातल्या सगळ्यांचा डोळा.

"तुझं पण काही तरीच हं. तुझ्यात °डॅश नाही. तुला थोरले भाऊ तरी आहेत आणि सगळे मिळवते नि संसाराला लागलेले आहेत. त्यांच्या बायका कशा गुबगुबीत, लुसलुशीत, नि आपल्याच मस्तीत घरात मजा मारतात. तू आपली मरमर मरतेस नि पुन: घरचं काम करतेसच. माझं तसं नाही. अग, घरात मीच काय ती कर्तीकरवती व मिळवती. तीन वहिणी पाठीवर. त्यांचं होईपर्यंत मला कसं हालता येणार, पळता येणार, काय करता येणार तूच सांग.

'दोघीही आपण एकाच वसमध्ये आहोत..' ती म्हणते नि एकदम गच्च डोळे मिटून गप्प रहाते.

चार नंवरची वस एल्हाना माहीमची खांडी ओलांडून वांद्रयाच्या दिशेला वळलेली असते. वरच्या डेकवर वरीच नवी माणसे चढलेली असतात व जुनी अदृश्य झालेली असतात. पाचसहा कॉलेज कन्यका एकदम घोळक्याने आरडाओरडा करीत व हसत खिदळत डेकवर जागा धुंडाळत पुढे मागे पळत असतात. दोघी जणी थेट या दोघींना लगटून त्यांच्या शेजारी बसतात. गुजराती, ख्रिचन, मराठी मुलींची ती सरमिसळ असते. त्यांच्या आगमनाने वसच सायंकालीन प्रौढपण अकस्मात हरवून जात व ती त्या पोरींप्रमाणेच धावत पळत तुरुतुरु अल्लडपणाने रस्ता कापीत आहे असं भासतं. त्या दोघीही जणी आपल्या तंद्रीतून हडबडून एकदम भानावर येतात. पुढे मागे विखुरलेल्या त्या पोरींकडे काही काळ टक लावून पहातात व त्यांच्या निरागस कुमार वयाचा मनातल्या मनात दोघीनाही एकदमच हेवा वाटू लागतो..

'मजा आहे नाही ग या पोरींची.. काळजी नाही. कटकट नाही, घरी जायचं न् सरळ पाटावरून ताटावर वसायचं..

'हुं..' दुसरी भलतीच अंतर्मुख झालेली असते..

'पण काय ग ? या इतका वेळ कुठं उनाडत होत्या ? नऊ वाजायला आलेत तरी ?

'तू कशी उनाडायचीस..तसंच ? आणि शिवाय तू मला सांग..आपण आता किती वाजता घरी जाऊन पोचणार आहोत ?

'आपली गोष्ट वेगळी म्हटलं..

'कशी ?.. त्या तरी आपल्याला काय म्हणतील ?..'

'काय म्हणतील ?..'

'आपल्या वयाची एक तरी बाई वसमध्ये दिसते आहे का ?..'












'खाली डोकावून बघ. खूप असतील..

'बघते हं..तुझ्यापुढे बोलायची मात्र सोय नाही बाई..'

'तर मी मघाशी माझ्या बँकेचं सांगत होते.. की नव्हते?..'

'अग कुठं?..स्वप्नात आहेस.. मघापासून बोलतीस तरी? सारखी बाहेर पहातेय्स?.'

'खरंच का ग?..'

'आपण एकमेकींना विसरून गेलो होतो..'

'ते राहू दे.. तुला वाटत असेल मी बँकेत काम करते नि माझे खूप पैसे बँकेत असतील..'

'होयच मुळी.. कां वाटू नये?..'

'वाटावं.. माझं काही म्हणणं नाही. पण खरं सांगते. मला उलट कर्जच आहे.. घरच्या माणसांसाठी. तुझं बेरं. तू रिसेप्शनिस्ट आहेस. तुझं चहापाणी पैसा खर्च परस्परच सुटत असेल..'

'म्हणजे?'

'खोटं बोलू नकोस. शेटीया भाटीयांबरोबर खैबरमध्ये जाताना मी काही तुला कमी वेळा पाहिलेलं नाही..'

'म्हणजे मी त्यांच्या मागून जातेस म्हणतेस?.. अग तेच लोचटासारखे माझ्या मागे लागतात. पण मनातून घाबरतात हं मला. घाऱ्या डोळ्यांची ही गोरीपान मुलगी मोठी घट्ट नि खट्ट असेल अशी मनातून त्यांना जाणीव असते. मीही जरा तशीच तोऱ्यात नि शिष्टपणानंच त्यांच्याशी वागते. तितकीच कधी कधी मस्त लंच किंवा चहापाणी सुटतं.. आपलं काय जातं?'

'अगदी रामाची सीताच शोभतेस..'

'शोभतेच मुळी. नाहीतर मी केव्हाच माझ्या बॉसबरोबर पळून गेले असते. त्याची स्टँडींग ऑफर आहे मला. बघितलयस् त्याला. काळा केसाळ कुत्रा. लुब्रा! आपल्या एअरकंडीशन्ड केबिनमध्ये डुकरासारखा बसलेला असतो. मेल्याला गोरीगोमटी व देखणी बायको आहे. पोरंटोरं आहेत. मला म्हणतो मी तुला फ्लॅट घेऊन देईन. राणीसारखी ठेवीन. परदेशात नेईन. मस्तीत नि सुस्तीत ठवीन. रिसेप्शनीस्टची मॅनेजर करीन. दुप्पट पगार–तिप्पट भत्ता. चौपट मजा. मजाच मजा. माझ्याकडे कसा लाळ घोळीत बघत असतो..'

'मग?.. तू काय अगदी संत सखूच रहाणार आहेस? मला तर वाटतं..'

'काय वाटतं?..'

'आपण आता दोघींनी काही तरी धाडस करायला हवे..'

'तू तुझ्या बॉसबरोबर पळून जा. मीसुद्धा अशीच गाठते कुणाला तरी..'

'मडगांवकरला?..'

'जमल्यास त्यालाही..'

'चावट..'

'तूही काही कमी चावट नाहीस..'

'किती सैल बोलतोत् ग आपण..'

'अग, बोलतोत् म्हणून तर वेळ जातोय्..तितकीच मजा..'

'बाहेर बघ..'

'हो ना..जुहू.. लायन्स गार्डन गाठलन् बसनं..मग पार्ला..नि अंधेरी..'

'अंधेरी कसली? अंधारच तो.. कधी म्हणून बस अंधेरीला जाऊन पोचूच नये असं वाटतं बघ.'

'मलाही थेट तुझ्यासारखंच वाटतंय् बघ..'

'आज आपलं दोघींचं इतकं कसं काय जुळलं ग? .खूप खूप खूप दिवसांनी नाही?

'हो ना! कसे योगायोग असतात नाही..'

'अग ते बघ..हेलिकॉप्टर उतरतय्.. पार्ले फ्लाइंग क्लबच्या विमानतळावर.

'अग हो.. खरंच.. मला की नाही विमान उतरताना नि पुनः वर चढताना पहायला फार आवडतं..लहान मुलांसारखं..'

'मलासुद्धा..'

'मुलं? आपल्याला सुद्धा एव्हाना एक दोन मुलं झाली असती. तुला काय वाटतं?..'

'ईश्श! तीनसुद्धा झाली असती..

'पण तीनच्या पुढे नाही हं.. तुला ती मीरा गंभीर आठवते. आपल्याबरोबरची. ही अशी लठ्ठ फुगली आहे. तसाच तिचा तो कारवारी नवरा. मोटरवाला. अक्षरशः मोटारीत तिला फरंट सीटवर दोन्ही हातांनी कोंबतो. नि मागच्या सीटवर दोघांची अर्धा डझन पोरं. लठ्ठ-टुणटुणीत. भोपळ्यासारखी गरगरीत. कॉलेजमध्ये असताना ही मीरा आपल्या फॉर्मला किती जपायची. आठवतं?..'

'आठवतं! लग्नानंतर आपलंसुद्धा कदाचित् तिच्यासारखंच झालं असतं..'

'खरंय् तुझं म्हणणं. लग्न?.. नको ग बाई..'

'खरं की काय? मी मात्र लग्न करणार आहे. केव्हा जमतं ते आता पहायचं?...'

सांगू?..रागवणार नाहीस ना?..

'सांग ना..मघापासून कितीशी रागावले?..'











'तुझंही लग्न होणार नाही नि माझंही लग्न होणार नाही.'

'का ?

'तुझं वय किती ?

'तुझ्याइतकंच की.

'किती वर्षे नोकरी करते आहेस.

'तुझ्याइतकीच.'

'नोकरी एके नोकरी हेच आपलं भाग्य. मी तुला सांगून ठेवते.'

'तुझं आपलं काही तरीच.

'घर आपलं आता अगदी जवळ आलं. अंधेरी गाठलीन्सुद्धा बसनं.'

'किती वाजले ग ?'

'ते तू न विचारलेलं बरं ! आपण काल वेळ स्थळ विसरून जाऊया.'

'आणि काय करूया.'

'खरं सांगू?'

'सांग.'

'मरूया..

'तुझं डोकं बिकं फिरलंय् की काय.

'काही फिरलेलं नाही..ठीक शाबूत आहे..पण बाई ग, तू मला खरं खरं सांग. बस अंधेरीत आली. घर जवळ आलं. संपली एकदाची प्रवासाची दगदग. जीव आंबून गेला. आता तो ताजातवाना तरतरीत होईल असं काही तुला आतून वाटतं आहे का ? .खरं सांग हं. तोंडदेखलं नको..'

'नाही, वाटत. उलट कसं जड जड वाटतं'

'मला तर बाई आतून कसं पोकळ पोकळ नि रिकामं वाटतय्. म्हणून तर मी बसने येते. तेवढाच वेळ निघून जातो.'

'मी पण.

'एरवी पैसे कुणासाठी साठवून ठेवायचे आहेत ? ज्यांच्यासाठी करायचं ती मंडळीसुद्धा आणखी काही वर्षांनी आपल्याला विचारणार नाही. ढुंकूनसुद्धा आपल्याकडे बघणार नाही.'

'आणि काय ग, त्यावेळी आपण दोघीजणी बघण्यासारख्या तरी राहिलेल्या असू का ?'

'असू आणि नसू.. ती असा काही हेल काढून बोलली की मघापासून चाललेल्या दोघींच्या संभाषणाला ती बससारखाच ब्रेक लावीत होती.

किंचाळत नि कुरकुरत त्याच क्षणाला बसही अंधेरीच्या शेवटच्या थांब्यावर उभी राहिली. रात्र कशी नवनवा शिणगार करून साजगामाठी उतावीळ झालेल्या यौवनमस्त साजणीसारखी नखरेल व चंचल दिसत होती. त्या दोघींची पावले मात्र काही काळ एकाच पदपथावरून थिजून गोठून गेलेल्या बर्फाच्या लादीसारखी पुढे पुढे सरकत होती. थोडे पुढे गेल्यावर कोपऱ्यावर त्यांची दोन विरुद्ध दिशांना रात्रीपुरती पांगापांग होणार होती. कोपऱ्याकडे वळता वळता दोघींनीही एकाच वेळी नजर लांब करून थांब्यावर उभ्या असलेल्या चार नंबरच्या अंधेरी बसकडे आशाळभूतपणाने पाहून घेतलं. बसच्या मागच्या तावदानी काचेतून त्यांची बॅकसीट पुनः एकदा त्यांच्या नजरेत भरत होती.

हळूहळू माणसे बसमध्ये चढत होती.

बॅकसीट मात्र रिकामीच होती. आणि ती तशी रिकामीच रहावी असे त्या दोघींच्याही मनात येतं न यतं तोच वळण संपलं होतं व त्यांच्या हाऊसिंग कॉलनीच्या वेगवेगळ्या रस्त्यांवर त्यांची पावले वेगवेगळी पडत होती. दिव्यांच्या प्रकाशातून जात असतानाही ती दोघ अंधारीच्या अर्धवट अंधारातून हळुहळू संपूर्ण गिळली जात होती. • • •







अनुक्रमणिका

(पृष्ठ १६२ वरून–**जिणे न माझे**...)

शैशवापासूनच मला हॉलिवुड ठाऊक होते. तेथले यश, कीर्ती, रोमांचकारिता व सुंदर पुरुष व पैसा ह्या साऱ्या गोष्टींबद्दल मनात कुतुहल होते. चित्रपटविषयक मासिके उसनी आणून त्यातली चित्रे काढून भिंतीवर लावण्याचा छंद होता माझा. नंतरच्या दहा वर्षात त्यातल्या काहींना मी शय्यासोवत केली होती.

एका रात्री भाऊ मला म्हणाला जेम्स कॅग्ने उद्या कसल्या तरी निधीसाठी येणार आहे. मला तो आवडायचा. तो मर्दानी कामे करायचा. पुरुषाने तसेच असावे, वागावे असे मला वाटायचे. पण त्याच्या कार्यक्रमाचे तिकीट होते पंचवीस डॉलर. माझ्याजवळ वा माझ्या कुणाच मित्राजवळ येवढे पैसे नव्हते. पण मला जेम्स कॅग्नेला पहायचे होते. मला अन्न गोड लागेना.

आणि अखेर चमत्कार घडला. कॅग्नेच्या स्वागतार्थ गावच्या प्रवेशद्वारापाशी अनेक माणसे जमली होती. मीही त्यात होते. तेवढ्यात एका सोळा वर्षाच्या मुलाचे लक्ष माझ्याकडे गेले. तो म्हणाला, "मोठी चुणचुणीत दिसतेस. तुला शो पहायचाय ? कॅग्नेने माझ्या वडिलांना दोन तिकिटं दिली आहेत बघ !"

त्याने पिवळी तिकिटे दाखवली. ती खरी वाटत होती. पण मी सावध होते. अनुभव मला घडवीत होते.



"मी काय करू ?"

तो खाली वाकला. म्हणाला "चुंबन ! एखाद दुसरं. फुकट शो पहायचा. उत्तम जागी बसून पहायचा."

"नाही ! धन्यवाद" म्हणत मी परत फिरले. पण तो मोह मोठा होता. मी वळून पाहिलं. त्याने तीच सूचना इतर दोन तीन मुलींना केली. त्या दूर निघून गेल्या. शेवटी तो मजजवळ आला. म्हणाला ठीक आहे ! नुसती कंपनी तरी देशील ?" मी आत गेले. जायलाच हवं होतं.

काही वर्षांनी जेम्स कॅग्नेबरोबर नायिका म्हणून माझा करार झाला. हे घडेलसे तेव्हा वाटले नव्हते. शो संपल्यावर आम्ही बाहेर आलो. तो मुलगा म्हणाला "तुम्ही सुंदर आहात. उत्तम अभिनेत्री व्हाल."

अनेकांनी हेच ऐकवलं. तेव्हा मी वडिलांना विचारलं. "तुझ्या चेहऱ्यापेक्षा तुझ्या मनावर अधिक विश्वास ठेव मुली" ते म्हणाले. माझे समाधान झालेले दिसले नाही तेव्हा ते म्हणाले "हॉलिवुडच्या दृष्टीने तू फार कोवळी पोर आहेस" आणि ते हसले.

मी शाळत होते तेव्हाची गोष्ट. असेन बारा तेरा वर्षांची. मिस् वॉरेन नावाची माझी इंग्लिश विषयाची शिक्षिका होती. नाट्य-दिग्दर्शन करण्याची तिला दांडगी हौस होती. तिचा भाऊ जॅक्सन हा एकांकिका लिहीत असे. आम्ही शाळेत ती बसवीत असू. अशाच एका एकांकिकेत मी पहिली भूमिका वठवली. टॉमस टायरन नावाचा एकच मुलगा त्यात होता. त्याच्या पत्नीची भूमिका मला देण्यात आली होती. कामासाठी बाहेर पडताना टॉम पत्नीचे चुंबन घेतो असा भाग होता. तो करताना मी त्याच्या गळ्याभोवती हात घातले. त्याला जवळ ओढले व ओठांवर ओठ टेकले. त्याला हे नवे होते. पण हवेही होते. पण मिस् वॉरेनला ते आवडले नाही. मला ती भूमिका समजली नाही अशा समजुतीने तिने मला ती समजावून दिली.

माझी ती भूमिका पुष्कळांना आवडली. व स्तुती तेवढीच ऐकायची ही सवय मला तेथे जडली. माझ्या वास्तववादी भूमिकेने मिस् वॉरेन माझी चाहती बनली.

जॅक्सनने माझ्यासाठी नवे नाटक लिहावे व त्यात मला एखादी चांगली भूमिका द्यावी असे मला फार उत्कटतेने वाटू लागले. मी आग्रही भूमिका घेतली. त्याच्या नव्या नाटकात पंगु झालेल्या व चाकांच्या गाडीत बसून सर्व व्यवहार करणाऱ्या एका मुलीची भूमिका होती. 'ती बदला' मी आग्रह धरला. त्याच्या घरी गेले. शब्दरूप पात्रांना सजीव करण्याची किमया मला मोलाची वाटली. मी त्याचे चुंबन घेतले. तो वयातीत होता. भारावून म्हणाला, "माझ्याशी लग्न करशील ?" 'मला खूप शिकायचय्' मी म्हणाले. तो संकोचला. नंतर त्याने बदली करून घेतली व मिस् वॉरेनही भावाबरोबर निघून गेली.

(क्रमशः)

अनुक्रमणिका






**प्रथम पारितोषिकाची विनोदी कथा**




—भालचंद्र साहानी

गादीतला बाहेर आलेला कापूस नाकात गेला आणि फटाफट शिंका येऊन धामणपूरचे माजी महाराज झोपेतून खडबडून आणि बडबडून (म्हणजे शिव्या देत) जागे झाले. संस्थाने विलीन झाल्यावर तो संस्थानी थाटही गेला आणि त्याबरोबरच झोपेतून जागे करणारे ते भाटही गेले. संस्थानिकाची गादी गेली नि उरली ती ही कापूस बाहेर आलेली गादी. चला, हेही थोडं नव्हतं. निदान झोपेतून जागं तरी होता येत होतं ! विनखर्चानं.

आपल्या अडीचशे पौंडाच्या (गैरसमज नको. पूर्वीचे चारशे पौंड) देहाला मोठ्या कष्टाने आळोखेपिळोखे देताना महाराजांची नजर समोरच्या गजराच्या घड्याळावर खिळली होती. बेटं वर्षानवर्षे गजर न करता मुकाटपणे चालत होतं. त्या विनोबा भाव्यांसारखं. महाराजांना ते घड्याळ आपटून फोडून टाकावं असं अनेकदा वाटलं पण इलाज नव्हता. त्या घड्याळात गजर होत नसला तरी त्या घड्याळाची गरज होती. कारण सबंध वाड्यात आता तेच एक घड्याळ उरलं होतं. बाकीची इतर सामानाबरोबर केव्हाच विकली गेली होती. नुसत्या ह्या आठवणीनेच महाराजांना भडभडून आलं आणि बराच वेळ ते खिन्न होऊन बिछान्यावर बसून होते. झोपेत कमरेखाली सरकलेला आपला चोळणा सावरताना तर त्यांच्या दुःखात अधिकच भर पडली. त्या चोळण्याला जागोजाग ठिगळं लावलेली होती. त्या कोणा एका पोलादी पुरुषाने भारताच्या नकाशावरली ठिगळं पुसली आणि आता ती आपल्यासारख्या छोट्याशा संस्थानिकांच्या चोळण्यावर जमा झाली, दुसरं काय !

तसं धामणपूर संस्थान नगण्यच. माइक्रोस्कोप्‌मधून पाहिल्यावर भारताच्या पूर्वीच्या नकाशावर डासाच्या अंड्याएवढा जो एक ठिपका दिसेल तो म्हणजे आमच्या महाराजांचं संस्थान. (कोंबडीची अंडी बाकीच्या महाराजांची ! चालायचंच...जसा पूर्वज तसा ऐवज !) पण निदान अधिकाराबरोबर थोडसं बऱ्यापैकी उत्पन्न तरी तेव्हा होतं. आता काय उरलं ? महाराजांना मिळणारा वार्षिक तनखा हिशेबात घेतला तर त्यांची मासिक प्राप्ती होती निव्वळ दोनशे त्याण्णव रुपये. एवढ्या तुटपुंज्या उत्पन्नात वाढत्या महागाईशी दोन हात करणे म्हणजे नुसता वात होता. उगाच का महाराज कोंबड्या बाळगून होते ? ज्यांनी प्रजा पाळली त्यांच्यावर आता कोंबड्या पाळण्याची पाळी आली. दैवदुर्विलास तो आणखी कोठला ? महाराजांनी आपल्या वाड्यालाही भाड्याला लावला होता. वाड्याच्या चवथ्या भागात म्हणजे एकूण दोन दालनात ते स्वतः राहत. उरलेल्या एका दालनात एक गवळी आपल्या म्हशी बांधीत असे (हा महाराजांचा धूर्तपणा ! भाड्याबरोबर दुधाचा फुकट रतीब आला.) आणखी एका दालनात सरकारविरोधी असलेल्या एका पक्षाची कचेरी थाटलेली होती (सरकारवर सूड उगवण्याचा महाराजांचा खाक्याच और. आमची संस्थानं गिळंकृत करता काय ? मग पहाच, एक दिवस आमच्या आश्रयाला असलेला तुमचा विरोधी पक्ष तुम्हांला कसा गिळून बसेल तो !) हा झाला अर्ध्या वाड्याचा हिशेब. उरलेल्या अर्ध्या वाड्याचा प्रश्नच नव्हता; कारण तो केव्हाच कोसळला होता. तो पुन्हा उभा करायला तशी काही हरकत नव्हती; पण मग दहा वर्षे महाराजांना नुसती हवा खाऊन जगावं लागलं असतं.

सकाळची गार हवा लागल्याने महाराजांना धूम्रपान करण्याची तलफ आली. जवळच्याच टेबलावर ठेवलेला 'स्टेट एक्स्प्रेस'चा डबा त्यांनी उचलला आणि रुबाबात तो खोलून त्यातून एक हिरव्या धाग्याची तोकडी विडी बाहेर काढली. इतक्यात त्यांना कसलातरी संशय आला. डब्यातल्या विड्या मोजल्यावर त्यातली एक विडी कमी झाल्याचं त्यांच्या लक्षात आलं. रागाने ते विडीसारखे हिरवे-पिवळे पडले. वाड्याच्या भिंती भेदून जाणाऱ्या (तशी अडचण

'दीपावली'ला यंदा पंचवीस वर्षे पूर्ण झाल्याच्या निमित्ताने 'दीपावली'ने आपल्या रौप्य-महोत्सवी वर्षात काही नवे उपक्रम केले त्यातच 'विनोदी साहित्य 'स्पर्धे'चाही अंतर्भाव होता. 'स्पर्धे' बाबतच्या आमच्या आवाहनाला तरुण नव्या लेखक लेखिकांनी चांगली साद दिली. आमच्याकडे कथा-लेख-एकांकिका मिळून ८७ लेखन प्रकार आले. त्यांचा निर्णय खालीलप्रमाणे जाहीर करीत आहोत:–

**पहिले पारितोषिक (रु. १२५.००)**

श्री. माधव अत्रे, पुणे (सुखी माणसाचा सदरा) आणि श्री. भालचंद्र साहानी, मुंबई (अवमूल्यन) यांजमध्ये विभागून.

**दुसरे पारितोषिक (रु. ७५.००)**

श्री. अनिल फळणीकर, मुंबई (क्रिकेटर, अमेरिकन अध्यक्ष, सिनेनट व आमचे साहेब) आणि श्री. अशोक मोटे, नागपूर (ब्रह्मचर्य हेच जीवन आणि...) यांमध्ये विभागून.

**तिसरे पारितोषिक (रु. ५०.००)**

श्री. शाम शिराळकर, पुणे (आमची भान-गडची सहल) आणि श्री. पंडित क्षीरसागर, पुणे (विनयभंग) यांजमध्ये विभागून.

उपरोक्त यशस्वी स्पर्धकांचे आम्ही मन:पूर्वक अभिनंदन करतो. (स्पर्धेचा निर्णय वृत्तपत्रांतूनही जाहीर झाला होता, पण त्यात श्री. पंडित क्षीरसागर यांचे नाव चुकून 'पंडित महाजन' असे पडले होते.) पारितोषिकांची रक्कम लौकरच चेकने रवाना करण्यात येईल.

यशस्वी ठरलेल्या साहित्यकृतींपैकी पहिल्या दोन पारितोषिकांचे साहित्य या दिवाळी अंकात प्रसिद्ध केले आहेत. तिसऱ्या पारितोषिकाचे साहित्य डिसेंबर १९६९ च्या अंकात प्रसिद्ध होईल.

'विनोदी साहित्य स्पर्धे'त भाग घेऊन आमच्याशी सहकार्य करणाऱ्या सर्व लेखक मित्रांचे आभार !

**—संपादक**

---

नव्हतीच. भिंतीना भेगा आधीच पडल्या होत्या.) आवाजात ते गरजले, "स. र्ज्या.

अर्धे मिनीट गेले आणि त्यांचा नोकर सर्जेराव गडबडीने आत आला.

"जी सरकार. " त्याने सरकारस्वारीची नजर चुकवीत विचारले. त्यावेळी त्याच्या तोंडातून थोडासा धूर बाहेर पडत होता.

"सर्ज्या. .चोरा. तुझ्या तोंडातून धूर बाहेर पडतोय.

"धूर नाय सरकार. " एक गुळमुळीत हास्य करीत सर्ज्या (जपून) उद्गारला, "बाहेर धुकं पडलीया.

"अस्सं ! आणि ते तुझ्या नाकातोंडात भरून राहिलेय. चोरा माझ्या डब्याला हात लावलास की नाही ?"

'नाय बा-! विडीची शप्पत.

महाराज ताडकन उठले आणि त्यांनी सर्ज्याचा कान पकडला. त्याबरोबर कानांच्या मागे अर्धी विझवून ठेवलेली विडी त्यांच्या हाताला लागली. सर्जाच्या नाकातोंडातून उरलासुरला धूर भपकन बाहेर पडला.

"गाढवा. .मालकाची चोरी करतोस ? आणि वर पुढाऱ्या-सारखं खोटं बोलतोस ?" ती अर्धी विडी त्याच्या तोंडावर मारीत महाराज ओरडले, "तुझा ह्या महिन्याचा अर्धा पगार कापला आहे. समजलास ?"

जमिनीवर पडलेली विडी हस्तगत करीत सर्जा पुटपुटला, "राह्यलेला अर्दा मिळाला तरी मस्त जालं." त्याचा आठ महिन्याचा पगार थकला असावा हे त्याच्या थकलेल्या मुद्रेवरून कळून येत होतं.

निरुत्तर झालेले महाराज तोंडातल्या तोंडात गुरगुरले, "समजलं. .समजलं. .आता चालता हो आणि राणीसरकारना माझा बेड–टी आणायला सांग. काय सांगशील

"सरकारचा बड. .बेड पॅन. " सर्जा गडबडला.

"बेड पॅन. " महाराज किंचाळले, "सर्जा तुला हंटरने फोडून काढला पाहिजे. फुकट एवढे दिवस चाकरी केलीस. "

"खरं हाय ! फुकटच. सर्ज्याचे सहजोद्गार.

महाराजांनी त्याच्याकडे खाऊ की गिळू अशा नजरेने पाहिले. शेवटी राग गिळून ते म्हणाले, "तुझ्या मध्यड टाळक्यात इंग्रजी शिरत नसेल तर मराठीत सांगतो ऐक. .माझा बिछान्यातला म्हणजे तोंड धुण्यापूर्वीचा चहा आणायला सांग. चल. पळ.

सर्जा बाहेर गेला. जाता जाता त्याने म्हटलेलं, "गाडवंमांजरं तरी कुठं त्वांड धुत्यात?" हे वाक्य महाराजांना ऐकू आलं नाही म्हणून बरं ! नाहीतर त्याचे मशेरी लावलेले दात तोंडात राहते ना.

महाराजांचे विडीचे झुरके मारून झाले आणि आता त्यांना भुरके मारण्यासाठी राणीसरकार स्वतः चहा घेऊन आल्या. त्यांच्याकडे पाहिल्यावर महाराजांच्या गळ्याशी एक आवंढा आला. राज-घराण्यातल्या त्या खानदानी स्त्रीला आज एखाद्या दासीची अवकळा आली होती. त्यांनी नेसलेला जुनाट शालू गुडघ्यावर साफ विरला होता. पदराचीही एक चिंधोटी खाली लोंबत होती.

"स्वारीचं काय एवढं रोखून पाहणं चाललंय ?" राणी-सरकार अस्वस्थ होऊन विचारत्या झाल्या.

दाटलेल्या आवाजात महाराज उत्तरले, "राणीसाहेब, काय ही तुमची अवस्था; ज्या स्त्रीचं नख एकेकाळी कोणाच्या दृष्टीस पडत नव्हतं ती स्त्री आज गुडघ्याची वाटी दाखवीत सर्वत्र हिंडतेय. हा माझाच अपराध नाही की ?"

"काहीतरीच बोलायचं. स्वारीची काय चुकी ? सुखाच्या राशीवर लोळायला नेहमीच थोडं मिळणार आहे ? रामचंद्र आणि सीतामाईलाही वनवास घडला. मी म्हणते, हेही दिवस जातील."

"तुमच्या तोंडात साखर पडो !" चहाचा घुटका घेत महाराज उद्‌गारले, "अरे, आज चहात साखर कमी पडली ती ?"

"माझ्या तोंडात पडली ना !" राणीसरकार हसत म्हणाल्या, "त्यामुळे चहासाठी उरली नाही."

"वा ! चतुर माणसाला चतुर पत्नीच मिळायची." मान डोलावत महाराज बोलले. असं बोलण्यात स्तुती कोणाची करावयाची होती, ते त्यांचं त्यांना माहीत.

इतक्यात महाराजांना कसली तरी आठवण झाली.

"अहो राणीसरकार, आजचा दिवस लक्षात आहे ना ?"

"हो...नसायला काय झालं ? आज शुक्रवार..."

"च...च ! म्हणजे सगळंच मुसळ केरात ! अहो आज आपला भावी जावई जेवायला यायचा आहे मुंबईहून.. "

"अय्या ! आज भाजी मुळ्याची करावी की भेंड्याची करावी, या नादात मी ती गोष्ट विसरले होते; आता काही तरी खास बेत करावा लागणार. .अंड्याचा पोळा करू का ?"

"हो...आणि त्यावरोबर अंड्याची मालकीणही कापा. बऱ्याच दिवसात कोंबडी खाल्ली नाही. बडी मंडळी येणार, तेव्हा नुसत्या कोंब फुटलेल्या भाज्या नकोत. शांताराजेंचीही आज विशेष तयारी करा. त्यांच्यासाठी तरी धड पातळ आहे ना ?"

"आहे तर ! प्रश्न फक्त आपल्या दोघांचा आहे."

"तो का ? अरे सर्ज्या.

सर्ज्या धावतपळत आला.

"जी सरकार.

"हे बघ, आज माझे ठेवणीतले कपडे बाहेर काढ.

"ते सरकारच्या अंगावरच हायती !" सर्जा चुकचुकत म्हणाला.

महाराजांनी हताशपणे आपल्या कपड्यांवरून नजर फिरवली. शेवटी आपली नजर दुसरीकडे फिरवत ते हळूच पुटपुटले, "तुझा चोळणा जरा बऱ्यापैकी दिसतोय.

"समजलो सरकार.

"आणि माझी शिंदेशाही पगडी आज मला लागणार.

"तिचा पाक निकाल लागलीया ! सरकारच्या माथ्यावर ती ठेवली तर सरकार शेतातल्या बुजगावण्यावाणी शोबून दिसत्याल !"

"गाढवा, चांगल्या पगडीला नावं ठेवतोस ? मोत्यांच्या नसतील, पण जरीच्या तिच्या सुंदर झिरमिळ्या.

"त्या मी मागेच कापून जरीवाल्याला विकल्या. .खर्चाची अडचण. राणीसरकार अपराधीपणे पुटपुटल्या.

महाराजांची जीभ टाळ्याला चिकटली. मोठ्या कष्टाने ती सोडवून ते म्हणाले, "असो. .असो ! आता मला माझं सर्व आटपू द्या. " ते बिछान्यावरून उठले.

बाहेरच्या दालनात सर्ज्याला सारजा भेटली. ती पण त्याच्या जोडीने वाड्यातली सर्व कामं करायची. शिवाय तिच्यावर एक 'खास' कामगिरी सोपवलेली होती. रात्री झोपण्यापूर्वी महाराजांच्या पायाच्या तळव्यांना खोबरेल तेल लावण्याचं नाजूक काम ! मध्यंतरी खोबरेल महागलं आणि मग सारजा नुसतेच पाय चुरू लागली. तिचे हात महाराजांच्या पायांवर. त्यांचे तिच्या गालांवर, संस्थानी षौक.

"सारजे, राणीसरकारकडून एखादं जुनं नेसू मागून नाय घ्यावं ? आजला वडा पावना यायचा हाय ना. "

"मस्त सांगितलंस !" सारजा फणकारून म्हणाली, 'अरं, म्या मांगूनशान पायलं पन भोरणीला द्यायचं कपडं राणीसरकार स्वोता नेसत्याती...मंग मस्नी कुठना आलिया चानस ?"

"अरारा ! काय ह्यो प्रसंग ! जितं फुलं व्याचली तितं गोऱ्या वेचन्याची पाली ! कायी न्याव राह्यला नाय जगात !" सर्जा हळहळला.

उकडलेले अर्धे अंडे, एक स्लाइस् आणि चहा, अशी महाराजांची भरपेट न्याहरी झाल्यावर सर्जा टेबलावरची आवराआवर करत होता आणि कशी कोण जाणे, त्याच्या हातून कपबशी खाली पडून फुटली. तिचा आवाज ऐकून राणीसरकार धावून आल्या आणि फुटलेली कपबशी पाहून पुत्रशोक झाल्यासारख्या विव्हळू लागल्या.





अनुक्रमणिका

महाराजांचा संताप तर अनावर झाला. त्यांनी सरळ कोपऱ्यातली बंदूक उचलली आणि सर्ज्यावर रोखली. राणीसरकारनी एकदम कानात बोटं घातली. सर्ज्यावर मात्र काहीच परिणाम झाला नाही. फुटलेल्या कपबशीचे तुकडे हातात घऊन तो पोझमध्ये उभा होता.

"सर्ज्या, मी तुझा फोटो काढीत नाही. . तुला ठार मारतोय. " महाराज किंचाळले.

"ठाव हाय ! पन लवकरशान उरकून घ्या. . मस्नी दुसरी मोप कामं हायती. . अन् राणीसरकार. (इथे राणी सरकारनी कानातली बोटं बाहेर काढली.) जरा वाईच बाजू सरा.

"का रे मेल्या. "

"नाय, सरकार माज्यावर न्येम धरत्यात, तवा.

"मग. . माझा नेम चुकणार आहे का रे बेरडा ? तो मी एका गोळीत मारलेला वाघ पाहिलास ना.

"व्हय !" तेथल्या पेंढा भरलेल्या वाघाकडे करुण नजरेने पहात सर्जा उत्तरला, "पन तवा सरकारनं हरनावर नेम धरला व्हता ! ह्यो बिचारा बाजूच्या झाडीत घोरत पडला व्हता."

महाराजांनी खाडकन चाप ओढला. सर्जा काही खाली कोसळला नाही.

"काडतुसा संपल्यात जनू !" तो थंडपणे बोलला.

महाराज गरम होत म्हणाले, "संध्याकाळी घऊन ये दाजीबा पाटलाकडून. . काही झालं तरी आजची रात्र तू पहात नाहीस !"

"पाटील म्हनतो, अगुदरच्या काडतुसाचं पैसं चुकतं करा. मुंबयहून आनावी लागत्यात खर्च हाय. "

"त्या हरामखोराला आधी गोळी घातली पाहिजे ! पूर्वीचे उपकार विसरला ! आमच्याकडून पैसे मागतो.

खवळलेले महाराज येरझारा घालीत होते. इतक्यात सारजाने वर्दी आणली.

"राणीसरकार, बाहेर पावनं आल्याती.

सर्वांची मग एकच गडबड उडाली. महाराज आधी बाहेर धावले (धावले म्हणणे बरोबर नाही. एक वारा भरलेले गलबत डुगडुगत बाहेर गेले.) हातात सुटकेस घेतलेला त्यांचा भावी जावई घामाघूम होऊन वाड्याच्या दर्शनी भागात उभा होता.

"यावं. . . यावं विक्रमसिंह. महाराजांनी पुढे होत तोंड भरून स्वागत केले.

इथे विक्रमाची अवस्था चक्रमासारखी झाली होती. सुटकेस खाली ठेवत नि कपाळावरला अर्धा लीटर घाम पुसत तो कुरकुरला,

"मला वाटलं, स्टेशनवर कोणीतरी उतरून घ्यायला येईल ! दोन मैल उन्हातून तंगड्या तोडत यावं लागलं. "

"तंगड्या तोडून टाकल्या पाहिजेत. महाराज गरजले. त्याबरोबर घाबरून विक्रमाने आपली सूटकेस उचलून घेतली.

"ह्यँ ह्यँ ! तुमच्या नाहीत हो. . आमच्या म्हाद्या ड्रायव्हरच्या. हरामखोर तुम्हाला आणायला म्हणून तासाभरापूर्वी आमची रोल्सराईस् गाडी घेऊन गेला, तो कुठे तरी खड्यातच पडला असावा. आता दोन दिवस काही तो मला तोंड दाखवायला येत नाही (बरोबर, विक्रमाचा मुक्काम एक दिवसाचा ना. नाही तर कुठली गाडी नि कुठला म्हाद्या.)

महाराजांच्या मागोमाग विक्रम आतल्या दालनात आला.

"दमला असाल, पण आता स्नान वगैरे केल्यावर पहा कशी तरतरी येते ती पुन्हा. अरे सर्ज्या. "

"जी सरकार !"

"पाहुण्यांची स्नानाची तयारी कर. . . आणि हो. . माझं स्नान झालं काय रे ?" विक्रम महाराजांकडे बघतच राहिला.

"कालचं म्हनाल, तं झालंय बगा. पन आजचं मातुर राह्यलंय."

"मग पाहुण्यांचं झालं की माझीही तयारी करा. .

सर्वांची स्नाने उरकली तरी जेवणाला थोडा वेळच होता.

"विक्रमसिंह जेवणाची वर्दी येतेय तोपर्यंत एखादं उंची• मद्य घेणार ?" महाराजांनी डोळे बारीक करीत विचारले.

"घेऊ की !" आनंदून गेलेला विक्रम ओठावर जीभ फिरवत म्हणाला, "मला वाटलं होतं, की माझी सरबराई नुसती सरबतावर होईल. "

"वा ! असं कसं ? तुम्ही आमचे जामात होणार. . . तुमच्या पाहुणचाराच्या कामात आम्ही कुचराई कशी करणार ? अरे सर्ज्या. "







"जी सरकार.

"ती वरची फळीवरली मद्याची बाटली काढ पाहू.

"मदाची बाटली ? ती हतं कुठं ?"

"मूर्ख आहेस ! मधाची नाही. .ह्याची. तोंडाजवळ अंगठा नेऊन दाखवतात.

सर्जा समजून मान डोलावतो आणि टेबलावर चढून एक बाटली खाली काढतो. विक्रम तिच्यावरलं लेबल पाहतो.

"ही. .ही तर साधी बिअर दिसते. " नाक मुरडून विक्रम उद्गारला, "आपण उंची मद्य म्हणत होतात. "

"ह्यँ ह्यँ ह्यँ. अहों उंची म्हणजे उंचावर ठेवलेले. हसून हसून महाराजांच्या तोंडाला इतका फेस आला की तेवढा मद्यालाही येत नसेल.

नंतर मद्यपानाचा कार्यक्रम झाला पण त्यावेळी विक्रमाच्या चेहऱ्यावर असा भाव होता की तो जगु आंबट ताकच पीत होता.

जेवणाचा बेत मात्र झकास जमला होता. बऱ्याच दिवसांनी असं चमचमीत जेवण महाराजांच्या पोटात जात होतं. कोंबडीवर तर त्यांनी आडवा हात मारून घेतला. विक्रमाचं एकच हाडूक चघळून होतेय तोपर्यंत महाराजांनी अर्ध्या कोंबडीला आपल्या पोटात जागा करून दिली होती. मेजवानी विक्रमासाठी होती पण प्रत्यक्षात ती झाली महाराजांसाठी. मागून ज्यांची जेवणं झाली त्यांना कोंबडीचं पीसदेखील पहायला मिळालं नाही.



भोजनोत्तर सर्वांच्या गप्पा चालल्या होत्या. सर्जा उगीच इकडून तिकडे करीत होता.

"मग काय विक्रमसिंह, आमचं जेवण पसंत पडलं ना ?" पोटातल्या कोंबडीला गोंजारत महाराज विचारते झाले.

"वा ! पसंत न पडायला काय झालं ?"

"आणि आमच्या शांताराजे ?" जवळच बसलेल्या शांताराजे लाजून हिरव्या पडल्या (नेहमीच लाल रंग का ?" म्हणून साहित्यातली ही 'हरित' क्रांती.)

"हं. हं. हं ! त्याही पसंत आहेत. मात्र. अंगाने थोड्या अधिक भरल्या तर मनातही अधिक भरतील. "

"भरतील. भरतील ! ऐकलंत का शांताराजे, आता रोज वांग्याचं भरीत खात जा, म्हणजे एक महिन्यात दुधी भोपळा तयार होईल !"

"चला ! तुमचं काहीतरीच. " मानेला हिसका देत शांताराजे पुटपुटल्या.

"हं. .हं. मानेला फार व्यायाम देऊ नका, नाहीतर पेहलवानाची गर्दन तयार व्हायची !" शांताराजेंनी महाराजांकडे डोळे वटारून पाहिले. महाराज खळखळून हसले.

"ह्यांचं कॉलेज वगैरे चालूच असेल. " अर्धवट महाराजांना नि अर्धवट शांताराजेंना उद्देशून विक्रमने विचारणा केली.

उत्तर महाराजांनीच दिले, "शांताराजे कॉलेजच्या पहिल्या वर्षाला होत्या गेल्या वर्षी. .पण आम्हीच त्यांचं नाव काढलं."

"ते कां ?"

"अहो त्यांच्या दर्जाला शोभेल असं वातावरणच नव्हतं मुळी तिथे. .म्हणून नाव काढलं (कॉलेजचा खर्च झेपेनासा झाला, हे कारण तसं म्हटलं तर दुय्यमच) तुम्ही त्यांना लग्नानंतर पुन्हा कॉलेजात घालालच म्हणा. "

विक्रमाच्या चेहऱ्यावर थोडीशी धास्ती दिसायला लागली म्हणून महाराज गडबडीने म्हणाले, "ते सारं अर्थात तुमच्या हौशीवर अवलंबून राहील. .उत्पन्नाचा प्रश्नच नाही म्हणा. मला वाटते, तुमची मासिक प्राप्ती.

"महिना तीनशे रुपये मिळतात मला.

"तीनशे ?" महाराज आश्चर्याने ओरडले, "म्हणजे सात रुपये जास्त.

"कसले ?" विक्रमाने गोंधळून विचारले.

महाराज एकदम भानावर आले..

"नाही. .आमच्या ह्या सर्ज्याला दोनशे त्र्याण्णव रुपये देतो आम्ही. . .त्याच्यापेक्षा सात रुपये जास्त.

सर्ज्या काहीतरी बोलायला तोंड उघडणार होता म्हणून महाराजांनी घाईघाईने म्हटले, "पण सर्ज्या, तुला वाईट वाटायला नको. तुझाही पगार ह्या महिन्यापासून दहा रुपय वाढवलाय. चल. .हे घे. " अंगरख्याच्या खिशातून त्यांनी एक चुरगळलेली-



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

नोट काढली आणि सर्ज्याच्या अंगावर फकली. सर्ज्याचा विश्वासच बसत नव्हता. तो बावचळून हातातल्या नोटेकड पहात होता. गेल्या कित्येक महिन्यात त्याच्या हातात पडलेली अशी ती पहिलीच नोट होती. हळहळू त्याच्या चेहऱ्यावर आनंद पसरू लागला, पण त्यावर विरजण टाकणारे राणीसरकारांचे हळू उच्चारलेले शब्द त्याच्या कानात शिरले, “सर्ज्या. . .हुरळून जाऊ नकोस मेल्या ! उद्याचं रेशन आणायला महाराजांनी ही नोट दिली आहे तुला !”

पगारवाढ होऊनही दु:खी झालेला नोकर विक्रम आज प्रथमच पहात होता.

असो ! एकंदरीत विक्रमाचा महाराजांकडला एक दिवसाचा मुक्काम बऱ्यापैकी झाला. दुसऱ्या दिवशी मुंबईला परत निघताना, आपण लवकरच पुन्हा येथे येऊ, असं त्यानं महाराजांना (अक्षरश:) तोंड भरून (चिवड्याने) आश्वासन दिले.

पाहुणे गेल्यावर अर्धा तास झाला नाही तोच सर्जा महाराजांकडे धावत आला.

“सरकार. . .सरकार. . .ही शंबराची नोट.

महाराजांनी झडप घालून ती नोट हस्तगत केली.

“कुठे मिळाली ही तुला ?”

“सर्ज्या, मेल्या चोरली नाहीस ना कोणाची ?” राणीसरकार छेडत्या झाल्या.

“नाय बा ! मस्नी ही पावन्यांच्या खोलीत गावली. त्यानचीच असनार. जाऊ ठेसनावर त्यास्नी द्याया ?”

“चूप मूर्खा,” महाराज खेकसून म्हणाले, “त्यांची कोठली असणार ? माझीच ती.

“पन. . .”

“हे बघ सर्ज्या, मघाशी तुला दहा रुपयांची नोट दिली ना, ती तुला बक्षीस घेऊन टाक. ”

न जाणो, महाराजांचा निश्चय बदलायचा म्हणून सर्जा जास्त चौकसपणा न करता बाहेर सटकला.

तो गेल्यावर नोटेकडे डोळे भरून पहात बसलेल्या महाराजांना राणीसरकारनी ढोसकले, “स्वारीचा विचार तरी काय आहे ? सर्ज्याला दिली ती दहा रुपयाची नोट शेवटची होती ना ? मग हे “शंभर रुपय. . .”

“असतील. . .आमच्या भावी जामातांचे असतील ! पण तीनशेतून शंभर गेले तर त्यांना दु:ख कसले ? आपल्याला मात्र याची गरज आहे ! निदान आपल्या अंगावर थोडेसे चांगले कपडे तरी दिसतील हं. . ठेवा ही नोट. फार विचार करू नका ! ही काही परक्याची नाही !”

मग मात्र मनातले सगळे कुविचार झटकून राणीसरकारनी त्या नोटेचा स्वीकार केला.

असेच दोन तास निघून गेले आणि विक्रम धावतपळत वाड्याकडे परत आला.

त्याला परत आलेला पाहून तसे कोणालाच फारसे आश्चर्य वाटले नाही. थोडी चिंता मात्र वाटली.

“मी लवकर परत येईन असं म्हटलं, ते इतक्या लवकर खरं होईल असं मला वाटलं नव्हतं.” विक्रम धापा टाकीत महाराजांना म्हणाला, “पण मी इथे शंभराची नोट विसरून गेलो म्हणून. . . मिळाली का कोणाला नोट ?”

“शंभराची नोट ? छे बुवा !” महाराज निर्विकारपणे म्हणाले.

“असं कसं होईल ? घाबरून विक्रम म्हणाला, “मी बिछान्यावरच ती विसरल्याचं मला आठवतं. ”

“गंमतच म्हणायची. विसरलेलं आठवतं कसं ? तरी विचारून पाहतो. .अरे सर्ज्या. ”

सर्ज्यापाठोपाठ राणीसरकारही आल्या.

“जी सरकार.

“अरे मघाशी तू पाहुण्यांची खोली झाडलीस तेव्हा तुला शंभराची नोट मिळाली ?”

सर्ज्याला परिस्थितीचा अंदाज आला.

“नाय बा ! काय नाय गावलं.

मग विक्रम महाराजांच्या सांगण्यावरून स्वत: खोलीत जाऊन तपास घेऊन आला. नोटेचं काय झालं त्याला समजचना.

“तेवढीच नोट होती हो माझ्याकडे !” रडवेला होत तो बोलला, “म्हणून तर मला इथं परत यावं लागलं. .आता मुंबईचं तिकीट काढायलासुद्धा माझ्याकडे पैसे उरले नाहीत !”

“आहो आम्ही असल्यावर असे घाबरता काय ? किती रुपये लागतील तिकिटाला ?” महाराजांनी उदार होत विचारले.

“तेरा रुपये.

“बस्स् ? राणीसाहेब, देऊन टाका यांना तेवढे रुपये.

“पण. .पण माझ्याकडे तेवढ पैसे नाहीत सुटे. ” चाचरत राणीसरकार म्हणाल्या.

“असं आहे. मग मघाशी सर्ज्यानी दिलेली शंभराची नोट सुटी करून आणा.

आपल्यावर अनेक चमत्कारिक नजरा रोखलेल्या आहेत याची महाराजांना शुद्धच नव्हती. शंभरातून तेरा गेल्यावर किती उरले, याचीच त्यांच्या डोक्यात आकडेमोड चालली होती. ● ● ●

प्रथम पारितोषिकाची
विनोदी कथा

# सुखी माणसाचा सदरा

माधव अत्रे

... ज्याला ज्याला म्हणून त्याने खोदून विचारले त्या त्या सर्वांनी आपण अत्यंत सुखात असल्याचे अगदी छातीवर हात ठेवून सांगितले. एकाने तर हळूच एक चिठ्ठी त्याच्या हातात सरकवली....

त्या राज्याचा राजा पुन्हा आजारी पडला. पूर्वीसारखाच. पूर्वी राजवैद्य थकले. देशोदेशीचे नामांकित वैद्य बोलावले. त्यांच्याही हाताला गुण आला नाही. अखेर एकाने रोगाचे निदान अचूक केले. सुखी माणसाच्या सदऱ्याचा उपचार अंमलात आणला गेला. सुखी माणूस शोधून काढायला राजसेवकांना खूप कष्ट पडले. अखेर एक लाकुडतोड्या सुखी निघाला. पण त्या विचाऱ्याजवळ शर्टच नव्हता. मग शिप्याला बोलावून भराभर माप घेण्यात आले. शिंपी आपल्या सरावाप्रमाणे 'साहेब काजं करायची राहिली' 'समदी कापडं पाण्यात भिजिवली' 'उद्या कापून ठीवतो.' 'आता बटनंच शिवायची राहिली' असं म्हणत वेळ काढू लागला तेव्हा 'अर्जंट' दराने पैसे देऊन शर्ट शिवला गेला व राजाच्या आजाराला उतार पडला. तो सदरा नंतर लाकुडतोड्याला बक्षीस दिला. तसेच आणखीही तीन चार भारी कापडाचे शर्ट देण्यात आले. हेतू हा की राजसाहेब पुन्हा आजारी पडले तर ऐन वेळी धावपळ नको.

हा अनुभव लक्षात घेऊन बरे झाल्यावर राजसाहेबांनी प्रथम काय केले असेल तर राज्यातल्या सर्व लाकुडतोड्यांना वर्षाकाठी चार चार सदऱ्यांची शासनातर्फे व्यवस्था केली. आता आपल्याला मिळणाऱ्या कपड्यांमध्ये थंडीसाठी गरम सूट हवा या मागणीसाठी लाकुडतोडे संघटीत झाले. त्यांच्या सभा, मोर्चे व शिष्टमंडळाच्या कटकटी वाढल्या. कपडे लाकुडतोड्यांपर्यंत न जाता मधल्यामध्ये सरकारी नोकर वापरतात अशाही तक्रारी आल्या. कपड विनामूल्य दिले जात असताना प्रत्यक्षात काही लाकुडतोड्यांकडून राजसेवक पैसे उकळतात असेही आढळून आले. काही लाकूडतोडे आपल्याला मिळणारे कपडे विकन त्यातून येणारा पैसा हातभट्टीची पिण्यात घालवतात. अशा काही तक्रारी आल्या. काही लाकुडतोड्यांच्या झोपड्यातून आठ आठशे रुपयांचे ट्रान्झिस्टर्स असताना राजाकडून 'फुकटात' मिळणाऱ्या कपड्यांचा त्यांनी सन्मानपूर्वक स्वीकार केला. तात्पर्य, लाकुडतोडे हे पण आता पूर्वी-प्रमाणे सुखी राहिले नाहीत. सदऱ्यांच्या रूपाने त्यांना जण काही दुःखच मिळाले होते.

राज्यातील सुखी माणसांची खानेसुमारी करण्यासाठी एक खाते निर्माण केले गेले; पण त्यावर काम करणारांना भरपूर पगार व कमी काम येवढेच सुख मिळाले. बाकी त्यांची वैयक्तिक दुःखे होतीच. राज्यातील सुखी माणसांच्या आकडेवारीची स्टेटमेंटस् तयार करावीत म्हणून फॉर्म छापले गेले. किती सुखी माणसांची नव्याने नोंद केली त्याचे नाव, व्यवसाय, वय, पत्ता वगैरे माहितीचा तक्ता प्रत्येक आठवड्याच्या शुक्रवारी पाठवावा असा त्या खात्याला आदेश दिला गेला. नवी माहिती नसल्यास Nil स्टेटमेंट पाठवावे असे सांगितले. त्यामुळे राज्यातील सर्व शाखांकडून मुख्य कचेरीत Nil Statements दर आठवड्याला येऊ लागली.

लोक सुखी कां नसावेत याचा वरच्या पातळीवरून विचार करण्यासाठी तज्ञांच्या परिषदा बोलावल्या गेल्या. परिसंवाद आयो-जित केले गेले. साहित्यिकांना जनतेचे सौख्य वाढेल अशा रीतीने लिखाण करावे म्हणून निर्बंध घालण्यात आले. मासिकांच्या 'सौख्य विशेषांकांना' उत्तेजन देण्यासाठी सरकारी जाहिराती भरपूर दराने दिल्या गेल्या. 'सुखाचा कानमंत्र' व 'सुखाचा महामंत्र' या पुस्तिकांना राज्य पुरस्कार मिळाला. त्यांची राज्यातील सर्व भाषांतून भाषांतरे करण्यात आली.

तरीपण सुखी माणसांची नोंद घेणारी यंत्रणा अस्तित्वात आहे व तशीच आणीबाणीची वेळ आली तर डॉक्टरांच्या प्रिस्क्रिप्शन-प्रमाणे एखादा सदरा मिळण्यास काहीच अडचण पडणार नाही असा राजकीय अंदाज होता. राजाने केव्हाही चौकशी केली तर व्यवस्था





अनुक्रमणिका

उत्तम आहे. काळजी नसावी, (राजावरील) कुठल्याही संकटाला तोंड देण्यास आम्ही समर्थ आहोत, आमची तयारी भरपूर आहे यासारख्या घोषणा वेळोवेळी खाते प्रमुख करीत होते. प्रत्यक्ष वेळ येईपर्यंत राजानेही विशेष लक्ष दिले नाही.

अखेर राजा पुन्हा आजारी पडला. डॉक्टरांनी पुन्हा सुचविण्या-पूर्वीच त्याने खानेसुमारीच्या त्या कचेरीला तातडीचा आदेश दिला की पाच पन्नास सुखी माणसांचे सदरे स्वच्छ धुवून राजवाड्यात पाठवून देण्याची व्यवस्था करावी. परंतु तीन चार दिवस झाले तरी खात्याकडून काहीएक उत्तर आले नाही. राजाचा आजार बळावला. अखेर त्याने मुख्याधिकाऱ्यांना बोलावले व भरपूर कानउघाडणी केली तेव्हा खरी परिस्थिती उजेडात आली. मुख्याधिकारी म्हणाले,

'राजेसाहेब, खरी गोष्ट केव्हातरी सांगायलाच हवी. आम्ही खूप प्रयत्न करतो. पण राज्यातला एकही माणूस सुखी नाही, त्याला आम्ही काय करणार ? अशा परिस्थितीत कोणाचा सदरा आणायचा ? असल्या विचित्र उपायाऐवजी दुसरा एखादा उपाय विचारा की डॉक्टरांना.'

राजेसाहेब खवळले. पण करतात काय ? या परिस्थितीत ते असमर्थ होते. डॉक्टर म्हणाले नवी औषधे निघताहेत खरी पण तुम्ही पूर्वी आजारी पडलात तेव्हाच मी निदान केले होते. आताचाही आजार तोच आहे आणि त्यावर औषधही तेच.

'तो सुखी लाकुडतोड्या कुठे आहे पूर्वीचा.'

'तो इथेच आहे. पण तो आता पूर्वीसारखा सुखी राहिला नाही. आपण दिलेले कपडे मळतील, फाटतील म्हणून तो कामाकडे दुर्लक्ष करतो. नुसता अप-टू-डेट पोषाख करून फिरतो. पैसे उसने मागतो. घरी भांडणे होतात.'

'आणखी इतर कोणी ?'

'छे ! आपल्या राज्यात कोणीच सुखी नाही.'

'आत्ताच्या आता देशोदेशी आपले सेवक पाठवा कुठूनही आणा; पण सुखी माणसाचा सदरा हा मिळालाच पाहिजे.' राजाज्ञा सुटली.

राजाचे दूत देशोदेशी फिरू लागले. त्यांना दुःखाच्या विविध स्वरूपांचे दर्शन घडू लागले. कुठे आपला शत्रू अधिक शस्त्रांचा शोध लावतो म्हणून दुःख–कुठे आपल्या शांततेचा आदेश धुडकावून शत्रू अधिकाधिक हालचाली करीत असल्याचे दुःख, तर कुठे एखाद्या भांडणात आपला काहीही संबंध नसताना केवळ लोक भीडतात याचेच दुःख, कुठे आपल्या नेतृत्वाला सुरुंग लागतोय म्हणून चिंता. श्रीमंतांना कर कसे चुकविता येईल ही चिंता. गरीबांना मिळणाऱ्या उत्पन्नात कसे भागवावे ही चिंता. कुठे तेलाचे भाव कडाडले, साखर बाजारातून गडप झाली यासारख्या गोष्टींचे दुःख. एक ना दोन दुःखाची अनेक कारणे सांगून लोकांनी सदरे देण्याचे नाकारले. एकाने तर सांगितले की स्वतंत्रपणे तिकीट घेतले किंवा सिंडिकेट करून घेतले तरी अद्यापपावेतो लॉटरीचे बक्षीस मला मिळाले नाही. प्रत्येक वेळी पैसे जाण्याचेच दुःख वाटायला येते. पण तो पुढे म्हणाला, मी आज सुखी नसलो तरी या सोडतीत अडीच लाखांचे बक्षिस मला मिळणार असं होराभूषण सोमणशास्त्रींनी सांगितले आहे. बक्षिस मिळाले की मी भारी भारी कपडे शिवीन. मग एक सदराच काय सध्या जवळ असलेले सगळे कपडे तू खुशाल घेऊन जा.' राज-दूताला इतके थांबायला वेळ होता कुठे ? त्याने म्हटले 'आजच्या आज एखादा सुखी माणूस दाखवा.' तेव्हा तो माणूस म्हणाला,

'तुम्ही महाराष्ट्रात जा. तिथे सुखी माणसांना काय तोटा ? झाडाझाडावर, देवळांवर, शाळा, चित्रपटगृहे, दुकानांवर, सगळी-कडे सुखी कुटुंबाच्या व्याख्या सांगणाऱ्या पाट्या झळकताना दिस-तील. त्याप्रमाणे वागणारे लोक नक्कीच सुखी असतील.'

येवढे कळल्यावर राजदूत महाराष्ट्राकडे धावले. मातीची छोटी छोटी घरे, औते, बैल, धुळीचे रस्ते, भिंतीवर कुठे कुठे बांधवान्ये, कुठे 'भिकुसा' 'लंगर,' 'उंट छाप' विड्यांच्या जाहिराती, 'कॉंग्रेसला मते द्या' 'बैल जोडीपुढे फुली मारा' 'झोपडीला मते द्या' 'जनसंघाच्या दीपापुढे शिक्का मारा' यासारख्या गेरूने रंगविलेली अक्षरे वगैरेंनी भरलेल्या भिंतींवरच कुठे कुठे पोस्टरवर एक मुलगा व एका मुलीचा चेहरा, त्यांचे आई बाप (मिळून एक छोटे कुटुंब) व एक लाल त्रिकोण–जवळच 'छोटे कुटुंब म्हणजे सुखी कुटुंब' ही अक्षरे' अशा पाट्या पाहिल्यावर राजदूताने ओळखले की हे महाराष्ट्रातले खेडे असणार आणि येथेच कुटुंबे छोटी व पर्यायाने सुखी असणार.

त्याने चौकशी सुरू केली. कुटुंब नियोजन अधिकारी त्यांना सामोरा आला व म्हणाला, 'प्रचार नुकताच सुरू झाला आहे. शिवाय इकडे अशिक्षितांचे प्रमाण जास्त. लोकांना लवकर समजत नाही. आमचा प्रयत्न चालू आहे. पुढच्या पिढीचे चित्र आम्ही बदलून दाखवू. नवा महाराष्ट्र सुखी असेल. समृद्ध असेल. ' तो अधिकारी बोलत होता. पण राजदूताला त्यात काही रस नव्हता. त्याला उद्याच्या सुखी माणसापेक्षा 'आज' कोणी भेटला तर तो हवा होता. ज्यांची कुटुंबे छोटी त्यांच्याही समस्या सुटलेल्या नव्हत्या. मर्यादित कुटुंबाला पोसण्याइतपतही पैसा लोकांना मिळत नव्हता. जिथे मनुष्यबळ अधिक हवे अशा शेतकऱ्यांनी नियोजन केल्याने शेतीवर लक्ष द्यायला माणसे कमी पडतात म्हणून ते दुःखी होते. तिथून निराश होऊन राजदूत शहरात आला.

# ॥ कुंपणाय स्वस्ति ॥

['शहाण्यांची जागा कुंपणावरच असते' – यशवंतराव चव्हाण]

– मंगेश पाडगांवकर



पक्ष्यांची घरे असतात झाडांवर
किंवा सोयीस्कर वळचणीत;
वाघसिंहांची गुहेत रानातल्या
किंवा पिंजऱ्यातही पशुसंग्रहालयातल्या
गोष्टीतल्या चिमणीचे घर असते मेणाचे
आणि कावळ्याचे शेणाचे;
माणसे रहातात बांधून घरे मातीविटांची;
पण शहाण्याचे प्राक्तनच असते वेगळे:
त्याला बसून रहावे लागते कुंपणावर!

लोखंडाचे चणे खाण्याहून कठिण असते
कुंपणावर बसणे:
कुंपण करतात काटेरी तारांची:
कुंपणे भलत्या जागी बोचत रहातात;
कुंपणावर बसून
आपली पार्श्वभूमीही नाही चाचपता येत:
कारण त्यावेळी दोन्ही हात
गुंतलेले असतात तोल सावरण्यात

ज्याने शेताला घातले पहिले कुंपण
त्याचे नावही उरले नाही इतिहासात:
उरले फक्त कुंपण.
अश्मयुगात कुंपण नसावे:
पहिले जाहीर कुंपण असावे लोहयुगातले!
ज्याने घातले पहिले कुंपण
तो त्यावर बसला की नाही ठाऊक नाही
पण त्याला नमन असो!
घातले नसते जर त्याने पहिले कुंपण
तर झाली असती शहाण्यांची भलतीच गैरसोय....

कुंपण केवढे मोठे असावे–सांगणे कठिण.
व्याप्ती कुंपणाची असते अवलंबून भूमीवर
आणि पार्श्वभूमीवरही बसणाऱ्या शहाण्याच्या;
शहाण्यांची पार्श्वभूमी विकसनशील असते
म्हणूनच अस्सल शहाण्यांना
कुंपणेही बदलावी लागतात:
लहान शेतांची लहान कुंपणे
वाढत्या पार्श्वभूमीला पुरत नाहीत.

शहाणाच केवळ शहाणा असून भागत नाही;
त्याच्या बुडाखालचे
कुंपणही असावे लागते शहाणे,
माणसांसारखीच कुंपणेही
शहाणी आणि खुळी असतात;
ज्या कुंपणाला शेत खाता येत नाही
ते कुंपण शहाणे कुणी म्हणावे?
रंग बदलणाऱ्या साऱ्याच चतुर सरडयांची
धाव असते कुंपणापर्यंत:
पण ते कुंपणावर चढून बसू शकत नाहीत.
'जो कुंपणापर्यंत धावतो तो सरडा
जो कुंपणावर बसतो तो शहाणा.'
–ही व्याख्या यशःस्कंद पुराणातून घेतली आहे.

जिथे जिथे शेत आहे
तिथे तिथे कुंपण आहे;
जिथे जिथे कुंपण आहे
तिथे तिथे शहाणा आहे–
कुंपणावर चढून बसलेला
अवघड जागी टोचणी सोशीत!
ज्याचे कुंपण रिकामे असते
तो अतिशहाणा
किंवा त्याचा बैल!

आत्म्यालाही देहाचे कुंपण असते.
कुंपणवाद हा वेदान्तोद्भव आहे.
ते आहे एक अस्सल तत्त्वज्ञान
भौगोलिक सीमा न जाणणारे.
सत्तेचे खाणार त्यालाच कुंपण देणार!
देशोदेशींची कुंपणे असतात,
नाना रंगांची कुंपणे असतात,
बुडाबुडाच्या मापागणिक कुंपणे असतात,
काही कुंपणे दृश्य असतात,








काही अदृश्य असतात :
अदृश्य कुंपणावर बसणारे
दृश्य बुडांचे जादुगार क्वचित् दिसतात.
अशी, तशी, कशीही–
पण कुंपणे असतात :
हे. एक आदिसत्य !

मोहनदास करमचंद गांधी–एक वेडा माणूस !
कुंपणावर बसण्याचे नाकारले त्याने :
बापहो, तेव्हा त्याच्या छातीत गोळी शिरली.
मग बांधले गले त्याच्या भोवती गांधीवादाचे कुंपण :
काही शहाणे चटकन् चढूनही बसले त्या कुंपणावर !

शहाणे कुंपणावर बसतात
पण आपली माणसे पेरून ठेवतात शेतात
आणि काही शेताबाहेर;
माणसे हेरूनही ठेवतात कुंपणावर बसून !
शहाणे, कुंपण आणि परमेश्वर
यांचा थांग लागत नाही....

कुंपणाय स्वस्ति।
कुंपणस्वाराय स्वस्ति ॥
कुंपणाय नमः।
कुंपणावरील शहाण्याच्या बुडाय नमः॥

* * *

एका कुटुंबाकडे तो गेला. कुटुंब प्रमुख घरी नव्हते. त्यांच्या पत्नीने सांगितलं की हे गेले चार दिवस वणवण फिरताहेत. मुलांना प्राथमिक शाळेत प्रवेश मिळावा म्हणून. सोन्यासारखी दोन मुले. त्यांना सुखात ठेवू, चांगलं शिकवू म्हणून धडपड करायची; पण चांगल्याशा प्राथमिक शाळेत प्रवेशासाठी मारामार. देणगी मागतात प्राथमिक शाळेत प्रवेशासाठी.'

'अहो, पण देणगी तर स्वेच्छेने द्यावयाची असते ना ?'

'ते कागदोपत्री. पण प्रवेश मिळविण्यासाठी देणगी दिल्याखेरीज आजकाल शाळांतून प्रवेशच मिळत नाही. मग देणगी न देऊन सांगता कुणाला ? प्राथमिक शाळेत प्रवेश मिळवायला हे हाल. तर पुढे कसे होणार ?'

राजदूताने तियून पाय काढला व तो खूप फिरला. त्याला अनुभव बरेच आले. कुटुंबे मर्यादित असली तरी बाजारात वस्तूंच्या किंमतीना मर्यादा नव्हत्या. एक जण म्हणाला 'आम्हाला दोन मुले आहेत असे सांगितले तर बाजारात वस्तू काय सवलतीच्या दरात थोडीच देतात ?' महागाई इतकी बेसुमार आहे की कुटुंब छोटे असले तरी त्याचे सौख्य हिरावून घेण्यास ती पुरेशी आहे. एकाने तक्रार केली की सगळीकडे रांगा लावाव्या लागतात. अशा परिस्थितीत कुटुंबात माणसे जास्त असती तर प्रत्येकाला एकेका रांगेत उभे करून सगळी कामे थोडया वेळात झाली असती. आता दोन-तीन माणसांनाच सगळया रांगांतून वेळ घालवावा लागतो कामासाठी.'

दुःखाचे पाढे ऐकता ऐकता निराश मनाने राजदूत लोकलमधून फिरत होता. त्याच्यासमोर बसलेल्या एका माणसाचे डोळे तारवटलेले होते. केस पिंजारलेले होते. सहज त्या दोघांची ओळख झाली 'राजदूत' असल्याचे कळल्यावर त्या इसमाने तुच्छतेने पाहिले व म्हटले,

'हे राजे बिजे लोक आहेत वाटतं अजून. खलास केले पाहिजेत साल्यांना.'

राजदूत भडकला. तो काही बोलणार तेवढयात तो इसम म्हणाला,

'तुझा काय दोष ? तुला पोटासाठी चाकरी करावी लागते; पण तुमचे रक्त शोषणाऱ्या राजाविरुद्ध बंड करण्यासाठी साऱ्या राजदूतांनी संघटीत झाले पाहिजे. मी येतो तुमच्या राज्यात.'

राजदूताला त्याचे बोलणे रुचले नाही. पण तरीही त्याने आपल्या येण्याचा उद्देश सांगितला.

'सुखी माणूस ?' तो इसम म्हणाला.

'आणि तो या राज्यात ? ही राजवट बदलून आमचं राज्य येईपर्यंत येथे सुखी माणसे स्वप्नात देखील दिसणार नाही. जिथे आमचा पक्ष सत्तारूढ आहे अशा राज्यात मी तुला नतो. तिथे संप, घेराव, हरताळ वगैरेंना राजाश्रय आहे. निवडणुकीत ज्यांनी मदत केली त्या गुंडांना पुढे पोलिसांपेक्षा अधिक सत्ता आहे. लोक सुखी आहेत. उद्या मी पक्षाच्या बैठकीसाठी जाणार आहे. तेव्हा तू पण चल माझ्याबरोबर. सदरा घे व राजाला दे. राजा बरा झाला की त्याला ओरडून सांग की हा सदरा एका श्रमजीवी माणसाचा आहे. आणि त्याचेच राज्य उद्या तुझ्यावर येणार याची ही निशाणी आहे.'

'ते काय ते मग पाहू. आत्ता मला सुखी माणसाचा सदरा मिळवून तर दे' राजदूत म्हणाला व त्याच्याबरोबर प्रवासाला निघाला.

त्या राज्यात आल्यावर एका कार्यक्रमाच्या वेळी जमलेल्या सुसंस्कृत स्त्रियांवर गुंडांनी अत्याचार केल्याचे ऐकले. एक बँक लुटण्याचे तसेच शांतता प्रस्थापित करणाऱ्या पोलिसाला जमावाने ठार मारल्याचे वृत्त एकले. तेव्हा राजदूताला भीतीच वाटली इथली. माणसे सुखी असतीलच कशी या शंकेने त्याला घेरले; पण त्याने ज्याला ज्याला म्हणून खोदून खोदून विचारले त्याने त्याने आपण सुखात असल्याचे छातीवर हात ठेवून सांगितले व आपला सदरा देऊ केला. राजेसाहेबांची तब्येत अधिकाधिक बिघडत होती म्हणून जास्त चिकित्सा न करता, त्यान काही सदरे गोळा केले व मोठ्या समाधानात त्या राज्याचा निरोप घेतला.

त्याला निरोप देण्यासाठी बंदरावर जमलेल्या नागरिकांपैकी एकाने हळूच एक चिठ्ठी त्याच्या हातात सरकावली. बोट चालू होताच राजदूताने मोठ्या अधीरतेन ती वाचायला सुरवात केली. वाचता वाचता त्याच्या हातातले सदरे गळून पडले.

'आपली प्रतारणा केल्याबद्दल क्षमस्व. इथे खरोखर आम्ही सुखी नाही. इतर ठिकाणी निदान दुःख व्यक्त करण्याचे तरी स्वातंत्र्य आहे. इथे ते पण नाही. आपण सुखात असल्याचे सगळयांना सांगण्याची सक्ती असल्याने शिवाय सी. आय. डी. व चुगल्या करणारे राजकीय कार्यकर्ते व गुंड यांचे जाळे सर्वत्र असल्याने आम्ही सुखी असल्याचे सांगितले. त्यातूनही राजाला गुण आला तर आम्हाला आनंदच वाटेल.'

हे सदरे न्यावेत की नाही याबद्दल राजदूताच्या मनातला गोंधळ वाढत होता व बोट भराभर पाणी कापीत त्याच्या राज्याच्या दिशेने जात होती.

• • •







अनुक्रमणिका

दुसऱ्या पारितोषिकाची विनोदी कथा




—अनिल फळणीकर

**....म्हणे कॉपी करून मॅट्रिक पास झाला....पण कॉपी कोण करीत नाही ? प्रत्यक्ष परमेश्वरही (स्वतःचीच) कॉपी करतोच. त्याच्या कॉपी उद्योगामुळेच तर हा सारा प्रपंच—**

मॅट्रीकच्या तुरुंगातून (तीन वर्षांच्या सक्तमजुरीनंतर) मी जेव्हा माझी सुटका करून घेतली तेव्हा मला चार कौतुकाच्या शब्दांची अपेक्षा होती. पण प्रत्यक्षात लोकांनी 'कॉपी करून मॅट्रीक पास झाला' म्हणून डिवचलं. कॉपी कोण करीत नाही ? विद्यार्थी परीक्षेत कॉपी करतात, म्युझिक डायरेक्टर जुन्या गाण्यांच्या चाली उचलतात. सदानंद जोशी अत्र्यांची तर घोड्के टिळकांची नक्कल करतात. ('नक्कल' हे नाटयमय नाव दिलं तरी अखेर ती कॉपीच !) इतकंच काय पण परमेश्वरही कॉपी करतो. एकासारखी एक दिसणारी माणसे तो घडवतो—त्याला वाटत असेल आपली कॉपी कुणाच्या लक्षात येत नसेल. पण मी काढल्यायत ना त्याच्या काही कॉप्या हुडकून आणि त्या माझ्या चांगल्या म्हणजे चांगल्याच पथ्यावर पडल्या कारण त्यामुळ मला माझ्यासाठी एक जगप्रसिद्ध क्रिकेटर, अमेरिकेचे अध्यक्ष, सिनेमातले नट आणि खुद्द आमचे बॉस या अति-रथी-महारथींना राबविता आलं. कुणी ठेवील विश्वास यावर ?

माझ्या ओळखीचा एक माणूस आहे—दिसायला तद्दन मांकड ! म्हणजे विनू मांकड. प्रथमदर्शनी मला तो खराच विनू मांकड वाटला. त्याचा स्पर्श होण्यासाठी किंवा त्याचा कमीतकमी वारा अंगाला लागण्यासाठी मी खूप परिश्रम घेतले. एका जगप्रसिद्ध क्रिकेटरला इतक्या जवळून पाहिल्याचा व त्याचा वारा अंगावर घेतल्याचा मला त्यादिवशी विलक्षण आनंद झाला. पण पुढे तो माणूस वारंवार दिसू लागल्यावर खरी गोम लक्षात आली—तो विनू मांकड नव्हताच. विनूसारखा दिसणारा एक सामान्य माणूस होता—एक कीटाणू होतं ते म्हणाना ! (मग इतके दिवस उगीच मी त्याचा वारा अंगावर घेतला) त्यावेळी विनू फार फॉर्मात होता त्यामुळे क्रिकेटचे फोटो जमवणाऱ्या माझ्या शाळकरी दोस्तांमध्ये विनूच्या फोटोंना बराच भाव आला होता. एकादा दुर्मीळ क्रिकेटचा फोटो मिळविण्यासाठी दोस्त जीव टाकायचे. क्रिकेटचे फोटो असलेले 'स्पोर्टस् अँड पास्टाईम'चे अंक व वर्तमानपत्रे केव्हाच 'गुल्' व्हायची—एकमेकांच्या दप्तरातून. ठरवून टाकलं—या विनूसारख्या माणसाचे फोटो काढून दोस्तात खपवायचे. त्या माणसाला गाठलं. लवकर मैत्री जमवून टाकावी म्हणून खूप खूप बोललो. कोणताही विषय बाकी ठेवलन् नाही. तो बावरून गेला—हा तरुण ओळखदेख नसता अगदी लंगोटीयारसारखा आपल्याशी कां बोलतोय त्याला कळेना. पण माझी टकळी सुरूच होती. गाडी शेवटी क्रिकेटच्या विषयावर आली. पण 'क्रिकेट' हे एका कीटकाचं नाव आहे एवढीच माहिती त्याला क्रिकेटबद्दल होती म्हणून हा विषय तो कीटकाप्रमाणे झटकून टाकू लागला; पण मी नेटाने संभाषण चालू ठेवलं.

"तुम्ही अगदी विनूसारखे दिसता" मी (सकौतुक) म्हणालो.

"कोण विनू ?"

(तुझा बाप विनू !) अहो, मांकड."

"काय मी माकडासारखा दिसतो—माकडासारखा दिसतो मी ?" तो रागावून माझ्यापाठी धावू लागला. त्या पाठलागात—पळता पळता मी सारी परिस्थिती विशद केली. त्याचा राग आवरता आवरता आमच्या अगदी नाकीनऊ आले. परिस्थिती आटोक्यात आल्यावर त्यास चहा वगैरे पाजला. मग हळूच त्याचा फोटो मला क्रिकेटच्या वेषात पाहिजे असल्याची याचना मी केली. कां-कूं करता करता तो तयार झाला. मग मी त्याला गावाबाहेर मैदानावर नेलं. एक फोटोग्राफर आणला. माझा क्रिकेटचा जामानिमा त्या तोतया विनूवर चढवला. त्याच्या वलदंड शरीरामुळे त्या जामानिम्यात तो साखळदंडाने जखडलेल्या कैद्यासारखा दिसत होता. क्रिकेटचा गंध नसल्याने बॅट्समनची पोज घेताना तर तो अगदी








हवालदील झाला. रडवेला झाला. त्या फोटोच्या बऱ्याच प्रती काढून मी आमच्या दोस्तात नेऊन दाखविल्या. "पहा रे विनू मांकडचा फोटो. आणि वर्तमान पत्रातला नव्हे–अगदी अस्सल–कॅमेराचा फोटो आहे हा." आमची दोस्तमंडळी चकीत झाली. तरी एकान विचारलनच–"मांकड फारच रडक्या चेहऱ्याचा दिसतोय यात नाही ?" यावर माझं उत्तर तयारच होतं–"अरे तो झीरोत उडालाय नं ? म्हणून. पहा म्हणजे किती दुर्मीळ आहे फोटो हा. मांकडसारखा बॅट्समन झीरोमध्ये उडाल्याचा फोटो ! ! ते फोटो प्रत्येकी २।२ रुपयाला खपले. पण दुर्मीळ फोटोसाठी जीव टाकणाऱ्या माझ्या दोस्तांकडून मला ५।५ रुपयांची तरी अपेक्षा होती तिचा भंग झाला.

परमेश्वराची दुसरी कॉपी म्हणजे आमचे फडतरे गुरुजी. डिक्टो प्रेसिडेंट जॉन केनेडीसारखं घडवलाय त्यांना परमेश्वरानं. (ज ऽ ऽ रा बावळट आहेत एवढंच) एकदा मी त्यांना आमच्या आळीच्या सार्वजनिक गणपती उत्सवात प्रे. केनेडीची नक्कल करण्याची विनंती केली. "तुम्ही अगदी केनेडींसारख दिसता. तितकाच रूवाबसुद्धा तुमच्याकडे आहे. तुमचं इंग्लिश काय 'मार डाला पप्पडवालेको' आहे ! तुमची बोलण्याचो ढब इंग्लिशमनलासुद्धा लाजवील" नाही नाही ते बोललो. गुरुजींच्या कोणत्याही बोलण्यात 'हं तर मुलानो' हे शब्द सवयीने येतातच, कुठे केनेडींचा रुवाब नि कुठे आमचे अजागळ गुरुजी, शिवाय नक्कल करणं हे किती जिकिरीचं काम असतं हे काहीच माझ्या त्यावेळी लक्षात आलं नाही. अखेर खूप गळ घातल्यानंतर मासा गळाला लागली. जोशी गुरुजी तयार झाले नक्कलीला.

कार्यक्रमाच्या वेळी जाहीर केलं–'आता प्रेक्षकांसमोर खुद्द जॉन केनेडी, द प्रेसिडेंट ऑफ अमेरिका, उभे राहतील व थोड बोलतील. केनेडींची ही नक्कल सादर करीत आहेत श्री. विठ्ठलराव फडतरे. दिग्दर्शन, रंगभूषा व वेषभूषा आहे अनिल फळणीकर यांची.' पडदा उघडला. गोल टेबलामागे बसलेली ती केनेडींची खरीखुरी मूर्ती पहाताच (क्षणभरच) साऱ्या प्रक्षकांचे श्वास रोधले॰ गेले. विंगमध्ये बसल्या बसल्या आमच्यातल्या वेषभूषकाला, दिग्दर्शकाला धन्य धन्य झालं. पण दुसऱ्याच क्षणी जेव्हा केनेडींचं ते बावळट ध्यान वाकडं तिकडं उभं राहिलं तेव्हा रोधलेले श्वास हास्याच्या कल्लोळात ओघळले. हसण्याचा ओघ हळूहळू वाढत जाऊन त्याचा धबधबा बनला तेव्हा मात्र विंगमध्ये आमचे धाबे दणाणले. मी हळूच पडदा बाजूला सारून पाहिलं. त्या विकल केनडींकडे पाहून मलाही फिसकन हसू आलं. गुरुजी बोलत होते. प्रेक्षक मनमुराद हसत होते. पण तरीही गुरुजी बोलतच होते. रेटून.

"रिचर्ड क्रीम. . क्रोमवेल (प्रचंड हशा) . फिल् मोऽ ऽर !
. द. . नव्हे. . दी (हशा) अमेरिकन. . पप्.
पीपल (हशा) . एक्सपेक्ट–म्–मोअर फ्रॉम. . अस्. (याच्या-

कडून काय एक्सपेक्ट करणार कप्पाळ !—एक कॉमेंट) दॅन द. नव्हे.दी...क्राईज..ऑफ इंडिग्नेशन. .अँड..अॅटॅक!"—मध्येच घाम पुसून—"तर मुलांनो" (प्रचंड हशा व टाळ्या)—जीभ चावून "वुकलो...फॉर..द..दी वर्ल्ड इज्. .चेंजींग. "

एकूण ती नक्कल साफ फसून आमची छी:थू झाली. शिवाय नंतर फडतरे गुरुजींनी मुद्दाम घरी बोलावून घेऊन माझा कान पिळून सत्कार केला ही गोष्ट वेगळीच. पण दोन माणसातील दार्शनिक साम्याचा काही तरी उपयोग (किंवा उपद्व्याप) करण्याची आमची सवय गेलीच नाही. पुढे वयपरत्वे मी मोठा झालो. नोकरी करू लागलो. आमचं ऑफीस बरंच मोठं होतं. तिथे खूप मुली कारकून-गिरी करीत होत्या. पण सालं एकीशीही ओळख होण्याचं चिन्ह दिसेना. त्या पोरींना सिनेमाच्या गोष्टी बोलायचा फार नाद. मीना-कुमारी कुणाबरोबर काम करतेय, अशोककुमार 'मिस्टर एक्स'मध्ये काय करतो—नूतनने कसा बुचडा बांधलाय—देवानंद किती छॉन दिसतो—वगैरे. (आणि आम्ही नाही वाटतं दिसत छॉन ? या पोरींचं असं असतं—हातचं सोडून पळत्या पाठी धावतात.) मी मग त्यांच्यासमोर माझी बऱ्याच फिल्मी धेंडांशी अरेतुरेची ओळख असल्याची बढाई बिनदिक्कतपणे मारली. या सिनेनटनट्यांचा उल्लेख करताना मी सरळ सरळ त्यांच्या नावांची खाजगी लाडीक रूपं बनवून टाकली.

"परवा आनंद्याला भेटलो..." मी.

"कोण हा आनंद्याऽ ?" ऑफीसातील मैत्रिणी.

"च् ! च् ! अग देवानंद. .त्याला परवा भेटलो अन् सरळ सांगितलं की बुवा आपण तुझ्या टॅक्सी ड्रायव्हरमधील अभिनयाला मानलं—पण त्या कल्पना कार्तिकला किती चिकटलायस रे त्यात" (हेच संभाषण जसं हिंदीमध्ये झालं तसं सांगायची पाळी मुलींनी आणली असती तर ? तर काय सांगितलं 'असतं मी ? 'बुवा हम तेरे टॅक्सी ड्रायव्हर के बीचमे के अभिनय के उप्पर एकदम खुश है...परंतु उस कल्पना कार्तिक को कितना चिकटया है रे तू'—असं ?)

"अय्याऽऽ! काय हेऽ ? मग काय म्हणला तो ?"

"म्हणाला मग काय बिघडतं ? मी तिच्याशी लग्नच करणारे"

(एका हिंदी 'चित्रपट समाचारा'तील बातमी इथं मला उप-योगी पडली.)

"एऽऽ एवढ्या तुझ्या ओळखी आहेत तर आम्हांला तरी भेटव ना कुठल्यातरी एकाद्या नटाला."

"अग मग आधी कां नाही बोललात ? कालच किशू अन् अशोक आले होते माझ्या घरी. दिली असती ओळख करून तुमची."

"किशू आणि अशोक. ?"

"च् ! अग. किशोरकुमार आणि अशोककुमार ! शिवाय परवाच ममद्यानं (महम्मद रफीने) त्याच्या रेकॉर्डिंगला मला बोलावलं होतं. रामचं (सी. रामचंद्र) संगीत होतं. वैजूही (वैज-यंतीमाला) तिथे येणार होती पण मला विन्याकडे (विनू मान्कड) पार्टीला जायचं असल्याने रेकॉर्डिंगला गेलो नाही. " अशी वाक्यं मी छातीठोकपणे (मनात या सर्वांची क्षमा मागून) ठोकू लागलो. वानगीदाखल त्या 'विनू'चे फोटोही दाखवले. शिवाय माझ्या मित्रमंडळात एक सुनील दत्तसारखा व दुसरा देवानंदसारखा दिस-णारा असे दोन मित्र होते. त्यातला 'देवानंद' जरा चकणा होता. पण त्याचा माझ्याबरोबर मिठी मारताना, काढलेला फोटो मी बाजूने काढण्याची दक्षता घेतली. 'माझ्या सुनील दत्त'बरोबर तर मी स्टुडिओत जाऊन काश्मीरच्या सेटच्या बॅकग्राऊंडवर आमचा फोटो काढवून घेतला. हे सर्व फोटो दाखवीत मी मैत्रिणींना माहिती दिली "पहा—बऱ्याच दिवसांनी भेटल्याने देवानंदने न राहवून मला मीठी मारली ना—त्याचा फोटो एका टाईम्सच्या छायाचित्र-काराने फिल्म फेअरमध्ये देण्यासाठी खेचला होता. अन् हा सुनील मला घेऊन काश्मीरला गेला होता—तेव्हांचा."

मैत्रिणीत माझा भाव देवासारखा वधारला. प्रथम प्रथम ढुंकून

न पहाणाऱ्या त्या मुली माझ्या पुढे पुढे करू लागल्या. पण एकदा हा डाव माझ्यावर उलटत होता—ऑफीस सुटल्यावर रस्त्याने आम्ही—मी व मैत्रिणी चाललो होतो. एका ठिकाणी गर्दी दिसली. मग कळलं—देवानंदचं शूटींग चाललंय. कालाबजार सिनेमासाठी. पोरी हरखून म्हणाल्या,

"ए तो बघ तुझा दोस्त. हाक मार ना. तेवढाच आपल्याला भाव मारता येईल लोकांसमोर" आता आली का पंचाईत !

मी मग पोरींना दूर उभे करून देवानंदकडे गेलो. 'आय वॉन्ट टू शेकहॅंड विथ यू' म्हणून त्याचा हात दाबलाही. "व्हाय यू × × × पीपल डिस्टर्ब इन अवर शूटींग" असं काहीसं देवानंद मला उद्देशून बोलला. त्यावर मी इतक्या मोठ्याने हसलो की सर्व जमलेल्या लोकांना वाटलं—आमच्यात मित्रत्वाचे गप्पा-विनोद चाललेत. गर्दीतून बाहेर आल्यावर मुलींनी विचारलं "काय रे एवढा देवानंदने विनोद केला ?" मी सांगितलं "तो म्हणाला मी जर आता तुझ्याबरोबर तुझ्या मैत्रिणींना भेटायला आलो तर ही हीरॉईन जळेल ना त्यापेक्षा मी जेव्हां तुझ्या घरी येईन तेव्हांच त्या मैत्रिणींना भेटेन" त्या प्रसंगातून अशी मी सुटका करून घेतली.

याच ऑफीसमधील पोरींना एकदा असंही बोलतां बोलता म्हणालो "आपल्या साहेबाचा नि माझा चांगला घरोबा आहे" पोरी म्हणाल्या "थाप ! मग साहेब तर तुझ्याकडे कधी लक्षही देत नाही." मुलींचं हे ऑब्झर्वेशन मला बोचत होतं. कधी तरी यावर मला मात करायची होती. एक दिवस साहेब ऑफीसांत येणार नसल्याचं कळलं. लगेच मी प्यादी हलवायला सुरवात केली. माझ्या मित्राच्या ऑफीसात एक प्यून आहे. पुरुषोत्तम नाव. दिसायला अगदी आमच्या साहेबासारखा. त्याला तयार केलं——

"येत्या शुक्रवारी आमचे साहेब ऑफीसात येणार नाहीयत. तू होशील का साहेब एका दिवसापुरता ? कुणाच्या लक्षात नाही येणार—नीट वागलास तर. एकदा घऊन टाक हा सोन्यासारखा अनुभव. एक दिवसाची कमाईही चांगली होईल. कुणी वडचा पार्टीनं हात वगैरे दावलन् तर" पुरुषोत्तम तयार झाला. त्याला मग मी बऱ्याच सूचना दिल्या. "मला चांगला रिस्पेक्ट दे" त्याला बजावलं "व्हय व्हय. एकदम पायाच पडतू की तुमच्या आल्या आल्या" "हं हं पुरषा ओव्हर नाही करायचं हं मुळीच"

"छ्या ! छ्या ! !" आणि सर्वांचे सलाम नीट हसून खालच्या मानेने स्वीकारायचे." "व्हय व्हय."

"पण बोलायचं नाही काही. बिंग फुटेल" "छ्या ! छ्या !"

"आणि घाबरायचं नाही.-अगदी सहजपणे—रोजच्यासारखं यायचं ऑफीसात."

"व्हऽऽय" वगैरे.

शुक्रवारी आम्ही बसलो होतो ऑफीसमध्ये. साहेब यायची वेळ झाली होती. म्हणून अगदी पिनड्रॉप सायलेन्स होता. आमची मात्र तंतरली होती. छाती धडधडत होती. तेवढ्यात वालेलोकांच्या नाचातलं गाणं गुणगुणत (अगदी सहजपणे, रोजच्या सारखा) पुरषा आला. वाल्यांचं ते 'श्रावन बाल गेला काशीला—गेला काशीला' गाणं दुरून ऐकलं नि एकदम बोलून गेलो—आले वाटतं साहेब ! आणि पुरषा शिरला. गबाळा सूट, टायची चुकीची नॉट, तोंडात पान नि हाताच्या चुन्याचे कोटाला डाग असे हे आमचे साहेब दारात उभे ठाकले. सर्वांना वाटलं साहेब पिऊन वगैरे आलेत. की काय. पण तरी सर्वांनी साहेबांना अभिवादन केलं. प्रत्येक सलामीला पुरषा खाली वाकून खि-खि करून हसायचा (ही माझ्या सूचनेची अम्मलबजावणी). तेवढ्यात मी दिसलो. मग जुन्या काळात मांडलीक राजे सार्वभौम राजाला जसे मुजरा करीत मागे हटत तसं पुरषाने केलन्. नि मागे जाता जाता एका टेबलाला आपटला. (जरा ज्यादाच केलन् पुरषाने) त्यामुळे संशय अधिकच बळावला. मग पुरषा केबीनमध्ये जाऊन गादीच्या खुर्चीवर बसण्याऐवजी व्हिजिटर्सच्या वेताच्या खुर्चीवर बसला. लगेच मागोमाग दोन तीन कारकून आपल्या फायली घेऊन 'साहेबा'कडे गेले. साहेब आपल्याला रिस्पेक्ट देतोय त्याचा मुलींवर काय परिणाम झालाय हे पहायचा मला धीरही झाला नाही. मीही केबीनमध्ये गेलो.

"साहेब या खुर्चीवर बसा की नेहमीच्या" मी गादीच्या खुर्चीकडे बोट दाखवून म्हटलं. पुरषा मला म्हणाला, "साहेब तो मान तुमचा." (लेका पुरषा तू अतीच करतोयस. थोतरीत द्यायला पाहिजे एक.) मी हळूच पुरषाला चिमटा काढला—मग पुरषाने आपली जागा घेतली. एक दोन फायली त्यानं अगदी बेदरकारपणे पाहिल्या. (पुरषाच्या या अभिनयावर आपण खूश.) तेवढ्यात एकदोन गव्बर पार्टी आल्या.

"गुड मॉर्निंग सर" पार्टी बोलली.

"यस् यस् क्यू नही" पुरषा. (पुरषा लेको जबान सम्हाल).

"सर व्हाट अबाऊट द सॅंक्शन ? डू यू रिमेम्बर द सिच्युएशन परफेक्टली ?"

"प्लीज. . .वी आर कन्सीडरींग दॅट. डोन्ट मेक हरी." मी पुरषाला वाचवायला मध्येच तोंड घातलं. पण पुरषाने घो घातलनच.

"सॅंक्शन ? .यू. .फादर. .मी. .गिव्ह ! .गो-रूम. . आऊट."

(हे पुरुषाचं इंग्लिश. त्याला बहुधा 'तुमच्या बापाने ठेवलंय सॅंक्शन. चला जा इथून' असं म्हणायचं असावं) पार्टीन लगच काढता पाय घतला. दुसरी पार्टी आत आली. त्या अगोदर मी पुरषाला चिमटा घेऊन सावध केला—बोलायचं नाही बिलकुल ! पार्टीन आपला फॉर्म पुढे केला. पुरषान त्यावर नजर फिरवून आपल्या फाइलीत तो ठेवून घतला. पार्टी खिशात हात घालून म्हणाली, "किती ?" पुरषाला अर्थ कळला. तो हरखून म्हणाला "पाच टाका साहेब" पार्टी बाहेर गल्यावर मी (हळू आवाजात) ओरडलो "पुरषा आत्ता पाचशे सुद्धा मिळवले असतेस."

एवढ्यात दार उघडलं नि आमचे खरे साहेब उभे राहिले दत्तासारखे.

"परवानगीशिवाय कोन येताय ते" पुरषा ओरडला. आमचे साहेबही क्षणभर गार ! ते माग सरले. माझं तर हार्टफेल व्हायचं राहिलं. मी भूत बघितल्यासारखं पुरषाच्या कानात सांगितलं "सा-हे-ब" पुरषा ताडकन् उभा राहिला. आणि ढुंगणाला पाय लावून पळाला. पाठून त्याला पकडायचं निमित्त करून मीही धावलो. या प्रसंगामुळे आमच्या नोकरीवर गदा आली नाही हे आमचं नशीब !

एकंदर देवाजींच्या करणीमुळे एक जगप्रसिद्ध क्रिकेटर, अमेरिकेचे अध्यक्ष, सिनेमा नट आणि. . .आमचे साहेब यांना मला माझ्यासाठी राबविता आलं खरं पण शेवटच्या धक्क्यातून सावरल्यानंतर मात्र दोन माणसातील या साम्याचा उपयोग करून घ्यायच्या माझ्या मोहाला मात्र मी कायमचा लगाम घातलाय. * * *

**[ सर्व पात्रे व प्रसंग काल्पनिक ]**



अनुक्रमणिका






दुसऱ्या पारितोषिकाची
विनोदी कथा




फ्लाईंग ऑफिसर
**अशोक मोटे**

**...यापुढे वीस वर्षे (म्हणजे जवळ जवळ आजन्मच) अगदी दणदणीत, खणखणीत, कडकडीत आणि ठणठणीत ब्रह्मचर्य पाळण्याचा मी ठाम निर्धार केला आहे—ब्रह्मचर्य हेच जीवन...**

मला यंदा कर्तव्य आहे. आता तसे पाहिले तर गेली तीन चार वर्षे मला कर्तव्य आहे हो ! आजकाल सर्वच गोष्टी महागल्या आहेत, दुर्मिळ झाल्या आहेत बघा ! पोरींचा तर फारच भाव वाढला आहे. फार दुर्मिळ झाल्या आहेत पोरी; विशेषतः माझ्यासारख्या मिलीटरीतल्या जवानांसाठी नि त्यातल्या त्यात वैमानिकांची तर पंचाईतच आहे.

आता माझंच बघा ना ! मी जवान आहे. अहो म्हणजे तसा नुसता नावाचा जवान नाही – मिलीटरीत, चक्क पन्नास वर्षाच्या म्हाताऱ्यालाही जवान म्हणतात—मी घरोखरचा जवान, म्हणजे तरुण आहे बरं !

माझं नाव अशोक आहे. मदिरेने मदमस्त झालेल्या युवतीने चूळ भरून, नंतर लत्ताप्रहार केल्याशिवाय अशोक वृक्ष फुलत नाही, बहरत नाही, असं काल परवाच कुठंतरी वाचलं.

मळा फुलण्याची, बहरण्याची फार इच्छा आहे हो ! आता मी काय कमी प्रयत्न करतो ? वर्षा दोन वर्षातून, जेव्हा कधी महिना दोन महिने सुटी मिळते, तेव्हा नागपुरात असताना नियमानं, रोज संध्याकाळी बर्डीवर जातो. सिनेमात पाहिलेले, पुस्तकात वाचलेले, मित्रांना सांगितलेले सर्व ठोकताळे अजमावून पाहतो. पण व्यर्थ !

कुणी चप्पल देखील मारू इच्छित नाही आम्हाला, तेवढा देखील संपर्क नको त्यांना मग आम्ही कसं बरं बहरावं ! कसं फुलावं।

प्रत्येकीला पाहिजे आय. ए. एस., इंजिनीयर किंवा डॉक्टर; म्हणजे बाकी सर्वांनी ब्रह्मचारी रहावे काय ? हा मूलभूत प्रश्न आहे. माझा खडा सवाल आहे पोरींना.

पोरींना काय हवं माहीत आहे का ? यांना जन्माला घालण्याआधी परमेश्वरानं ॲडव्हान्स बुकिंग करायला हवं. चार-पाच वर्ष आधीच एक कारटं जन्माला घातलं पाहिजे अन् चित्रगुप्तानं, त्याच्या नशीबात, डॉक्टरी, इंजिनीअरी, किंवा ऑफिसरी, लिहून ठेवायला हवी. एवढं कन्फर्मेशन झालं की म्हणावं "घ्या बाईसाहेब आता जन्म."

"मेड-टू-ऑर्डर" नवरे पाहिजेत यांना ! अन् यांचे आई-बाप उगीच शंख करतात "मुलगी लग्नाची झाली, पण चांगली मुलंच मिळत नाहीत हो आजकाल !" अशा वेळी माझं हृदय आक्रोश करतं हम भी तो पडे हैं राहो में !

पण होतं काय ! काही आई-बापांना झाली असते घाई. परमेश्वराचं ॲडव्हान्स बुकिंग व्हायच्या आतच जन्म घेते सोनुली. मग असली रत्नं आमच्या सारख्यांच्या पदरात पडतात. साता जन्माचे सोबती म्हणून जगतो आम्ही. आठव्या जन्माची वाट पाहात.

आमचं मात्र तेवढंही नशीब नाही. मी आपल्याकडून खूप प्रयत्न केला हो ! पण जमलं नाही. म्हणजे काय प्रयत्ने वाळूचे कण रगडिता तेलही गळे, पण लग्न न जमे. या म्हणे ब्रह्मदेवाच्या घरच्या गाठी असतात. आमच्या नावाची गाठ मात्र विसरला हं विधाता !

बरं तसा मी नवमतवादी आहे. साता जन्माची सोबत नको. आयुष्यात काही तरी चेंज हवा, थ्रिल हवे. साती जन्म तेच तेच काय !

कॉलेजमध्ये असताना मी किती विनवण्या केल्या "मला सात जन्माची सोबत नको, फक्त एकाच जन्माची कर !" पण





अनुक्रमणिका

कुणी ऐकलं नाही. नाकं मुरडली सर्वांनी. अन् आता त्याच हिंडतात वरं बर्डीवर ! कडेवर एखादा बंडू किंवा बेबी घेऊन. पतिराज मागे मागे असतातंच खरेदीचे सामान घेऊन. त्या अगदी आपणहून बोलतात बरं "अहो, मोटे इकडं कुणीकडं?"

"काही नाही, असंच आपलं बर्डीवर पाय मोकळे करायला" मी पुटपुटलो.

"कां हो, एकटेच ! अजून जमलं नाही वाटतं कुठं ?"

साळसूदपणाचा आव आणून मुद्दाम मारलेला टोमणा.

'छे हो ! माझाच विचार नाही अजून. ऑफर्स खूप येतात पण बंधनात पडायचं नाही मला." मी साफ ठोकून देतो, वर खोटं हसतो.

"बरं येते हं !" अन् मग नवऱ्याचा केविलवाणा चेहरा पाहून "हो, हे माझे मिस्टर आणि हा बंडू एक वर्षाचा झाला परवाच. खूप हुशार आहे. बाळ टा टा कर बघू मामांना."

चोळा चोळा, चोळा आमच्या जखमांवर मीठ.

तशी प्रेमप्रकरणं खूप झालीत माझी, पण तीस सेकंदाव्कर एकही टिकले नाही. काय व्हायचं ? हमने देखा, उसने देखा, हमने उसासा टाका, उसने नाक मुरडा, बस खेल खत्म.

खरं सागायचं म्हणजे मी एका आदर्श स्त्रीच्या शोधात होतो, अन् सापडलीही मला एक आदर्श स्त्री-आपल्या महाराष्ट्रात आदर्श (!) स्त्रियांचा काही तोटा नाही. पण ती होती एका आदर्श पुरुषाच्या शोधात. सगळंच मुसळ केरात.

पण मीही नावाने अशोक व वृत्तीने आशिक आहे. मी अर्थात्च हार मानली नाही. मी तिला म्हटलं "बरं का हो ! कल्पना छान आहे हं तुमची. तुम्ही आपला आदर्श पुरुषाचा शोध चालू ठेवा, पण मध्यंतरीच्या काळात आपण लग्न करून घेतलं तर काय हरकत आहे ?" चप्पल घेऊन धावली की हो माझ्यामागं, पण मारली नाही. नाहीतर, मी वहरलो असतो, फुललो असतो. भरताच्या भक्तीने व मजनूच्या भावनेन पूजा केली असती, चप्पलेची.

थोडक्यात काय, आमच्या नशीबाच्या क्षितिजावर एकही चंद्रकोर किंवा चांदणी नाही. नुसते कावळे आहेत कावळे. ते म्हणजे माझे टवाळ मित्र. सगळे लग्न करून बसलेत. अगदी ठेंगण्या, काळ्या, काटकुळ्या, हाडकुळ्या गोडबोलेचेही लग्न झाले. माझा मित्र मादुसकर म्हणतो "या गोडबोलेच्या नावांत जर गो नसता तर याच्या बायकोला डबोले मिळाले असते." लग्नानंतर गोडबोलेला मी विचारले, "कसं काय, ठीक चालू आहे ना सारं ?"

"काही खरं नाही, यार !" तो हताशपणे उत्तरला "लग्नापूर्वी पुरुष अपूर्ण, अर्धा असतो म्हणे ! निदान अर्धा तरी असतो बिचारा, पण लग्नानंतर तर पूर्णपणे नस्तनाबूत होतो, खतम होतो."

म्हणूनच आता आपण निर्धार केलेला आहे-मिली तो संसारी, नहीं तो नैष्ठिक ब्रह्मचारी. "**ब्रम्हचर्य हेच जीवन आणि लग्न हा मृत्यु**" या नावाचं एक पुस्तकही लिहीणार आहे मी. स्वामी अशोकानंद या नावानं.

मी ब्रह्मचर्याची शपथ घेतली. अगदी दणदणीत, कडकडीत, खणखणीत अन् ठणठणीत कडक ब्रह्मचर्याची शपथ घेतली.

तसं पाहिलं तर ब्रह्मचर्य फारच मजेदार आहे हं ! म्हणजे पहा, हमारे दिल के हम राजा. मनोराज्यात आज मी 'एलिजाबेथ टेलर'शी लग्न करतो तर उद्या 'ब्रिजित् बार्दोशी.' कधी 'क्लाडिआ कार्डिनेल' माझ्या बाहुपाशात असते तर कधी 'सोफिया लॉरेन.' कुणाची टाप आहे मला अडवायची, अन् एखाद्या कमल-विमल किंवा शीला-सुमनपेक्षा 'सोफिया लॉरेन' नक्कीच बरी. मी एलिजीबल बॅचलर आहे, एखाद्या 'लोकल' पोरीबरोबर जन्मभर गुंतून पडण्यात काय अर्थ ?

बरं, लग्न करण्याची खूप हौस असणाऱ्यांनाही लग्न केल्यावर फार बरं वाटतंच असं नाही. आता आमच्या रानड्यांचंच बघा ना ! लग्न झालं. **रिसेप्शनच्या वेळी त्याच्या वधूनं, लाजत मुरकत उखाण्यात त्याचं नाव घेतलं, त्याची पाळी आली**









अनुक्रमणिका

तेव्हां त्यानं चार चौघांसमक्ष चक्क, स्पष्ट कबुली दिली. "केळीचं पान टराटरा फाटतं, ×××चं नाव घेतलं की कससंच वाटतं.

आमचा पक्या कसा सुखी होता आज-पर्यंत, पण नियतीला त्याचं सूख पाहवलं नाही; अलकाने त्याची विकेट घेतलीच. आतापर्यंत नाबाद असलेल्या माझ्या मित्रांनीही प्रेमसरोवरात निदान एकएकदा डुबकी घेतलेलीच आहे. जोशी व कर्णिक दोघांचेही दिल ए. वी. डब्ल्यू झाले. विन्या एका गोऱ्या-गोऱ्या छोकरीच्या काळचा काळचा 'जुल्फों में' अडकलेला आहे. कुम्याचं कुठंतरी पाणी मुरतेय. विल्याची मुंबईत डाळ शिजतेय. बुत्ती पार्टटाईम प्रेम करतो. शिट्टू नि निनू, वल्ल्या आणि नान्या कॉफी हाऊससमोर "दिलफेक नजरे-मुहब्बत कर-तात." मुन्ना, सऊ, खान्या, राजा, कदल्या, बव्या, टीट, मोटी, डम्बॉब, अण्णा, चमड्या, गंगू, दादा, नवऱ्या, हिप्पो, काका, जेम्स-बाँड इ.इ.इ. सर्व "कॉफी हाऊस कंप-नीचे" लोक; कहीं ना कहीं, कभी ना कभी, किसी ना किसीसे दिल लगाही चुके हैं... आणि बाल्या—द्—ग्रेट आपल्या औषधाच्या दुकानात 'फॅमिली-प्लॅनिंग'ची पोस्टर्स लावून सूचक प्रेम करतो.

कोरडा, फक्त मी एकटाच आहे, बिचारा ! अगदी मारुती आहे अजून. लंगोटाचा लाल त्रिकोण हे माझ्या शुष्क जीवनाचे प्रतीक आहे.

तापलेल्या जीवाला विरंगुळा म्हणून, गोकुळपेठेतील मंगळवार व शुक्रवार बाजारात हिंडतो. बरं असतं ! सामान्य ज्ञान वाढतं, भाजीपाल्याचा भाव कळतो अन् मुख्य म्हणजे "पब्लिक" रिलेशन्स बरे होतात. काय झक्क "पब्लिक" असतं हो. ! .गजरे काय ! वेण्या काय ! काजळ काय ! सुरमा काय ! रंगीत अन् फुलाफुलांच्या साडयांची धमाल असते. असं वाटतं भाजीपालाच काय, सारी दुनिया खरीदने निकले हैं ये, मेरे दिल के खरीददार.

एरवी अगदी कोरडी ठणठणीत अस-लेली ही "गोकुळ" पेठ, मंगळवारी व शुक्रवारी मात्र अगदी भरल्या गोकुळा-सारखी दिसते. मनाचं फुलेपाखरू होतं अन् भिरभिरतं या फुलावरून त्या फुलावर परंतु. .जब आती है चमन में बहार यारों, मेरा दिल यूंही वीराना हुआ जाता है. हाय राम ! 'जनता' जनार्दनाच्या मोहिनी अवताराच्या दर्शनाने मन उल्ह-सित होते न होते तोच. गर्दीच्या आडून डोकावतो, कुठल्यातरी भिंतीवर कुणी तरी चिकटवलेला एक लाल त्रिकोण.

म्हणे फॅमिली प्लॅनिंग करा ! अरे हो करतो बाबा करतो ! एवढंच काय, अहो प्लॅनिंग तर अगदी एव्हररेडी असतं आमचं पण फॅमिली ? ..ती कुठे आहे !

पण नंतर मनाला संभ्रम पडतो. कशाला बंधने हवीत ? एकाच फुलात अडकून कां पडायचं ? हा हन्त हन्त... करतं. मी माझ्या मनाला वारंवार समजा-वलं "अरे मना कशाला लग्नाचा हव्यास धरतोस, अरे प्रत्यक्ष समर्थ देखील बोहल्या-वरून पळूनच गेले होते ना ? अरे नाना विकारी मना, ब्रह्मचर्य हेच जीवन बरं बाबा !"

वास्तविक पाहता, आता माझं आयुष्य कसं मजेदार चालू होतं. चांगला ब्रह्मचारी होतो मी—म्हणजे अजूनही आहे बरं का—वडील मंडळींना अगदी राहवत नाही. किती उतावळी असतात ही मंडळी ! वडि-लांना कोण घाई झाली होती सून घरात आणायची ! अन् आईला घर सुनं-सुनं वाटायचं. नातवंडं हवीत. म्हणजे काय ! आमचं सुख पाहवत नव्हतं. सारखे मागे लागले माझ्या. लग्न कर, लग्न कर ! अरे पण कुणाशी, पोरगी कुठं आहे ? बरं आपला देश तितका मॉडर्न असता तर डायरेक्ट नातवंडच आणून दिली असती. पण तशी प्रोव्हिजनच नाही.

काय करता राव ! मातृदेवो भव, पितृदेवो भव. या वयात मनही मोडवत नाही त्यांचं. त्यांची आज्ञा पाळायलाच हवी. अन् कोण म्हणाले होते बघा, मला वाटतं महात्मा गांधीच . "लग्नानंतरही ब्रह्मचर्य पाळता येतं, कायम ठेवता येतं." सापडला रामबाण उपाय. मी ठरवलं, लग्न करून ब्रह्मचर्य पाळायचं. माझं ब्रह्मचर्य टिकलं असतं अन् वडील मंडळींची कट-कटही मिटली असती. सुंठही वाचली असती नि खोकलाही गेला असता. सून घरात आल्याने वडिलांची इच्छा पूर्ण झाली असती. आईची नातवंडांची मागणी पूर्ण करणारा एखादा क्लॉजही सापडला असता, ब्रह्मचर्याचे रेग्युलेशन्स नीट स्टडी केले असते तर.

प्रयत्न करण्याचं ठरविलं. प्रयत्न करणं हा मर्दाचा धर्म आहे. प्रयत्नांती परमेश्वरही मिळतो, असे ऐकिवात होते मग बायको क्या चीज है ? इसापनीतीतील ती मुंगी आठवते ना ! तीच दाणा घेऊन पुनः पुनः भिंतीवर चढणारी. पुनः पडणारी. पुनः चढणारी.

अगदी जिवाभावाने, मन लावून, कसो-शीने प्रयत्न केला तर नागपुरात पोरी साप-डल्या नसत्या असं नाही. अकोला, अमरा-वतीतही खडा टाकून पाहिला असता. अगदी पुण्या-मुंबईपर्यंत देखील मजल मारण्याची तयारी होती माझी.

मी वर्तमानपत्रात जाहिरात दिली. **"एका कोऱ्या करकरीत (किमान वीस वर्षाच्या गॅरंटीच्या) कुमार ब्रम्हचाऱ्या-साठी वधु पाहिजे."** दुसऱ्या दिवशी जाहि-रात छापली गेली, पण छापण्यात एक घोडचूक झाली. संपादकांनी माझी क्षमा मागितली. मी मोठ्या मनानं त्यांना क्षमा केली. जे घडायचं ते सारं ईश्वरी इच्छे-नुसार होणार. त्यात त्या संपादकांचा काय दोष ! कंपोज करताना चूक झाली होती. दुसऱ्या कोणत्या तरी जाहिरातीतील एक ओळ माझ्या जाहिरातीत पडली होती. **"अनुभवी उमेदवारांना प्राधान्य देण्यात येईल."**

असंख्य पत्रे आली. काही धमकीवजा पत्रेही होती. एका सद्गृहस्थाने लिहिले होते "लग्न करण्याची एवढी हौस असेल तर








आमच्या बायकोशी करून पहा, म्हणजे कळेल !"

निरनिराळ्या पोरींना इंटरव्ह्यूच्या वेळा दिल्या. पहिलीला भेटलो अन् थंडगार झालो. एखाद्या आऊट-ऑफ-फोकस फोटोचे डेव्हलपिंग नीट झाले नाही व तो ओव्हर-एक्सपोज्ड झाला तर कसा दिसेल, तशी दिसत होती ती. गेल्या चार लग्नांचा अनुभव होता तिला.

दुसरी पोरगी मात्र, मस्त होती. अगदी 'रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया'सारखी. परमेश्वराने सर्व 'भांडवल' योग्य जागी 'इनव्हेस्ट' केलेले होते. व त्याचा 'इंटरेस्ट'ही चक्रवाढ व्याजाने वाढलेला होता. तिच्या आईबापाची ही कारागिरी—हे मूर्तीमंत शिल्प—पाहून त्यांना 'आर्किटेक्चर'चे नोबेल प्राईज द्यावेसे वाटत होते.

"पण काहो, तुम्ही वैमानिक, समजा तुम्ही मेला पटकन लग्नानंतर, म्हणजे ?" तिने भिवया उंचावून पापण्यांची मोहक हालचाल करीत लाडिकपणे विचारले.

"काही वाईट होणार नाही बाई तुझं ! साठ-सत्तर हजारांचा इन्शुअरन्स आहे माझा, मजेत राहशील तू" मी चांगलाच भाळलो होतो तिच्यावर.

तिचं तिच्या सध्याच्या नवऱ्याशी पटत नव्हतं. म्हटलं चला जमलं एकदाचं. मी खुष होतो. . पण तिच्या नवऱ्याला कळलं. तो आडदांड पहेलवान होता. चँपियन बॉक्सर होता.

*

. . गेले दोन महिने मिलीटरी हॉस्पिटलमध्ये पडून आहे मी. माझे अर्धे दात पडलेत. बरीचशी हाडं मोडली. डोकं फुटलं. . . पण ब्रह्मचर्य मात्र अजून अबाधित आहे, कायम आहे.

माझ्या डोक्याला भलंमोठं बँडेज बांधलेलं आहे. दोन्ही हात प्लॅस्टरमध्ये आहेत. एक पाय प्लॅस्टरमध्ये असून साखळीने छताला टांगलेला आहे. . उरलेल्या एका पायावर मी आई-वडिलांची आज्ञा पाळण्याला, लग्न करण्याला, तयार आहे.

टु द बेस्ट ऑफ माय नॉलेज, मी अजून ब्रह्मचारी आहे—गेल्या वीस वर्षांची मी गॅरंटी देतो, पाच वर्षांचा होतो त्याआधीचं मला आठवत नाही.

गद्धे पंचविशीत मी फारच गद्धेपणा केला. माझं पुढचं लाँग टर्म प्लॅनिंग आहे. चार पंचवार्षिक योजनांनंतर—म्हणजे वीस वर्षांनंतर एकोणीसशे एकोणनव्वद साली, पूर्णपणे मॅच्युअर झाल्यावरच मी लग्न करीन. खरं कारण म्हणजे, एवढ्यात लग्न होईलसं दिसत नाही. आपलं काय आहे—

दिल में एस्टाब्लिशमेंट तो
बहुत है हसीनों का ।
उनके दिल में हमारे लिये
अकोमोडेशन ही नहीं ।।
यार टेंपररी तो बहुत
मिल जाते हैं लेकिन ।
अपनी जिंदगी में कोई
परमनंट ही नहीं ।।

म्हणून आतापासूनच, नुकतंच लग्न झालेल्या जोडप्यांनी माझी मागणी नोंदवून घ्यावी. मला "मेड टू ऑर्डर" नवरी पाहिजे.

गरजूंनी माझ्या **फ्लाईंग ऑफिसर अशोक प्रभाकर गोटे** ३३ स्क्वॉड्रन C/o ९ ए. पी. ओ. या पत्त्यावर पत्रव्यवहार करावा.

तोपर्यंत, या पुढे वीस वर्षे — म्हणजे जवळ जवळ आजन्मच नाही का ! अगदी दणदणीत, कडकडीत, खणखणीत अन् ठणठणीत ब्रह्मचर्य पाळण्याचा निर्धार केला आहे मी. . ब्रह्मचर्य हेच जीवन. . निदान प्लॅस्टर सुटेपर्यंत तरी.

"बहुत तमन्ना थी की हो मोहब्बत हासिल ।
अधूरे मेरे दिल के अरमान रह गये ।।
मैं फौजी हूं, फौजी है इश्क मेरा ।
देखा किसी हसीना को, सावधान हो गये ।।

● ● ●

**आणखी एक ल्योकनाट्योत्सव**



**विच्छा माझी पुरी करा**











अनुक्रमणिका

# राजकारणाचे पंचप्राण

**....कन्या, प्रिया, पत्नी आणि माता या नात्यांनीच पुरुषाला स्त्रीचा परिचय असतो.... एखादी महत्त्वाकांक्षी महिला राजकारणाच्या आखाड्यात उतरते तेव्हा ती परिस्थितीचे रंगरूपच पालटून टाकते....**




—दादूमिया

स्त्री ही राजकारणात अत्यंत महत्त्वाची व जबरदस्त शक्ती आहे. इंग्रजीत एक म्हण आहे, "कोणच्याही राजकीय घटनेचा तळ खाजवा. त्याच्या बुडाशी तुम्हाला स्त्री दिसेल." जगाच्या सुरवातीपासून ते त्याच्या अंतापर्यंत स्त्री ही "शक्ती" म्हणूनच पुढेही राहिली आहे व राहील. इलेक्ट्रीकल इंजिनिअरींगच्या भाषेत ही शक्ती "हायटेन्शन सप्लाय लाईन" आहे व म्हणून तेथे "धोका" अशी पाटी लावणे जरूरीचे आहे.

सध्याच्या भारताच्या राजकारणात धुडगूस घालणारे कनु संन्याल हे नक्सलाईट म्हणून प्रसिद्ध आहेत. "तुमचे राजकीय तत्त्वज्ञान काय", असे त्यांना एका विदेशी वार्ताहराने विचारले. त्यांनी त्यास चारु मुजुमदार या त्यांच्या गुरूंकडे जाण्यास सांगितले. त्या वार्ताहराने नंतर लिहीले, "मला आश्चर्य वाटले चारु मुजुमदारांची खोली पाहून. त्या खोलीत मला दोनच फोटो लावलेले आढळले. एक माव-त्से-तुंगचा व दुसरा कालीमातेचा."

स्त्री हे पत्नी, प्रिया व माता यांचे अद्भुत मिश्रण आहे. स्त्रीचे गुण वा दुर्गुण तिच्या त्या त्या वेळच्या भूमिकेवर अवलंबून असतात. 'ध' चा 'मा' करणारी खुनी आनंदीबाई राघोबादादाची उत्तम पत्नी असू शकते, त्याचप्रमाणे तिच्या पोटच्या मुलाची अत्यंत प्रेमळ माताही.

स्त्रीच्या पत्नी, प्रिया व माता या भूमिका जगजाहीर आहेत. प्रश्न असा आहे की राजकारणाच्या धकाधकीत स्त्री ही टिकू शकेल काय ? तिने राजकारण करायचे ठरविले तर कोणच्या पद्धतीने ते राजकारण खेळले जाईल ? जनतेच्या दृष्टीने ते राजकारण कसे असेल ? स्त्रीच्या कोणच्या गुणांचा राजकारणास फायदा होईल ? आणि कोणच्या दुर्गुणांमुळे राजकारणास अनिष्ट वळण लागण्याची शक्यता जास्त राहील ? आणि ते कोठच्या थरापर्यंत ?

या प्रश्नांची उत्तरे देण्याआधी हे जग पुरुषप्रधान आहे हे लक्षात ठेवले पाहिजे. त्यामुळे सारे कायदेकानू, साऱ्या नीती-अनीतीच्या कल्पना, धर्माधर्माचे स्वरूप पुरुषास जास्त किफायतशीर असणार यात शंका नाही. "न स्त्री स्वातंत्र्यमर्हति" असे सुप्रसिद्ध भगवान मनूचे वचन फेकणे सोपे आहे. भगवान मनू हा पुरुषच होता हे लक्षात ठेवणे सोपे नाही. त्याचप्रमाणे मनू असे कां म्हणाला हेही नीट ध्यानात घेणे आवश्यक आहे.

कारण उघड आहे. स्त्री ही पुरुषापेक्षा शारीरिक बळात कमी पडते. काही पहिलवानी अपवाद वगळले तर स्त्रिया पुरुषांपेक्षा नाजूक, अशक्त व अडचणीच्या प्रसंगांना कमी टक्कर देणाऱ्या आढळतात. मानसशास्त्राच्या दृष्टीने स्त्रिया चटकन् रागावणाऱ्या, चंचल मनाच्या व दुसऱ्यांच्या बुद्धीने चालणाऱ्या आढळतात. हे दुर्गुण घर सांभाळण्याच्या दृष्टीने उपकारक ठरतात. स्त्री अशक्त नसती, स्त्रीस मुला-बाळांची व घराची ओढ नसती तर ती स्वैराचारी व स्वच्छंदी झाली असती. साऱ्या स्त्रिया अशा स्वैर वर्तन करू लागल्यावर समाज व राष्ट्र यांचे स्थैर्य व सुसंस्कृतता धोक्यात येऊन या जगात सर्वत्र अंदाधुंदी व अनाचार यांना ऊत आला असता.

## सेवेची जबाबदारी स्त्रीवर

पुरुषप्रधान जगात स्त्रियांना खरोखरचे सारखे हक्क मिळणे अवघड आहे. आजवर जगाने स्त्रीस चार भिंतींच्या आड डांबून टाकून तिला शैय्याघरात वा स्वैंपाकघरात पुरुषाची सेवा करण्यासाठी कामास जुंपले. जगाच्या इतिहासात स्त्री-राज्यकर्त्यांची संख्या बोटावर मोजण्याइतकी आहे. ह्या थोड्या स्त्री-शासकांच्या उदाहरणांवरून सबंध स्त्री जातच अशी वाईट वा चांगली आहे असा निष्कर्ष ठरविणे धाष्टर्याचे होईल.

वैदिक काळात स्त्रियांना चांगल्या तऱ्हेने वागवीत असत असे म्हणतात. त्या काळानंतर स्त्रियांचे सारे हक्क पुरुषाने हिरावून घेतल्याचे आढळते. स्त्रियांनी कदाचित् त्यांना दिलेल्या स्वातंत्र्याचा गैरवापर केला असण्याची शक्यता आहे. कालपरंपरापर्यंत

अनुक्रमणिका

स्त्रियांना मतदानाचा साधा हक्कही नव्हता! ब्रिटिश व डच लोक सोडले तर राजपदी स्त्रीची नेमणूक होऊच नये अशी सर्व देशांच्या राज्यघटनेत तरतूद आढळते. इस्लामने स्त्रीस बुरखा बहाल केला. तरीसुद्धा भारतीय इतिहासात स्त्री-राज्यकर्त्यांत तौलनिक दृष्ट्या मुसलमान स्त्रियांचाच भरणा जास्त दिसून येतो. हिंदू जगतात राजा मरण पावला व त्यास संतान नसले तर नगराच्या महाद्वारात एका हत्तीणीस उभे करीत व ती हत्तीण पहाटे ज्या पहिल्या वाटसरूच्या गळयात माळ घालील त्या अनोळखी मुशाफिरास राजपदाचा लाभ दिला जाई. यापेक्षा पक्षपाताचे चांगले उदाहरण कोणचे मिळणार?

पुरुषांनी काम करायचे व काम करून थकल्यावर स्त्रियांचा "उत्तेजक" म्हणून वापर करण्याची प्रथा जगाच्या इतिहासात पूर्वीपासून चालत आली आहे. इंद्राने या बाबतीत जणु आदर्श राहावयाचे ठरविले आहे. इंद्राच्या दरबारात नमस्कार करण्याची पद्धत मोठी शृंगारमय आहे. तरुण अप्सरांनी डोक्यावर उभे हात ठेवून मग भेटल्यावर डोक्यावरच नमस्ते करायचे! उभारलेल्या वक्षभाराने सारा दरबार उल्हसित व्हावा ही इंद्राची योजना! श्रीकृष्णाने नारदास दिलेली 'ऑफर' नारदास खूष करण्यास पुरेशी होती. हीच रसिक प्रथा बहुधा सर्व हिंदू राजांनी आपापल्या दरबारी चालू ठेवली होती. हुषार पण कोपिष्ठ ब्रह्मवंदाचे सुंदर व लावण्यवती तरुणानी पाय धुतल्यावर त्या ब्राह्मदांचा थकवा व राग क्षणार्धात न पळाला तरच नवल.

## कायद्याने काय साधले?

स्त्रिया पुरुषांना जणू खूष ठेवण्यासाठीच निर्माण झाल्या आहेत. स्त्रियांकडे जो बघत नाही तो पुरुष नव्हे. बहुपत्नीकत्व हे फार प्राचीन काळापासून पुरुषार्थाचे लक्षण समजले गेले आहे. गोपींची रासक्रीडा भगवान श्रीकृष्णाच्या पौरुषत्वाची साक्ष देते. महाभारताचे आदिपर्व इतक्या भानगडींनी व लफड्यांनी भरलेले आहे की ते संपूर्ण वाचवतच नाही, शिसारी येते. इस्लाम धर्माचा प्रसार स्त्रीसुख आणि धनसंपत्ती यांच्या अभिलाषेशिवाय यशस्वी झाला नसता. बौद्ध व जैन पुराणातील गोष्टी माणसाचे बहुपत्नीकत्वच



सिद्ध करतात. आज सर्वसंपन्न अमेरिकनाची बहुपत्नीकत्वाचीच महत्त्वाकांक्षा असते. माणसाने आम्ही सुसंस्कृत आहोत हे दाखविण्यासाठी कायदे केले परंतु मानवी वासना तो कायद्याने कशी बरे दडपू शकणार? त्यापेक्षा मागासलेला बदाऊनी अरब बरा. काफीराशी झगडा करून त्याच्या बायका भोगायला तो इहलोकी जगतो. लढता लढता मेलाच तर हुतात्मा होऊन तो स्वर्गात जातो व नंदनवनातील "हुरी" उपभोगितो. केवढे सरळ, साधे व सोपे तत्त्वज्ञान!

## उबदार सोबतीतील 'मझा'

देवांना व धर्माधिकाऱ्यांना स्त्रियांच्या मोहापासून अलिप्त राहता येत नाही तर बिचाऱ्या राजकारणी पुरुषांना ही नैसर्गिक भूक कशी बरे दडपता येईल? राजकारण फालतू कटकटींनी भरलेला, जंजाळयुक्त व शिव्याशापांचा वर्षाव होणारा "थँकलेस् जॉब" आहे. त्यात घट्ट कातडीचा माणूस असेल तरच तो टिकाव धरून राहतो. नाहीपेक्षा रोज घरी रडत बसण्याची पाळी येते. अशा या कटकटीच्या प्रवासात एखादी सुखद सोबत थोडा वेळ का होईना पण लाभली तर राजकारणी पुरुषास चैतन्य येते. या उबदार सोबतीत "मझा" आहे यात संशयच नाही. त्यावरून एक गोष्ट आठवते. "स्त्रिया" या विषयावर नव्या दिल्लीत अर्थमंत्री, गृहमंत्री व विदेश खात्याचे उपमंत्री यांची जोरात चर्चा चालली होती. विदेश उपमंत्री आपला अनुभव सांगत होते, "स्त्रियांच्या बाबतीत साठ टक्के काम व चाळीस टक्के शरीरसुख असते." त्यावर अर्थमंत्री म्हणाले, "माझ्या मते त्यात पंचाहत्तर टक्के काम व पंचवीस टक्के शरीरसुख असते." लगेच गृहमंत्री उद्गारले, "छेः छेः, त्यात नव्वद टक्के कर्तबगारी व दहाच टक्के मझा असते पहा."

सेक्रेटरीएटमधील आय. सी. एस. सचिव त्यांच्या मंत्र्यांचा वाद लक्षपूर्वक ऐकत होते. त्या चिटणीसांपैकी एक पुढे आला व म्हणाला, "साहेब, आपण म्हणता तसे नसावे. माझ्या मते त्यात शंभर टक्के मझा व शून्य टक्के काम असावे."

"कशावरून?"

"कारण उघड आहे. त्यामध्ये जर काही काम असते तर तुम्ही मंत्र्यांनी नक्कीच ते आम्हा चिटणीसांवर सोपविले असते!"

स्त्रियांचा सहवास सुखद असतो हे नक्की. हे सुख शारीरिक किती व मानसिक किती हा विवाद्य मुद्दा आहे. माझ्या मते ते पुरुषांच्या वयावर अवलंबून असते. अर्थात् काही पुरुष साठीच्या पुढेही चिरंतर तरुण वाटतात. पन्नाशीनंतर स्त्रियांचा सहवास "सेक्स्"साठी फार थोडा असतो. मानसशास्त्राप्रमाणे स्त्रियांचे हास्य, विनोद व संभाषण पुरुषाच्या चित्तवृत्ती उल्हसित करतात, म्हाताऱ्यास यौवन प्राप्त करून देतात व त्यास आपण हे पृथ्वीवरील वैभव सुख भोगण्यासाठी खूप जगले पाहिजे अशी जाणीव करून देतात. चिंतामणराव देशमुख हे संस्कृत भाषेचे विद्वान व रसिक पंडित, आय सी. एस. अधिकारी व अर्थशास्त्राचे नाणावलेले तज्ज्ञ. ह्या अर्थमंत्र्यांची





स्त्रियांना मतदानाचा साधा हक्कही नव्हता ! ब्रिटिश व डच लोक सोडले तर राजपदी स्त्रीची नेमणूक होऊच नये अशी सर्व देशांच्या राज्यघटनेत तरतूद आढळते. इस्लामने स्त्रीस बुरखा बहाल केला. तरीसुद्धा भारतीय इतिहासात स्त्री-राज्यकर्त्यांत तौलनिक दृष्ट्या मुसलमान स्त्रियांचाच भरणा जास्त दिसून येतो. हिंदू जगतात राजा मरण पावला व त्यास संतान नसले तर नगराच्या महाद्वारात एका हत्तीणीस उभे करीत व ती हत्तीण पहाटे ज्या पहिल्या वाटसरूच्या गळचात माळ घालील त्या अनोळखी मुशाफिरास राजपदाचा लाभ दिला जाई. याहून पक्षपाताचे चांगले उदाहरण कोणचे मिळणार ?

पुरुषांनी काम करायचे व काम करून थकल्यावर स्त्रियांचा "उत्तेजक" म्हणून वापर करण्याची प्रथा जगाच्या इतिहासात पूर्वीपासून चालत आली आहे. इंद्राने या बाबतीत जणु आदर्श राहावयाचे ठरविले आहे. इंद्राच्या दरबारात नमस्कार करण्याची पद्धत मोठी शृंगारमय आहे. तरुण अप्सरांनी डोक्यावर उभे हात ठेवून मग भेटल्यावर डोक्यावरच नमस्ते करायचे ! उभारलेल्या वक्षभाराने सारा दरबार उल्हसित व्हावा ही इंद्राची योजना ! श्रीकृष्णाने नारदास दिलेली 'ऑफर' नारदास खूष करण्यास पुरेशी होती. हीच रसिक प्रथा बहुधा सर्व हिंदू राजांनी आपापल्या दरबारी चालू ठेवली होती. हुषार पण कोपिष्ठ ब्रह्मवंदाचे सुंदर व लावण्यवती तरुणानी पाय धुतल्यावर त्या ब्राह्मदांचा थकवा व राग क्षणार्धात न पळाला तरच नवल.

## कायद्याने काय साधले ?

स्त्रिया पुरुषांना जणू खूष ठेवण्यासाठीच निर्माण झाल्या आहेत. स्त्रियांकडे जो वघत नाही तो पुरुष नव्हे. बहुपत्नीकत्व हे फार प्राचीन काळापासून पुरुषार्थाचे लक्षण समजले गेले आहे. गोपींची रासक्रीडा भगवान श्रीकृष्णाच्या पौरुषत्वाची साक्ष देते. महाभारताचे आदिपर्व इतक्या भानगडींनी व लफड्यांनी भरलेले आहे की ते संपूर्ण वाचवतच नाही, शिसारी येते. इस्लाम धर्माचा प्रसार स्त्रीसुख आणि धनसंपत्ती यांच्या अभिलाषेशिवाय यशस्वी झाला नसता. बौद्ध व जैन पुराणातील गोष्टी माणसाचे बहुपत्नीकत्वच सिद्ध करतात. आज सर्वसंपन्न अमेरिकनांची बहुपत्नीकत्वाचीच महत्त्वाकांक्षा असते. माणसाने आम्ही सुसंस्कृत आहोत हे दाखविण्यासाठी कायदे केले परंतु मानवी वासना तो कायद्याने कशी बरे दडपू शकणार ? त्यापेक्षा मागासलेला बदाऊनी अरब बरा. काफीराशी झगडा करून त्याच्या बायका भोगायला तो इहलोकी जगतो. लढता लढता मेलाच तर हुतात्मा होऊन तो स्वर्गात जातो व नंदनवनातील "हुरी" उपभोगितो. केवढे सरळ, साधे व सोपे तत्त्वज्ञान !

## उबदार सोबतीतील 'मझा'

देवांना व धर्माधिकाऱ्यांना स्त्रियांच्या मोहापासून अलिप्त राहता येत नाही तर बिचाऱ्या राजकारणी पुरुषांना ही नैसर्गिक भूक कशी बरे दडपता येईल ? राजकारण फालतू कटकटींनी भरलेला, जंजाळयुक्त व शिव्याशापांचा वर्षाव होणारा "थँकलेस् जॉब" आहे. त्यात घट्ट कातडीचा माणूस असेल तरच तो टिकाव धरून राहतो. नाहीपेक्षा रोज घरी रडत बसण्याची पाळी येते. अशा या कटकटीच्या प्रवासात एखादी सुखद सोबत थोडा वेळ का होईना पण लाभली तर राजकारणी पुरुषास चैतन्य येते. या उबदार सोबतीत "मझा" आहे यात संशयच नाही. त्यावरून एक गोष्ट आठवते. "स्त्रिया" या विषयावर नव्या दिल्लीत अर्थमंत्री, गृहमंत्री व विदेश खात्याचे उपमंत्री यांची जोरात चर्चा चालली होती. विदेश उपमंत्री आपला अनुभव सांगत होते, "स्त्रियांच्या बाबतीत साठ टक्के काम व चाळीस टक्के शरीरसुख असते." त्यावर अर्थमंत्री म्हणाले, "माझ्या मते त्यात पंचाहत्तर टक्के काम व पंचवीस टक्के शरीरसुख असते." लगेच गृहमंत्री उद्गारले, "छेः छेः, त्यात नव्वद टक्के कर्तबगारी व दहाच टक्के मझा असते पहा."

सेक्रेटरीएटमधील आय. सी. एस. सचिव त्यांच्या मंत्र्यांचा वाद लक्षपूर्वक ऐकत होते. त्या चिटणीसांपैकी एक पुढे आला व म्हणाला, "साहेब, आपण म्हणता तसे नसावे. माझ्या मते त्यात शंभर टक्के मझा व शून्य टक्के काम असावे."

"कशावरून ?"

"कारण उघड आहे. त्यामध्ये जर काही काम असते तर तुम्ही मंत्र्यांनी नक्कीच ते आम्हा चिटणीसांवर सोपविले असते !"

स्त्रियांचा सहवास सुखद असतो हे नक्की. हे सुख शारीरिक किती व मानसिक किती हा विवाद्य मुद्दा आहे. माझ्या मते ते पुरुषांच्या वयावर अवलंबून असते. अर्थात् काही पुरुष साठीच्या पुढेही चिरंतर तरुण वाटतात. पन्नाशीनंतर स्त्रियांचा सहवास "सेक्स्"साठी फार थोडा असतो. मानसशास्त्राप्रमाणे स्त्रियांचे हास्य, विनोद व संभाषण पुरुषाच्या चित्तवृत्ती उल्हसित करतात, म्हाताऱ्यास यौवन प्राप्त करून देतात व त्यास आपण हे पृथ्वीवरील वैभव सुख भोगण्यासाठी खूप जगले पाहिजे अशी जाणीव करून देतात. चिंतामणराव देशमुख हे संस्कृत भाषेचे विद्वान व रसिक पंडित, आय सी. एस. अधिकारी व अर्थशास्त्राचे नाणावलेले तज्ज्ञ. ह्या अर्थमंत्र्यांची









अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




कारकीर्द फार गाजली. एकदा ते त्यांच्या सचिवालयातील तरुण स्त्री स्टाफविषयी म्हणाले, "ह्या कामावर हजर असल्या तरी येथे काम सुचत नाही आणि कामावर हजर नसल्या तरी ऑफीसचे काम होत नाही !" पूर्वीच्या इंद्राचा वारसा आजच्या पब्लीक सेक्टरमधील बहुसंख्य कचेऱ्यांतून पद्धतशीरपणे उचललेला दिसतो. या कचेऱ्यांना मधली सुट्टी झाली की इंद्रधनुष्याप्रमाणे या कचेऱ्यांच्या परिसरात सप्तरंगांचे प्रदर्शन घडते. खुद्द या कार्यालयात या स्त्रियांमुळे राजकारण इतके खेळले जाते की कोण कोठे "डीफेक्ट" होतो त्याकडे साऱ्या ऑफीसचे लक्ष लागून राहते व त्या गडबडीत खरे काम दूरच रहाते.

**चाणक्य नीती**

स्त्रियांच्या ह्या उत्तेजक गुणांचा फायदा राजकारणात करून घेण्याचा परिपाठ भारतात प्राचीन काळापासून आहे. कौटील्य अर्थशास्त्रात ह्या गुणात निष्णात असलेल्या तरुणींना तयार (ट्रेण्ड) करून त्यांचा फायदा कसा उठवावा त्याचे तंत्र चाणक्याने फार खुमारीने वर्णिले आहे. स्वयंपाकी, वाढपी, स्नान घालणारे, अंग मर्दन करणारे, न्हावी, हुजरे, पाणके यांच्याबरोबर नट्या, नर्तिका, नायिका, वादन करणाऱ्या अथवा कलावंतिणी या विविध रूपाने गुप्तचरांनी अधिकाऱ्यांच्या व राजांच्या अंतर्गृहात प्रवेश मिळवून व संबंध प्रस्थापित करून त्यांच्या आभ्यंतर व्यवहाराची खडान्खडा माहिती मिळवावी, असे चाणक्य सांगतो. भिक्षुकी वेषात वावरणाऱ्या स्त्री हेरांनी ती संपूर्ण माहिती गुप्तचर खात्याला पुरवावी असेही आर्य चाणक्य बजावतो.

स्त्रियांचे हे लोभस आकर्षण आजसुद्धा परदेश खात्यात वापरले जाते. नेहरू घराणे स्टालीनला ब्रिटीशांचे हस्तक वाटे. नेहरूंच्या बहिणीस (विजयालक्ष्मी पंडित यांना). स्टालीन ब्रिटीशांनी धाडलेली हेरच समजत असे. या मनोमन भीतीने ग्रासले गेल्यामुळे त्यांच्या कारकीर्दीत स्टालीनने एकदाही त्यांची भेट घेतली नाही ! आजही प्रत्येक देशाच्या विदेशखात्यात ज्यांच्या बायका 'सोशल बटरफ्लाय' असतील त्यांना प्रथम पसंत केले जाते. काही वर्षांपूर्वी वीस वर्षांची ख्रिश्चन कीलर व सोळा वर्षांची तिची सखी मँडी यांनी इंग्लंडच्या राजकीय वर्तुळात खळबळ उडवून दिली होती. आयूबखानापासून ते तहायत इंग्लंडच्या संरक्षण मंत्र्यापर्यंत मोठमोठी आंतरराष्ट्रीय नावे कीलरच्या लफड्यात गोवली गेली होती. सोव्हिएत रशियाचा एक हस्तक आत गुंतल्यामुळे तर ते प्रकरण जास्तच पेटले. ब्रिटिश संरक्षण मंत्र्यास त्या पोरीपायी राजीनामा द्यावा लागला व रशियन हस्तकास ब्रिटनमधून पोबारा करावा लागला ! कीलरने मात्र या सर्व प्रकरणात कोटी कोटी पौंडांची कमाई केली व आता ती सिनेसृष्टीत मजेने वावरत आहे.

**भेदनीतीचे महान कार्य**

स्त्रीहेरांचा उपयोग बहुधा भेदनीतीसाठी होतो. युद्धकालात माताहारीसारख्या स्त्रीहेर त्यांच्या राष्ट्राच्या इतिहासात अजरामर झाल्या. एकेका स्त्रीहेराने संपूर्ण ब्रिगेडपेक्षा कधी कधी जास्त मोलाची कामगिरी करून दाखविली आहे ! राजकारणात भेदनीती हा शेवटचा उपाय समजला जातो. राजकीय नाते जोडण्यासाठी, आर्थिक व सांस्कृतिक संबंध सांधण्यासाठी सुंदर पण हुशार स्त्रियांचा अतिशय उपयोग होतो. ग्रीकांनी भारतीय राजांना आपल्या सुंदर लावण्यलतिका अर्पण करून राजनैतिक व व्यापारी संबंध प्रस्थापित केल्याचे उदाहरण प्रसिद्ध आहे. हर्ष राजाने आपली बहीण राजश्री लंकेस सांस्कृतिक संबंध साधण्यासाठी धाडली. आसामात नागालँड होण्याचे कारण एक स्त्री ! एक परदेशी मिशनरी जोडपे प्रथम १९ व्या शतकात तेथे गेले. नागांनी त्या मिशनऱ्यास मारून टाकले. त्याच्या पत्नीने पतीचे अपूर्ण कार्य चालविण्यासाठी तेथल्याच एका नागा सरदाराशी लग्न लावले व हळू हळू प्रेमाने त्याच्या मित्रांची मने जिंकून त्यांचे धर्मांतर घडवून आणले.

राजकारणात पुरुषांनी स्त्रियांपासून स्फूर्ती घेऊन बरेच कार्य करून दाखविले आहे. हे सारे कर्तबगारीचे श्रेय पुरुषांनी मोठ्या मनाने त्यांना देऊ केले आहे. स्त्रिया जर नसत्या तर ही कर्तबगारी अर्थातच ह्या पुरुषांच्या हातून घडली नसती. हाडा राणीचा नवरा युद्धातून परत आला. त्याचा भ्याडपणा पाहून ती संतापली व म्हणाली, "उठ कंथ, हथियार ले, मैं लेऊं शक्कर घी. रणात तू कामास आलास तर जगात तू अजरामर होशील." तिचा नवरा








रणांगणावर परत फिरला व यशस्वी ठरला ! शिवाजीने त्याच्या मातेसाठी सिंहगडासारखा दुर्दम्य व अवघडात अवघड गड जिंकून घेतला. बाजबहाद्दराने दुर्गम पर्वतावर नदीचे पाणी उलटवून पाण्याचा पुरवठा करून जनतेचे हित साधले ते कोणासाठी ? एका रूपमतीचे आवाहन पुरे करण्यासाठी ! सीता नसती तर रामायण झाले नसते व द्रौपद्रीवर पांडवांचे प्रेम नसते तर कुरुक्षेत्री महाभारत उभेच राहीले नसते. प्रत्येक राष्ट्राच्या इतिहासात स्त्रीने रामायण-महाभारत घडविले आहे !

कस्तुरबा गांधीजींच्या पत्नी. साधी, भोळी पण जोरदार इच्छाशक्ती असलेली ही हिंदू नारी पतीवर उत्कट प्रेम व भक्ती करी. लग्न झाल्यावर कस्तूरबांच्या हृदयास जे जे पटे तेच त्या करीत. त्यामुळे गांधीजी व कस्तुरबा यांचे सुरवातीस झगडे होत. तरुण गांधीजींना नंतर कळून चुकले की नुसती आज्ञा फर्मावून येथे चालणार नाही, माझ्या कृत्यामागील हेतूची सत्यता तिला पटवून देणे आवश्यक आहे. याचेच नाव सत्याग्रह ! गांधीजी कस्तूरबाना "सत्याग्रहाचे गुरु" मानीत. समोरच्याचा पराभव करण्याच्या हेतूने नाही तर समोरच्याच्या हृदयात शिरून त्याचे मतांतर करून जिंकायची कला म्हणजे सत्याग्रह ! गांधीजींनी सुरू केलेली सारी चळवळ ह्या सत्याग्रहावर आधारलेली होती.

मोठ्या माणसांच्या आयुष्यात या स्फूर्तीदायिनींनी खरोखर फार मोठी कामे केली आहेत. जग त्यांच्या स्फूर्तिदायक कर्तबगारीसाठी त्यांचे नेहमी ऋणी राहील. आपले आजचे समाजवादी पुढारी बहुधा मास्तरीणींचे नवरे म्हणून प्रसिद्ध आहेत. या नवऱ्यांचे त्यांच्या बायकांवरील प्रेम अपूर्व आहे. साऱ्या राजकीय खेळात आशानिराशेचा उनपाऊस सारखा चालू असतो. त्यात या सौ. एस. एम. किंवा सौ. मधु लिमये नसत्या तर हे समाजवादी पुढारी एव्हांना सर्वोदयी पुढारी झाले असते. जयप्रकाश नारायण किंवा डॉ. राम मनोहर लोहिया यांना अशा कोणी स्फूर्तिदायिनी कायमच्या लाभल्या असत्या तर त्यांचे जीवन निश्चित जास्त यशस्वी झाले असते.

स्फूर्तिदायिनी होण्यासाठी स्त्रीने पुढाऱ्याशी लग्न केलेच पाहिजे असा नियम नाही. पुष्कळ वेळा इच्छा असूनही असे लग्न करणे पुढाऱ्यास शक्य नसते. त्याच्या भक्तगणात त्याने खळबळ माजवून त्याचा राजकीय भाव त्या प्रकरणात केव्हा घसरेल याचा नेम नसतो. अशा परिस्थितीत जवळ राहून स्फूर्तिदायिनी म्हणून काम करायचे पण लग्न न करून साऱ्या आशाआकांक्षांवर पाणी सोडायचे, अशा खडतर दिव्यातून त्या महान बाईस जावे लागते. मिस् स्टीव्हनसनने आपले लॉईड जॉर्जवर प्रेम आहे, असे सांगताच मिस् स्टीव्हनसनची आई कोण खवळली व म्हणाली, "लॉईड जॉर्जची नुसती सेक्रेटरी राहून त्याच्याशी हे असे संबंध ठेवण्यापेक्षा तू मरून कां जात नाहीस ?" लॉईड जॉर्जप्रमाणेच कन्हैयालाल मुनशी व लीलावती मुनशी यांची कहाणी आहे. कन्हैयालाल हे ब्राह्मण तर लीलावती जैन वाणी व दोन मुले असलेली दुसऱ्याची पत्नी ! मात्र या दोघांचे एकमेकांवर निःसीम प्रेम होते. मुनशींचे अमर गुजराती वाङमय लीलावतींशिवाय लिहून झालेच नसते. सुदैवाने लीलावतींचा पहिला नवरा पुढे मेला व त्यांना कन्हैयालाल मुनशींशी कायदेशीरपणे दुसरे लग्न लावता आले. "मारा छोकरा, तमारो छोकरा व आपणा छोकरा," ही त्या दोघांची विनोदी सत्यकथा प्रसिद्धच आहे. सर्व प्रतिकूल परिस्थिती असूनसुद्धा मुनशींनी हे "प्रकरण" कां पत्करले ? कारण लीलावतींशिवाय मुनशींच्या व्यक्तिमत्वाला कदापीही बहर आला नसता.

चर्चिलची अशीच कहाणी आहे. चर्चिलने आयुष्यात जेवढे अपयश भोगले तेवढे दुर्दैव क्वचित् कोणाच्या कपाळी आले असेल. दुसऱ्या महायुद्धाचा हा महान् विजेता ! पण ब्रिटिश मतदारांनी युद्ध जिंकताच त्यांना खेचून खाली ओढले. सौ. चर्चिल होत्या म्हणून चर्चिल चर्चिल म्हणून टिकून राहीले. नाहीतर ते केव्हाच वेडे झाले असते ! लेखनास उत्तेजन देऊन महायुद्धावर सहा प्रचंड ग्रंथ अत्यंत अद्भूत भाषाशैलीत चर्चिले यांनी लिहून काढले त्याचे यश त्यांच्या पत्नीसच द्यावे लागेल. लेखन करून कंटाळलेला हा वीर चित्रे काढी, गवंडी काम करी, मासे पाळी किंवा घोड्यांच्या शर्यतीस जाई. पराजयात सुख शोधून काढण्याची खास किमया चर्चिल यांना त्यांच्या पत्नीने शिकविली.

प्रिय पत्नीच्या मृत्यूनंतर बऱ्याच महापुरुषांनी आपले आयुष्य एखाद्या महान कार्यास वाहून घेतलेले आढळून येते. मुमताज मरण पावली नसती तर ताजमहाल बांधला गेला असता काय ? कमला नेहरू टी. बी. ने स्वित्झर्लंडमध्ये गेल्या व पंडित नेहरूंनी आपले सारे जीवन भारतीय स्वातंत्र्याच्या चळवळीस अर्पण केले. जयपूरच्या भूतपूर्व मुख्य मंत्री हिरालाल शास्त्री यांची हकीगत अशीच आहे. एप्रिल १९३५ मध्ये त्यांची अत्यंत प्रिय कन्या मरण पावली. त्यांना मोठा धक्का बसला. तिच्या स्मरणार्थ त्यांनी "शांतीबाई










शिक्षण कुटीर" नांवाची मुलींची शाळा सुरू केली. त्यातूनच पुढे वनस्थल विश्वविद्यालयाची निर्मिती झाली. आज जयपूरपासून पंचेचाळीस मैल अंतरावर वनस्थल हे स्त्रियांसाठी नांवाजलेले आंतरराष्ट्रीय सांस्कृतिक केंद्र समजले जाते.

आपण वांछिलेल्या स्त्रीशी प्रत्येक वेळा लग्नसंबंध जोडणे पुरुषास किंवा त्याउलट स्त्रीस शक्य होत नाही. हट्टाने तो जोडू गेल्यास आयुष्याचा सांधाच बदलतो. मिसेस् सिम्पसनशी लग्न करून इंग्लंडचे राज्यपद आठव्या एडवर्डने गमावलेच ना ? एको-णीस वर्षांच्या आपल्या सेक्रेटरीशी पासष्ट वर्षाच्या द्रविड कळघम या पक्षाच्या रामस्वामी पेरीयर या पुढाऱ्यान लग्न लावले नसते तर पक्षात दुफळी माजून डी. एम. के. हा दुसरा पक्ष निघाला नसता. असल्या प्रकरणी अशी स्त्री वेडी म्हणावी लागेल ! राजकारणाच्या लढ्यात नीति-अनीतीस फार मोठे स्थान दिले जात नाही. या स्त्रियांनी लग्नाशिवाय तसेच राहिले तर काय बिघडते ? निदान त्या प्रसिद्ध राजपुरुषाचे जीवन तर बरबाद होणार नाही ! लग्न लावून ऑफीशीअल पत्नी म्हणून मिरविण्याच्या स्त्रियांच्या हौसेतून बरीच 'ऑपरेशन बरबाद' निर्माण झाली आहेत !

या सर्व गडबडीत आजन्म ब्रह्मचारी राहणाऱ्या पुढाऱ्यांविषयी मला फार आदर वाटतो. स्त्रीपायी पुरुषाचा वेळ खर्च होतो. तिच्या निरनिराळ्या "मूडस्"पायी त्याच्या कार्यशक्तीवरही परिणाम होतो. त्यापेक्षा तो वेळ व ती शक्ती त्याने विधायक कार्यासाठी खर्च केल्यास त्याचे कार्य निश्चित वाढेल. या हेतूने बराच त्यागी मंडळी लग्नच करीत नाहीत. स्वा. विवेकानंदांचे ज्वलंत उदाहरण डोळ्यासमोर आहे. रा. स्व. संघ व जनसंघ यांच्यात अशी बरीच उदाहरणे दिसतात. दीनदयाळजी जनसंघाचे अध्यक्ष होते. जग-न्नाथराव जोशी हे जनरल सेक्रेटरी, बाजपेयी हे सध्याचे अध्यक्ष व जनसंघाचे लोकसभेतील पुढारी, हुकुमचंद कछवाई हे लोकसभा सदस्य व सुंदरसिंग भंडारी आणि जगदीश प्रसाद माथूर हे पदा-धिकारी सारेच्या सारे ब्रह्मचारी आहेत.

डॉक्टर असल्यामुळे कोणत्याही घटनेकडे ऐतिहासिक, शास्त्रीय व चिकित्सक दृष्टीने पाहण्याची मला सवय लागलेली आहे. ब्रह्मचारी म्हणवून घेणारे अनेक साधुसंत माझे गुप्त रोगाचे पेशंट्स् आहेत. केवळ शास्त्रीय कुतुहलातून मी बऱ्याच ब्रह्मचारी राजकारणी पुरुषांशी मुद्दामच ओळख वाढविली व त्यांची खाजगी जीवने अभ्यासकाच्या दृष्टीतून तपासली. बहुधा मला आढळले की हे सारे ब्रह्मचारी पुढारी परिस्थितीने ब्रह्मचारी बनलेले आहेत, मनाने वा वृत्तीने नव्हेत ! उदा : कृष्ण मेनन इंग्लंडमध्ये असताना त्यांचे एका इंग्रज मुलीवर प्रेम होते. तिने ह्या टी. वी. अस-लेल्या "ब्लॅकी"शी लग्न लावायला नकार दिला. अंती ते ब्रह्मचारी राहिले पण अत्यंत जहाल ब्रिटिशविरोधी बनले. दुसरे उदाहरण प. बंगालच्या भूतपूर्व मुख्य मंत्र्यांचे. हे मेडीकल विद्यार्थी असताना एका मुलीच्या प्रेमात पडले. ह्या पोरीच्या बापाजवळ त्यावेळेस चार रोलस् रॉईस गाड्या होत्या. बी. सी. रॉय पुढे डॉक्टर झाले. मुलीने तिच्या बापाजवळ रॉय बाबूंशी लग्न कर-ण्याची गोष्ट काढताच "ह्या भिकारड्याशी मी तुला लग्न लावू देणार नाही !" असे म्हणून त्यांनी तिला धुडकावून लावले. रॉय बाबू कंटाळून, चिडून पुढील शिक्षणासाठी इंग्लंडला निघून गेले व तेथे सर्वत्र त्यांनी आपल्या बुद्धिप्रकाशामुळे भारताचे नाव उज्वल केले. मुलीने "लग्न करेन तर रॉय बाबूंशीच," अशी प्रतिज्ञा केली होती. बी. सी. रॉय इंग्लंडहून परतले त्या वेळी त्यांना न्यायला मुलीचे पिताश्री विमानतळावर गेले होते. मुलीच्या लग्नाची त्यांनी गोष्ट विमानतळावर काढताच बी. सी. रॉय म्हणाले, "मी जेव्हा आपणास विचारले होते तेव्हा मी भिकारडा व क्षुद्र होतो. आज मला आपण कमी प्रतीचे वाटत आहात. मला आपल्या मुलीशी काहीही कर्तव्य नाही." त्यांची प्रिया पुढे झुरून मेली. रॉय बाबूंचे तिच्यावर निःसीम प्रेम होते. त्यांनी शेवटपर्यंत लग्न केले नाही. फार काय एवढी दांडगी प्रॅक्टीस करूनदेखील एकाही परस्त्रीस त्यांनी स्पर्श केला नाही ! त्यांचे लग्न त्यांनी प्रॅक्टीसशी लावले. "ग़रीब भिकारड्यां"ची सेवा करण्यासाठी ते कांग्रेसमध्ये शिरले. मेनन जसे प्रखर ब्रिटिश साम्राज्यशाहीविरोधी झाले त्याप्रमाणे बी. सी. रॉयदेखील शेवटपर्यंत भांडवलशाहीविरोधी होते. मात्र डिवचले

गलेले रॉय बाबू स्वतःच एक मोठे भांडवलशाह बनले ! त्यावेळेस त्यांची तपासावयाची फी पंचेचाळीस रुपये होती !

बी. सी. रॉय किंवा कृष्ण मेनन–ही झाली तत्त्वनिष्ठ माणसे. गोळवलकर गुरुजी, एकनाथजी रानडे किंवा दत्तोपंत ठेंगडी यांच्यासारख्या पुरुषश्रेष्ठांच्या निष्ठेविषयी संशय घेणे म्हणजे सूर्यावर थुंकण्यासारखे आहे. त्याउलट इतर काही पक्षांतील बोगस ब्रह्मचार्यांविषयी जेवढे लिहावे तेवढे थोडेच आहे. कॉंग्रेसमधील काही भोंदूंवर सुंदर कादंबऱ्या रचता येतील. जेलमध्ये बराच काळ राहिल्यामुळे या ब्रह्मचारी भोंदूंना घातक सवयी लागल्या. जेल-मधून सुटका होताच हे आचार्य इतके वेडेपिसे झाले की त्यांना शेवटी गुप्त रोगांची लागण लागली ! हिंदु महासभेच्या एका थोर पुढाऱ्यास अशीच लैंगिक राक्षसीपणाची बाधा झाली होती. त्यामुळे त्यांच्या भगतगणात आपोआपच त्यांचा भाव कमी झाला. भारतीय संस्कृतीत चारित्र्य ही अजून पूज्य वस्तू मानतात. तेथे गडबड होताच तुमचे "अवमूल्यन" होते. कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांनी या प्रकर-णाचा पुरा लाभ उठविला व त्यांच्या भक्तगणांपैकी बरेच मराठी लोक कॉंग्रेसमध्ये पळविले. ना. चव्हाण परत फिरलेल्या या अनेकां-तील एक होत. या पुढाऱ्याचे तत्कालीन चारित्र्य लोकमान्य टिळकांप्रमाणे स्वच्छ असते तर त्यांना कॉंग्रेसवर निश्चित मात करता आली असती.

* * *

---

(पृष्ठ १० वरून—नादान)

काय म्हणे यमू, यमी, यमुना ! मी यापुढे तुला यामिनी म्हणणार !"

"यामिनीचंसुद्धा यमू, यमी होऊ शकेल म्हटलं !" मी उत्तर दिलं. त्यावर तुम्ही म्हणालात, "पण यामिनी या शब्दाचा अर्थ किती छान आहे ! यामिनी म्हणजे रात्र ! साऱ्या सुखांचं आगर ! नवराबायको तिची आतुरतेनं वाट पाहतात ती.

नंतर तुम्ही काहीतरी फार उघडंवाघडं आणि शृंगारिक बोललात. मला काही ते आवडलं नाही,पण मी गप्प बसले. (शक्यतो-पर्यंत मिळतं घ्यायचा उपदेश आईनं मला केला होता. मग पत्रातून तुम्ही मला 'प्राणप्रिय यामिनी' वगैरे लिहू लागलात; पण तिथंही तुम्ही थांबला नाहीत. यामि-नीचं तुम्ही यामा केलंत आणि मी तुम्हांला लिहिलेल्या पत्रोत्तरात 'यामिनी' अशीच स्वाक्षरी असावी असाही तुम्ही हट्ट धर-लात. तिथंही मी पडतं घेतलं. मात्र मी तुम्हांला शपथ घालून सांगितलं की माझं 'यामिनी' हे तुम्ही ठेवलेलं नाव तूर्त तरी तुमच्या-माझ्यातच राहिलं पाहिजे. पण तसं झालं नाही. माझ्या महाविद्यालया-तील वात्रट मलं लवकरच मला 'यामिनी' म्हणून हाका मारू लागले. माझी एक मैत्रिणसुद्धा मला एकदा 'यामिनी' म्हणाली. ते नाव भलल्या माणसांच्या तोंडी ऐकून मी दचकले. हे नाव तिच्यापर्यंत कसं आलं ते मी माझ्या मैत्रिणीला विचारलं, तेव्हां तिनं मला सांगितलं की "हे नावच काय, तुझा शेखर तुझी आणि त्याची सगळीच्या सगळी पत्रं त्याच्या चारदोन मित्रांना वाचून दाखवितो. तुझी आणि त्याची पत्रं मिटक्या मारीत ऐकणं, हा त्यांचा एक छंद आहे."

हे ऐकून मला चटका बसल्यासारखं झालं. जी पत्रं केवळ तुमच्या–माझ्यासाठी होती, त्यांचं तुम्ही सार्वजनिक वाचन करीत होतात ! जे रहस्य केवळ तुमच्या-माझ्यात होतं, त्याचा तुम्ही सार्वजनिक बाजार मांडला होतात ! आपल्या बायकोच्या अंतरंगात डोकावून पाहण्याची अशी का कोणी परक्या माणसांना संधी देतो ? माझं मन मी तुमच्यासमोर उघड केलं, म्हणन तुम्ही ते दुसऱ्यांसमोर उघड करावं की काय ? यात कोणती प्रौढी होती ? कोणता पुरुषार्थ होता ? स्त्रीचं मन आणि शरीरही तिच्या प्रेमाच्या पुरुषासमोर उघडं झालं म्हणून त्यानं ते चार लोकांना दाखवत सुटावं की काय ? पण तुम्ही तेच करीत होतात. हे तुम्ही कां बरं करीत होतात ? एक सुंदर आणि शिकलेली मुलगी आप-ल्याला कशी गोडगोड पत्रं लिहिते, हे का तुम्हांला लोकांना दाखवायचं होतं ? त्यात का तुम्हांला मोठेपणा वाटत होता ? वाटत असला पाहिजे. कारण माझ्या पत्रातली वाक्यच्या वाक्यं मुलांच्या तोंडून माझ्या कानावर येऊ लागली. माझी पत्रं आणि तुम्ही माझं ठेवलेलं यामिनी हे नाव, म्हणजे एक थट्टेचा विषय होऊन बसला. तुम्हांला माझं यमू किंवा यमुना हे नाव आवडत नव्हतं, पण तुमच्या 'यामा'चा भयंकर अर्थ लवकरच माझ्या लक्षात आला. कारण माझ्या एका वहीवर "यामा-द-पिट" (Yama the pit) असं कुणीतरी लिहूनच ठेवलं. बाबांनी ते पाहिलं आणि ते भयंकर संतापले. 'यामा द पिट' हे अलेक्झांडर कुलीन नांवाच्या रशियन लेखकानं निर्माण केलेल्या वेश्येचं नाव आहे, हे मला नंतर कळलं. माझ्या अंगाचा तिळपापड झाला. त्या 'यामिनी' आणि 'यामा' या नावांना मी सहस्र शिव्या मोजल्या. मी तुम्हांला पत्र लिहिणंही बंद केलं. आपलं काही तरी बिनसलं आहे, हे आई बाबांच्याही ध्यानात आलं. तुम्ही आमच्याकडे येत होतात, पण मी तुमच्याशी मोकळेपणानं बोलत नव्हते. तुमच्याबरोबर बाहेर येत नव्हते. तेव्हा आईनं मला सांगितलं, "थोडक्या-साठी डोक्यात राख घालू नको. संसारात शेवटी तडजोड करावीच लागते." पुन्हा मी तडजोडीच्या मनःस्थितीत आहे. तुमच्या-विषयी काही थोडं मला वाटू लागलेलंच होतं. तशात तुम्ही मला एकदा तुमच्या खोलीवर येण्याविषयी खूप गळ घातलीत. सारी भरपाई करून देतो म्हणालात. 'चुकलो' म्हणालात. सद्‌गदित झालात. आणि मी तुमच्या खोलीवर आले. तुम्ही माझ्याशी खूप गोड बोललात, प्रेमाच्या गोष्टी बोललात. मला अनेक काव्यमय विशेषणं लावलीत. माझी थोडीशी फाजील थट्टाही केलीत. ती मी आपण दोघंच तुमच्या खोलीत होतो म्हणून चालवून घेतली. मी सुखावले. माझं मन थरारलं,






अनुक्रमणिका

प्रसन्न होऊ लागलं. तशी तुम्ही माझ्यासाठी आणलेला एक सुंदर विनबाह्यांचा ब्लाऊज काढलात. त्या ब्लाऊजचं कापड खरंच फार सुंदर होतं, पण त्याला बाह्या नव्हत्या. त्याला बाह्या नाहीत हे माझ्या नंतर लक्षात आलं आणि मी म्हणाले, "मला विनबाह्यांचा ब्लाऊज घालायला आवडत नाही." तेव्हा तुम्ही माझी हनुवटी कुरवाळीत म्हणालात, "पण एकदा मला आवडतं म्हणून घाल. इथं आपण दोघंच आहोत. आपले सुंदर दंड तू कुठवर माझ्यापासून लपविणार ? लग्न झाल्यावर हवं तर मी तुला कपाटभर लांब बाह्यांची पोलकी करून देईन. अगदी हरिभाऊ आपट्यांच्या एखाद्या सुधारक नायिकेसारखी ! मग तर झालं ? पुन्हा तुम्ही माझी हनुवटी कुरवाळलीत. मला नमस्कार केलात. मी विरघळले. आडोशाला गेले. तो विनबाह्यांचा ब्लाऊज मी घातला; पण पदर दंडावरून घट्ट ओढून घेतला. तुम्ही मला जवळ घेत म्हणालात, "हे काय ? दंड लपविण्यासाठी का तो ब्लाऊज मी तुला घालायला सांगितला ?" आणि असं म्हणून तुम्ही मला जवळ ओढलंत. तोच फाडकन ध्वनी झाला. पुरुषभर उंचीचं कपाट उघडलं. त्यातून शिकत आणि 'काही तरी चावलं' म्हणत तुमचा एक मित्र बाहेर आला. त्याला मी तात्काळ ओळखलं. खेळगृहात 'जिरली' म्हणून ओरडणारा तोच तो तुमचा वर्गबंधू होता. तुम्ही त्याला बुद्ध्या कपाटात लपवून ठेवलं होतं. त्याच्याशी तुम्ही पैज मारली होती त्याच्या देखत तुम्ही माझा मुका घेणार होतात. चावट विनोद तर त्याच्या कानावर जाईल अशा रीतीनं तुम्ही माझ्याशी केलाच होतात. तुम्ही त्याच्या साक्षीनं माझी हनुवटी धरली होतीत, मला जवळ घेतलं होतंत. एका कुमारिकेचं, तुमच्या भावी पत्नीचं तुम्ही एका परक्या माणसासमोर प्रदर्शन मांडलं होतंत ! माझ्या भावनेची कोमलता, उत्कटता, पावित्र्य, काही तुमच्या खिजगणतीत नव्हतं. तुम्हांला नुसतं प्रदर्शन करायचं होतं. तुमच्या उथळ, उघड्या वाघड्या, असंस्कृत, रानटी पौरुषाचं प्रदर्शन ! एक जिंकलेली वस्तू तुम्हांला दुसऱ्याला दाखवायची होती. दुसऱ्याच्या देखत तुम्हांला तिचा उपभोग घ्यायचा होता. शीः शी ! घाणेरडं होतं तुमचं वर्तन ! या वर्तनाला माझ्यापाशी क्षमा नाही. ज्याक्षणी तुमच्या मित्रानं खोकत, शिकत आणि जिभा चाटीत, मी कपाटाबाहेर येताना पाहिलं, त्याच क्षणी तुमचा माझा संबंध संपला. तुमचं माझं काही एक नातं उरलं नाही. कुठलंही जवळचं, जिव्हाळ्याचं कोमल नातं उत्पन्न करावं अशा योग्यतेचे तुम्ही मला वाटत नाही. जे घडलं, ते सारं मी माझ्या आईबाबांना सांगितलेलं आहे. झालं ते मी पोटात घालावं असं त्यांनीसुद्धा नंतर मला सांगितलं नाही. तुमची वृत्ती मला रुचणारी नव्हे, पटणारी नव्हे, पचणारी नव्हे. तुमच्याशी साधा स्नेहसंबंध ठेवण्याचीसुद्धा माझी इच्छा नाही. आणि तुम्ही कितीही पत्रं पाठविलीत, तरी मी तुमच्याशी कधी काळी लग्न करायला सिद्ध होईन ही गोष्ट तर केवळ अशक्य आहे. तुम्ही तुमच्यासारखीच कुणीतरी उथळ, सवंग, अडाणी, असंस्कृत आणि दिखाऊ मुलगी पहा. तुम्ही डॉक्टर होणार, तुम्हांला शरीराचं वेड आहे. तुम्हांला शरीर ही एक प्रयोग करण्याची गोष्ट वाटते, फाडण्याची गोष्ट वाटते. मी सुसंस्कृत मनाची भुकेली आहे. मला सुंदर शरीर नसलं तरी चालेल, पण सुंदर मन मात्र पाहिजे. यमुनेला मोह केवळ कृष्णाच्या मुरलीचाच पडू शकतो. कालिया तिला रुचत नाही. मला तुम्ही एखाद्या कालियासारखे वाटता. यमुना तुमच्यासाठी नाही. तुम्ही एखादी अंधेराने भरलेली यामिनीच पहा ! आणि कृपा करून यापुढे मला पत्र पाठविण्याचे कष्ट घेऊ नका. तुमच्या पत्रांचा माझ्यावर रतिमात्र परिणाम होणार नाही. हवं तर हे पत्रसुद्धा तुम्ही आपल्या सगळ्या मित्रांना दाखवा. तुमचा प्रदर्शनवादी नादानपणा जगाला कळू द्या ! मला तो कळलेलाच आहे.

—नमस्कार ! ●

संतप्त साहित्यिकांची




'लंगोटी' अनियतकालिके



— वि. वा. पत्की

बबनराव आज विशेष आनंदात होते...

ते आताशा असेच खुषीत असतात हे सर्वांच्या लक्षात आलं होतं. यंदा शाळेच्या एस्. एस्. सी.चा निकाल त्र्याण्णव टक्के लागला होता. शेखर गोडबोलेला जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ती मिळाली होती आणि संस्कृत विषयात चांगले मार्क मिळविण्याची शाळेची परंपरा टिकली होती याचा संस्कृतच्या शिक्षकाप्रमाणेच बबनरावांना अभिमान वाटला होता. शाळेसाठी नवीन शास्त्रीय उपकरणं घ्यायचा त्यांचा तीन वर्षांचा बेत यंदा तडीला तर जाणार होताच; पण त्रिलोकचंद शेटजींनी शाळेला 'सायन्स हॉल'च बांधून द्यायचं ठरविलं होतं त्यामुळे आज सत्तावीस वर्षं आपण शाळेच्या कामाला वाहून घेतलं याचं चीज झाल्याचं ते शाळेतल्या शिक्षकांजवळच नव्हे तर आल्या-गेल्या प्रत्येक माणसाकडे बोलून दाखवीत होते ते उल्हसित मनानं, कृतकृत्यतेच्या जाणीवेनं. बबनरावांनी खुषीत असावं अशाच साऱ्या घटना घडल्या होत्या.

या आनंदाने गेले चार सहा महिने ते आपल्या अंतर्यामीचं सारं दुःख विसरले होते. 'माणसानं आपल्या उद्योगात स्वतःला सारखं गुंतवून ठेवावं. कामाची अशी तटबंदी स्वतःभोवती उभी केली की सांसारिक दुःखांचे बोचरे वारे त्याच्यापर्यंत पोचूच शकणार नाहीत, हा कर्मयोग ते आयुष्यभर आचरीत आले होते, त्यामुळे तरुणपणात दारिद्र्याचे काटे जसे त्यांना टोचले नव्हते, त्याचप्रमाणे आपल्या बाललीलांनी माता-पित्याचं दुःख हलकं करणारी त्यांची लाडकी लेक स्कूटरचा धक्का लागन गतप्राण झाली होती ते दुःखही त्यांनी पचविलं होतं. माधुरीची आठवण त्यांच्यापेक्षा त्यांच्या पत्नीला सारखी व्हायची आणि तिच्या डोळ्यातलं पाणी खळायचं नाही, तसे ते समजुतीच्या स्वरात तिला म्हणायचे, 'जे दुःख टाळता येत नाही ते माणसानं विसरायलाच हवं. तुझ्या महिला मंडळात कागदी फुलं तयार करण्याचा नवा क्लास निघालाय ना, त्याला तू आता रोज जात जा. ती करता करता मग सारं दुःख मागं पडेल. माझं ऐक तू–'

निर्मलाबाईंनी तसं केलं होतं. त्या महिला मंडळात जाऊ लागल्या होत्या. कागदी फुलांचे देठ तयार करताना, त्या फुलात रंग भरताना, ती फुलं एकत्र गुंफताना त्यांना हळूहळू आपल्या अंतःकरणातल्या जखमेवर खपली भरत असल्याचा प्रत्यय आला होता. हास्य-विनोदाच्या प्रसन्न चांदण्यानं हळूहळू घर पुन्हा भरू लागल होतं. त्यातचं मग त्यांचा मुलगा सुहास एस्. एस्. सी. परीक्षत तिसरा आला होता. घरातल्या आनंदाला मग नवी भरती आली होती. आजपर्यंत सुहास आणि माधुरी हे आपले दोन डोळेच आहेत या भावनेनं बबनराव वागत आले होते. त्या डोळ्यांनी त्यांनी जगाकडे पाहिलं होतं तसं सारं जग आनंदानं, उल्हासानं आणि समाधानानं भरलेलं असं त्यांना दिसलं होतं. पण अलीकडच डाव्या डोळ्यात वाढू लागलेल्या मोतीबिंदूमुळे त्यांना थोडं कमी दिसू लागलं होतं, तसंच काहीसं माधुरीच्या मृत्यूनं संसारातल्या सुखाचं झालं होतं. पण सुहासच्या यशानं सारं भरून आलं होतं. 'संसारातलं नवं सुख जुनं दुःख पुसून टाकीत असतं' या विचारानं सुहास विषयीच्या नव्या स्वप्नात पतिपत्नी जुनी दुःखं विसरली होती..

त्यानंतरची चार-पाच वर्षं मग गेली होती ती भुर्दिशी... बी. स्‌. सी. च्या परीक्षेत सुहासनं आजपर्यंतचे मार्कांचे सारे उच्चांक मोडले होते आणि नवं क्षितिज त्याच्या दृष्टीसमोर तरळलं होतं. एका कारखान्यात त्यानं नोकरी धरली होती आणि मग त्या कारखान्याच्या चालकांनीच त्याला 'मेटॅलर्जी 'च्या खास शिक्षणासाठी अमेरिकेला पाठविलं होतं. दोन वर्षं तरी तो तिकडे राहाणार होता या विचारानं निर्मलाबाईच नव्हेत तर बबनरावही मनानं हिरमुसले होते. एकुलत्या एक पुत्राचा हा दोन वर्षांचा वियोगही त्यांना सहन करणं कठीण वाटत होतं. विमानतळावर त्याला निरोप देऊन ती परतली होती ती भरलेल्या डोळ्यांनी आणि जड पावलांनी... एका प्रकारचं रितेपण त्यांच्या अंतःकरणात आलं होतं. सुहासची पत्रं येत होती, अमेरिकन जीवनातल्या गंमती तो लिहीत होता, तसं कधी आनंदानं तर कधी विस्मयानं त्यांची मनं भरून येत होती. त्यांचा दोन वर्षांचा अभ्यासक्रम पुरा झाला होता आणि ज्या कारखान्यात तो शिकला होता त्यानंच त्याला आणखी अनुभवासाठी पगार देऊन ठेवून घ्यायचं ठरविलं होतं. तो आता स्वतःची मोटार घणार होता, चांगल्या नव्या 'अपार्टमेंट'मध्ये राहायला जाणार होता याचा आनंद निर्मलाबाईंच्या इतकाच बबनरावानाही झाला होता, पण मुला-मुलींचं 'डेटिंग' आणि एकत्र राहाणं-सवरणं, 'वीक एंड'मधलं सहजीवन या कल्पनांनी त्यांची मनं भयभीत होत होती. त्याच्या तरुणपणाची त्यांना भीती वाटत होती..'माझा सुहास सुखरूप परत येवो' असा नवस त्या आपल्या कुलदेवतेला पुनः पुन्हा करीत होत्या, पण त्याचा अर्थ होता 'तो एकटाच परत यवो' असा ! त्याच्यासाठी एक फक्कडशी मुलगीही त्यांनी हेरून ठेवली होती, पण बबनरावांच्या जवळ सुद्धा या गोष्टीचा उल्लेख त्यानी कधी केला नव्हता. त्या फक्त सूचकपणे बोलल्या होत्या त्या मुलीच्या आईजवळ, 'अशी मुलगी सून म्हणून आपल्या घरात यावी असं कुणालाही वाटेल !' येवढ्याच शब्दात ! .योग्य वेळ आली की आपल्या मनातली कल्पना त्या बबनरावांना सांगणार होत्या आणि त्यांनी ती सांगितली की 'उत्तम आहे !' असं ते नेहमीसारखं म्हणणार होते, हेही त्यांना ठाऊक होतं.

पण दुर्दैवानं ती वेळ आलीच नव्हती !

मेंदूत रक्तस्राव होऊन निर्मलाबाईंचं निधन एकाएकी झालं होतं. काय होतं आहे हे कळण्यापूर्वीच सारं आटोपलं होतं. बबनरावांच्यावर आकाश कोसळलं होतं. बेसावधपणे चालता चालता त्यांच्या पायाखालची भूमीच दुभंगली होती. त्यांचं मन भांबावलं होतं. आईच्या मृत्यूची बातमी कळताच सुहास आला होता, ढसाढसा रडला होता आणि महिनाभर राहून परत गेला होता. त्यामुळे तर त्यांना अधिकच एकटं एकटं वाटू लागलं होतं. आपल्या मनात एक विचित्र पोकळी निर्माण झाली आहे आणि ती कधीच भरून निघणार नाही या विचारानं त्यांना घेरलं होतं. आपल्या मनातला हा विचार ते सहकारी शिक्षकांजवळ बोलून दाखवीत होते तसे 'सायन्स' शिकविणारे शिक्षक त्यांची समजूत घालण्याच्या अभिप्रायानं म्हणत होते, "असं नका म्हणू, बबनराव ! निसर्ग पोकळी राहूच देत नाही, असं शास्त्रवचनच आहे !" शास्त्रीय विषय शिकविणाऱ्या मानकामे मास्तरांचं ते बोलणं ऐकून बबनराव हसले होते. आपल्या मनातली पोकळी सतत उद्योगानं भरून काढायची होती हे त्यांना माहीत होतं. दुःख विसरण्याचा हा एकच मार्ग आहे हे त्यांना कुणी सांगण्याची गरज नव्हती...

**....आपण काय ऐकतो आहो हेच बबनरावांना समजत नव्हतं.... एका क्षणात सारी नाती बदलली होती.... आपण कसली अपेक्षा केली नि अखेर झालं काय या विचारानं त्यांना काहीच सुचत नव्हतं—**

......

ते खरोखरच असे कामात रमले होते. शाळेच्या वाढीच्या नव्या नव्या योजना त्यांच्या डोक्यात घोळत आणि त्या पार पाडता पाडता सारा दिवस केव्हा निघून गेला हे त्यांना कळत नव्हतं. मात्र दिवसभराचं काम आटोपून ते घरी आले की सारं घर त्यांना खायला उठे. निर्मलाबाईंच्या बरोबर घालविलेल्या सुखी संसाराच्या आठवणी त्यांच्या मनात तरारून येत आणि त्यांची एकही हौस आपणाला पुरविता आली नाही याची खंत, पाण्यावर तवंग यावा, तशी त्यांच्या मनात साचे. असं झालं की त्यांचं मन खिन्न होई. कधी कधी ते बेचैनही होत आणि मग त्यांना झोपच लागेनाशी होई.

ते शाळेतनं घरी आले की दिवसभर कोंडलेले त्यांच्या मनातले विचार दशदिशांनी धावू लागायचे. बांध घालून अडविलेलं पाणी बांध फुटताच सैरावैरा धावू लागतं तसं व्हायचं ! त्यांच्या तोंडावरचं मोकळं हास्य मग क्षणात मावळायचं. जणू शाळेच्या परिसरात असताना त्यांच्या मुखावर जो मुखवटा असे तो घराच्या आत पाऊल टाकलं की क्षणात गळून पडायचा आणि एकाकीपणाच्या भयाण दरीत आपण येऊन पडलो आहोत असं वाटून त्यांचं मन भयभीत होऊन जायचं.

पण एके दिवशी एक अनपेक्षित गोष्ट घडली आणि त्यांच्या आजपर्यंतच्या एकलकोंड्या जीवनाच्या अंधारलेल्या खोलीत एक नवा कवडसा आला !

सुहास येऊन गेल्याला आता सहा महिने होऊन गेले होते. बबनरावांचं मन शाळेच्या कामात पुन्हा रमू लागलं होतं. जखमेवर खपली धरू लागली होती, तोच एके दिवशी शाळेतल्या एक शिक्षिका शांताबाई सोहोनी त्यांच्या खोलीत आल्या आणि त्यांना म्हणाल्या,

"माझं...एक काम होतं...तुमच्याकडे.

बोलताना त्या जरा अडखळल्या होत्या आणि त्यांचं ते अडखळणं बबनरावांच्याही लक्षात आलं होतं.

"काम ? माझ्याकडे ?..."

असं विचारताना पूर्वी एकदोनदा त्यांनी सांगितलेली कामं, त्यांच्या लक्षात आली होती आणि आपल्या एकुलत्या एक लाडक्या





अनुक्रमणिका

लेकीच्या कल्याणासाठी चाललेली त्यांच्या मनाची उलघाल पाहून ते मनांत म्हणाले होते 'आई असावी तर अशी !' त्यांचं काम असायचं ते बहुधा पुण्याला कॉलेजात शिकणाऱ्या आपल्या मुलीबद्दल हे त्यांना ठाऊक होतं आणि शीलाही आपल्या शब्दाचं चीज करते हे त्यांना माहीत असल्यामुळे शांताबाईंनी आपल्या लेकी-बद्दल काही तरी करायला सांगावं आणि ते आपल्या हातून व्हावं याचा बबनरावांना मोठा आनंद वाटे. त्यांच्याच शिफारशीवरून तिला कॉलेजच्या वसतिगृहात जागा तर मिळाली होतीच, पण बबनरावांच्या शब्दामुळंच तिला एका शैक्षणिक संस्थेकडून शिष्य-वृत्ती मिळू लागली होती आणि शांताबाईंच्या वरचा भार तेवढाच कमी झाला होता. त्या किती वेळा तरी बबनरावांना म्हणाल्या होत्या, 'तुमचा शब्द कधी वाया जायचा नाही !' शांताबाई असं म्हणाल्या की बबनरावांनी नुसतं हसावं आणि 'पण शीलाच हुषार आहे म्हणून होतं हे सारं !' असं म्हणावं अशी ही देवाण-घेवाण आज वर्षानुवर्षं चालली होती...

पण असे प्रसंग अनेकदा येऊन गेले होते तरी जे सांगायचं असेल ते सांगताना शांताबाई कधी अडखळलेल्या नव्हत्या हेही बबन-रावांना ठाऊक होतं. म्हणूनच आता सांगायचं होतं ते सांगताना त्या अडखळल्या तेव्हा 'काम ? माझ्याकडे ?' असं त्यांनी विचा-रलं ते अशा स्वरात की मनातलं बोलायचा संकोच त्यांना वाटू नय. 'तुमची कामं मी काय करीत नाही ?' असा विश्वास त्यांच्या मनात निर्माण करावा अशा अभिप्रायानं मग ते मुद्दामच म्हणाले,

"तुमचं काम तर सांगा !

"ते सांगायचं तर जिवावर यतं !..."

"ते कां ? तुम्ही कोणी परक्या का आहात !"

"आपलं माणूस झालं म्हणून त्याला किती त्रास द्यायचा ?

शांताबाईंच्या त्या शब्दांनी बबनराव एकदम चमकले, पण आपल्या मनाचा संभ्रम शक्य तेवढा लपवीत ते म्हणाले,

"आणि हा परकेपणा केव्हापासून वाटायला लागला तुम्हांला ? "

"परकेपणा नाही, पण दुसऱ्याच्या सौजन्याचा फायदा घ्याय-लाही काही मर्यादा हवी ना ?"

असं म्हणत शांताबाई उगीचच हसल्या तसे बबनराव मुद्दा-मच म्हणाले,

"कुणाचे उपकार घ्यायची सवय नाही तुम्हांला, ठाऊक आहे मला, पण एखादे वेळी असंच काही घडतं की—"

"तसं घडलं म्हणून तर आले तुम्हांला त्रास द्यायला !

"ही त्रासाची भाषा कशाला काढता पुनः पुन्हा ?"

"नाही काढीत. सारं सांगतेच. वेळ आहे ना थोडा ? मला हा 'पीरियड' 'ऑफ' आहे म्हणून म्हटलं तुम्हांला वेळ आहे का पाहावा."

"सांगा. सांगा. भरपूर वेळ आहे मला "






अनुक्रमणिका

सरकारी
पंचवार्षिक
मुदतबंद ठेवीवर
मिळणाऱ्या ५ टक्के
करमुक्त सरळ व्याजाचा
**तुमच्या दृष्टीनें**
**अर्थ काय ?**



| प्राप्ती | व्याजावरील* कराचा दर |
|---|---|
| रु. ११०८० | ९.३८% |
| रु. ३०००० | ७.१२% |
| रु. ४०००० | ८.१४% |

* हे दर वार्षिक चक्रवाढ व्याजाचे आहेत.

या ठेवींवर संपत्तीकरही घेतला जात नाही. एकट्याला २५००० आणि संयुक्तरित्या ५०००० रु. पर्यंत ठेवी ठेवता येतात, कोणत्याही टपाल कचेरीत किंवा स्टेट बँक ऑफ इंडियाच्या शाखांमध्ये त्या स्वीकारल्या जातात.



नजीकच्या टपाल कचेरींत
किंवा स्टेट बँक ऑफ इंडियाच्या
शाखेत चौकशी करा.

**राष्ट्रीय बचत संघटना**

davp 69/134

शांताबाईनी मग घडलेली सारी हकिगत त्यांना सांगितली होती आणि त्या म्हणाल्या होत्या,

"मी रागावेन म्हणून शीलानं मला हे कधी कळवलंच नाही. तिच्या हलगर्जीपणामुळं तिच्या ट्रंकेतले सारे पैसे चोरीला गेले त्यामुळे तिला कॉलेजची फी भरता आली नाही, वसतिगृहातल्या 'मेस'चं बिल द्यायचं राहिलं आणि मैत्रिणींकडून उसनवार घेतलेले पैसे त्या मागू लागल्या तशी ती अगदी गोंधळून गेली आणि अखेर नाईलाज झाला तेव्हा सारा प्रकार मला कळवून तिनं लिहिलंय की काहीही करून पांचशे रुपये तावडतोब पाठव. "

"समजलो, समजलो, मी शांताबाई. शाळेनं तुम्हांला तीन चार महिने पगार दिलेला नाही त्यामुळं—"

"तुमचा दो[?] नाही यात. शाळेची वार्षिक ग्रँट आली की साऱ्या शिक्षकांचे पगार तुम्ही न मागता देता, साऱ्यांना माहीत आहे.. पण ही वेळ कशी निभावून न्यायची या विवंचनेत आहे मी गेले चार दिवस. अखेर ठरवलं की तुमच्या कानावर घालाव्या साऱ्या गोष्टी. तुमच्याशिवाय सांगायचं तरी कुणाला हे ?..

शांताबाईच्या शब्दातला तो जिव्हाळा उन्हाळयाच्या दिवसात येणाऱ्या मंद वायूच्या झुळुकीसारखा बबनरावांना मोठा सुखाचा वाटला आणि ते म्हणाले,

"काही काळजी करू नका तुम्ही. मी करतो पैशांची सारी व्यवस्था. पांचशे रुपयेच हवे आहेत ना तुम्हांला ? उद्या शाळेत आलात की घेऊन जा आणि लगेच पाठवा शीलाला. शांताबाई, मुलांच्या हातून चुका होतात..त्यांना आपणच सांभाळून घ्यायला हवं असतं ! "

शांताबाई परत जाताना बबनरावांना उगीचच म्हणाल्या, "गेल्या आठवड्यात दोन दिवस तापानं आजारी होता तुम्ही. म्हणून हा विषय काढायचा धीरच झाला नाही. आता ठीक आहे ना प्रकृती ?

"अहो ठीक काय, उत्तम आहे !

बबनरावांचं हे नेहमीचं बोत[?]णं शांताबाईंच्या चांगलं परिचयाचं होतं तरीही त्या म्हणाल्या,

"आता तुमची काळजी घेणारं घरात कोणी नाही. निर्मलाताई होत्या त्या वेळची गोष्ट वेगळी होती.

बबनराव काही बोलले नाहीत. शांताबाई मग त्यांच्या खोलीतून बाहेर पडल्या आणि तास संपल्याची घंटा वाजली तशा स्टाफ रूमकडे गेल्या.

दुसऱ्या दिवशी शिपाई बोलवायला आला तेव्हा त्या बबनरावांच्या खोलीत गेल्या आणि पांचशे रुपयांच्या नोटा त्यांनी हातावर ठेवल्या तेव्हा शांताबाईनी विचारलं,

"तुमच्यावर भलताच भार तर टाकला नाही ना मी ? "

"काही नाही..." असं बबनराव पुटपुटले तशा त्या मनातल्या मनात चरकल्या आणि म्हणाल्या,

"कुणाकडून उसनवार तर नाही ना आणलेत हे पैसे ?

"अहो देवाण-घेवाणीवर तर सारा संसार चालतो ! पाचशे रुपयांचं काय घेऊन बसलात ?

बबनराव असं म्हणाले तशा शांताबाई काहीशा गोंधळल्या आणि म्हणाल्या, "पगार आला नाही तरी पुढच्या महिन्यात देईन मी तुमचे पैसे !

"सावकाश द्या, कसलीही घाई नाही !

शाळा सुटल्यावर त्या आपल्या मेढेकर सोनाराकडे गेल्या होत्या त्या शीलाच्या इअर्ररिंग्ज दुरुस्त झाल्या आहेत की नाही हे पाहाण्यासाठी. शीलाचं पत्र आल्यापासून तिला शक्य तेवढ्या लवकर पैसे पाठवायला हवेत या विवंचनेत त्या होत्या. आपण पैसे पाठवितो असं त्यांनी शीलाला कळविलं होतं, पण त्यांच्या मनात होतं की शक्य तर आपणच पुण्याला जाऊन यावं, माणसाच्या हातून चुका होतात असा दिलासा तिला द्यावा...बबनरावांनी त्यांच्या हातावर पैसे ठेवले तशा त्या मनाशी म्हणाल्या 'उद्याच जायचं पुण्याला !' जाताना शीलाचे इयर्ररिंग्ज नेता आले तर पाहावे म्हणून त्या मेढेकराच्या दुकानात गेल्या तसा तो हसला आणि म्हणाला,

"आज काय मास्तरांचे पाय दुकानाला लागायचा दिवस दिसतोय, शीलाच्या आई !..."

"मी नाही समजले..."

"अहो, सकाळीच बबनराव आले होते सोन्याच्या बांगड्या गहाण ठवण्यासाठी..."

"कोण ? आमचे हेड मास्तर ?

"होय, होय...पण मी बांगड्या ठेवून घेतल्या नाहीत. म्हटलं, पाचशे रुपयेच हवे आहेत ना तुम्हांला हे घ्या ! "

"मोठे हुषार आहात तुम्ही, बाबूराव !" असं हसत हसत शांता-बाई म्हणाल्या होत्या खऱ्या पण मनातल्या मनात त्या अगदी अस्वस्थ झाल्या होत्या...

पुण्याहून परत आल्या तरी सुद्धा..

बबनरावांना आपण पेचात टाकलं होतं, हा विचार त्यांच्या मनात मग अनेक वेळा येऊन गेला होता आणि त्यांना वाईट वाटलं होतं...

त्यांनी हे आपलं मनोगत मग बबनरावांच्या जवळ बोलून दाखविलं तसे बबनराव म्हणाले,

"तुम्ही कोणी परक्या का आहां ?

पण आश्चर्य असं की हे बोलतानाही ते थोडे अडखळले होते आणि आपलं हे अडखळणं शांताबाईंच्या लक्षात तर आलं नाही या विचारानं अस्वस्थ झाले होते. आपल्या शब्दातनं नको तो ध्वनी तर त्यांना एकू गेला नाही ना या विचारानं ते गांगरले होते...



गेले आठ दिवस त्यांच्या मनात अशाच उलट-सुलट विचारांचे वारे घोंघावत होते. गरजेच्या वेळी शांताबाईंना आपलीच आठवण झाली या विचारानं ते सुखावले होते. हवी असलेली मदत मागतानाही आपलं माणूस झालं म्हणून त्याला किती त्रास व्हायचा ? असं त्या म्हणाल्या होत्या ते त्यांना अनेकदा आठवलं होतं आणि आता तुमची काळजी घेणारं घरात कोणी नाही, निर्मलाबाई होत्या त्या वेळची गोष्ट वेगळी होती.' या शब्दानी तर ते अंतर्मुख झाले होते. 'शांताबाईंच्या मनात तरी काय आहे ?' या विचारानं मग त्यांचा सारखा पिच्छा पुरविला होता. आपली पत्नी आपणाला सोडून गेली, मुलगा शिक्षणाच्या निमित्तानं दूर गेला आणि ज्याला 'आपलं माणूस' म्हणता येईल असं जवळ कोणीच राहिलं नाही हा विचार कधी नव्हे तो त्यांच्या मनात या प्रसंगानं सारखा डोकावू लागला. 'आता तुमची काळजी घेणारं घरात कोणी नाही' असं म्हणून शांताबाईंनी आडमार्गानं तर काही सुचविलं नाही ? स्वभावतःच स्त्री बोलण्यात मोठी चतुर असते आणि आपलं मनोगत ती मोठ्या कुशलतेनं प्रगट करते—तसं तर या वेळीही झालं नसेल ?

निर्मलाबाई गल्यापासून—आणि विशेषतः सुहास येऊन गेल्यापासून—त्यांना खरोखरच फार एकटं एकटं वाटत होतं. पण शांताबाईंचे एकेक उद्गार त्यांना आठवू लागत तसतसा त्यांचा नवा अर्थ त्यांच्या मनात उलगडू लागे आणि या नव्या अर्थाची त्यांना भीतीही वाटे...'आता या वयात का लग्नाचा विषय मनात येऊ द्यायचा ? वानप्रस्थाश्रमाच्या वाटेवरची माणसं आता आम्ही !' असं ते स्वतःशीच म्हणायचे...

पण आश्चर्य असं की त्यांनी आपल्या मनाची कितीही समजूत घातली तरीही हा विषय त्यांच्या मनाच्या पृष्ठभागावर येऊन तरंगू लागायचा. माणसाचं मन कधी मोकळं राहूच नये असा त्याला शापच आहे की काय असं त्यांच्या मनात पुनः पुन्हा यायचं आणि ते म्हणायचे, मानकामे मास्तर म्हणतात तेच खरं असेल—निसर्ग पोकळी राहूच देत नसेल...

निदान त्यांना स्वतःला तरी हा अनुभव आता सारखा येऊ लागला होता. शांताबाईंचं हसणं, बोलणं, पाहाणं त्यांना मोठं रहस्यमय वाटू लागलं होतं. त्या काही तरी सांगू पाहातात, पण त्यांच्या मुखातनं शब्दच बाहेर पडत नसावेत, त्यांचं मन अडखळत असावं असं त्यांना सारखं वाटायचं. पुण्याला जाऊन आल्यापासून तर त्यांच्या वागण्यात जो सूक्ष्म फरक पडल्याचं त्यांच्या लक्षात आलं होतं. त्यामुळे तर त्यांच्या मनाची अधिकच चलबिचल होत होती. ते मनाशी म्हणत, 'मला जसं एकटं एकटं वाटतं, तसंच तर शांताबाईनाही वाटत नसेल ? कुणाचा तरी आधार मला हवासा वाटतो तसंच त्यांनाही वाटत नसेल ? त्यांच्याजवळ शीला होती तेव्हा तिच्या भोवती त्यांचं मन रात्रंदिवस घुटमळत असे, पण गेल्या वर्षी ती कॉलेजात पुण्याला गेली तेव्हाच त्या ओक्साबोक्शी रडल्या होत्या त्या एकटेपणाच्या जाणीवेनंच नाही ? आता तर

अनुक्रमणिका







त्यांना वाटत असेल, उद्या शीलाचं लग्न झालं आणि ती आपल्या घरी गेली की कसा काढायचा सारा जन्म ? परवा त्या पुण्याला गेल्या तेव्हा तर त्यांना आपल्या लेकीचं कुणावर तरी जडलेलं प्रेमबिम तर नाही दृष्टीस पडलं आणि त्या अधिकच अस्वस्थ झाल्या ?

बबनरावांच्या मनात ही उलट-सुलट प्रश्नोत्तरांची वर्तुळं फिरत होती तसं त्यांचं मन अधिकच भांबावून जात होतं. त्यांचं शाळेच्या कामाकडे नीट लक्ष लागत नव्हतं. शाळेची इन्स्पेक्शन पंधरा दिवसांवर आली होती आणि शाळेच्या इमारतीला रंग लावून घ्यायचा होता, फर्निचर दुरुस्त करून घ्यायचं होतं या गोष्टींची ते चालढकल करीत होते. कसला उत्साह म्हणून त्यांच्या मनात उरला नव्हता. 'निर्मलाबाई गेल्यापासून बबनरावांना सारं जिणंच फोल वाटू लागलंय' असे सहकारी शिक्षक म्हणू लागले होते. ते ऐकून मात्र ते स्वतःशीच, पण खिन्नपणे हसत होते आणि मनातल्या मनात म्हणत होते, माणसाचं मन म्हणजे एक महासागर आहे म्हणतात ते काही खोटं नाही. त्याच्या तळाशी काय चाललंय ते कधी कुणाला कळायचं नाही...

अशा विमनस्क मनःस्थितीतच ते एक दिवस आपल्या ऑफिसात बसले असताना काही कल्पना नसताना शांताबाई संथ पावलांनी त्यांच्या मागं येऊन उभ्या राहिल्या आणि म्हणाल्या,

"पुण्याहून आल्यापासनं तुमची निवांतपणे गाठ घ्यायची म्हणतेय, पण तुम्हीच सारखे कामात दिसता—रविवारी सकाळी घरीच येईन मी, चालेल ? "

शांताबाईंचे ते अनपेक्षित उद्गार ऐकून बबनराव स्वप्नातनं जाग यावी तसे जागे झाले आणि म्हणाले,

"हो, हो; या; या, ना... मी काय मोकळाच आहे..

शांताबाई हसत हसत निघून गेल्या तसा त्यांच्या बोलण्याचा सारा अर्थ त्यांच्या लक्षात आला, पण येवढं मुद्दाम घरी येऊन सांगण्यासारखं आहे तरी काय याचा काही केल्या त्यांना अंदाजच येईना. निर्मलाबाई होत्या तेव्हा कोणत्या ना कोणत्या निमित्तानं त्या आपल्या घरी आल्या होत्या हे त्यांना आठवत होतं, पण त्या गेल्या तसं त्यांचं घरी येणं-जाणं संपलं होतं. शीलासाठी काही हवं झालं, तिच्याबद्दल काही सांगायचं असलं तर त्या शाळेतच त्यांच्या-कडे येत, मोकळेपणानं सारं सांगत आणि आपण 'शक्य ते सारं करतो' असं म्हटलं की आनंदानं जात हे त्यांना ठाऊक होतं.

पण त्यांनी मुद्दाम घरी येण्याची भाषा काढावी आणि 'तुमची निवांतपणे गाठ घ्यायची आहे' असं म्हणावं याचा अर्थ त्यांना जे सांगायचं होतं ते शक्य तर कुणाच्या कानावर जाऊ नये अशी त्यांची इच्छा होती या विचारानं बबनराव सुखावले होते. आपला भिडस्त स्वभाव ओळखून शांताबाईंनीच धीटपणानं अखेर आपलं मन उघड करायचं ठरविलं असावं याचा त्यांना आनंद झाला होता. त्यांच्या साऱ्या व्यवहारांना यामुळंच की काय आता एक नवी गती आली होती. शाळेला रंग लावून घ्यायचा आहे, शाळेतलं फर्निचर दुरुस्त करायचं आहे याची जाणीव त्यांना आता तीव्रतेनं झाली होती. त्यांनी भराभर माणसांना निरोप पाठविले होते, 'पुढच्या शनिवारच्या आत सारी कामं पुरी झाली पाहिजेत' असं साऱ्यांना बजावलं होतं...

बबनरावांना असं आनंदात असलेलं आताशा कुणी पाहिलं नव्हतं. शाळेचा निकाल यंदा चांगला लागला. शेखर गोडबोलेला जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ती मिळाली. त्रिलोकचंद शेटजींनी 'सायन्स हॉल' बांधून द्यायचं मान्य केलं. या साऱ्या गोष्टी मनासारख्या झाल्या म्हणून आताशा बबनराव आनंदात असतात हे सारी उमजली होती, पण या साऱ्या बाह्य गोष्टींइतकीच त्यांचं मन मोहरून जाण्यायेवढी आणखीही एक गोष्ट घडली होती याची मात्र कुणालाच कल्पना नव्हती !

गंमत अशी, की त्यांच्याकडे रविवारी सकाळी शांताबाई खरोखरीच कशासाठी येणार होत्या याची त्यांनाच कल्पना नव्हती. कुणाच्या तरी आधारासाठी, कुणाच्या तरी सहवासासाठी भुकेलेलं त्यांचं मन मात्र म्हणत होतं, खरंच, शांताबाईंनी सूचकपणे लग्नासारखा विषय काढलाच तर त्यांना काय सांगायचं ?

या विषयाशीच त्यांचं मन मग चाळा करीत राहिलं, सतत.. रात्रंदिवस. आपल्या लेकीसाठी एखादं चांगलं स्थळ त्यांच्या आढळात आलं असेल आणि त्याबद्दल आपला सल्ला घेण्यासाठी तर शांताबाई मुद्दाम येत नसतील असाही विचार त्यांच्या मनात आला. पण तो क्षणभरच. असं असेल तर त्यासाठी येवढं निवांतपणे कशाला भटायला हवं अशी शंका त्यांच्या दुसऱ्या मनानं काढली आणि आलेल्या शंकेचं निरसन केलं.

शांताबाई येणार आहेत त्या आपल्या मनाचा अंदाज घेण्यासाठीच, अशी त्यांच्या मनाची खात्री होऊ लागली तसं त्यांचं मन निरनिराळ्या दिशांनी धावू लागलं. त्यांच्या विचारांना निरनिराळे फाटे फुटू लागले. जननिंदेची त्यांना भीती वाटू लागली. शाळेतल्या प्रौढ शिक्षकांनीच विवाह केला तर कोवळ्या वयाच्या मुलांवर त्याचा अनिष्ट परिणाम तर होणार नाही अशा संशयाची पाल त्यांच्या मनात चुकचुकली. निर्मलाबाईंच्या निधनाला काही महिनेही लोटले नाहीत तोच आपण या मार्गानं जाणं योग्य नव्हे या विचाराने दंशही त्यांच्या मनाला झाले.

पण क्षणातच त्यांच्या मनानं पलट खाल्ली. लोक काहीही केलं तरी दूषणं देतातच, मग स्वतःच्या मनाला पटेल त्याप्रमाणेच वागणं चांगलं नाही का, हा विचार त्यांच्या मनात येऊ लागला आणि त्यांना एक नवा धीर आला. लोकनिंदेच्या काळचा सावल्या त्यांना भिवविनाश्या झाल्या. नीतीच्या कल्पना त्यांना फोल वाटू लागल्या. माणसानं अखेर स्वतःच्या मनाला साक्ष ठेवून वागावं यातच शहाणपण आहे या विचारावर ते आले, तसं त्यांचं मन निवलं, शांत झालं.

शांताबाईंनी विषय काढला की ते आता मोकळेपणानं त्यांच्याशी बोलणार होते. 'उद्या सुहास आपल्या वाटेनं जाईल, शीला आपल्या मार्गानं जाईल आणि म्हातारपणी आपणाला आधार मिळेल तो परस्परांचाच. लोक चार दिवस बरं-वाईट बोलतील आणि सारं विसरूनही जातील' अशा शब्दानी ते शांताबाईंना संमती देणार होते आणि मग हळच विचारणार होते, 'पण शीलाला विचारलं आहे ना तुम्ही ?' शांताबाई त्यांच्या या बोलण्यावर मग मोकळेपणानं हसत म्हणणार होत्या, 'सुहासला आवडेल ना हे सारं ?

रविवार येईपर्यंत बबनरावांच्या मनात हे विचार घोळत राहिले आणि अखेर शांताबाई आल्या तसे ते त्यांना म्हणाले,

"किती दिवसांनी आलात घरी !

"याच्या अगोदरच येणार होते–"














अनुक्रमणिका

"अस्सं ? . . ."
"होय, पण भीती वाटत होती !
"माझी ? तुम्हांला ?
"होय, मला आणि शीलालाही !"

शांताबाई काय बोलत होत्या ते त्यांना कळत नव्हतं आणि गून ते म्हणाले,

"आजपर्यंत माझी कुणाला भीती वाटलेली नाही !
"पण आता वाटतीय ना ! शीला तर घाबरून गेलीय."
"शीला ? तुमची शीला ? "
"आता ती माझीच राहिलेली नाही. तुमचीही झाली आहे.
"म्ह. . .म्हणजे ? . ?."

"म्हणजे. . .कसं सांगायचं तेच कळत नाही मला. तिनं आणि सुहासनं आपलं लग्न परस्परच ठरवलंय. आणा-भाकाही झाल्या आहेत त्यांच्या. निर्मलाताई गेल्यानंतर तो आला होता ना, तेव्हाच त्यांनी हे ठरवलं, पण शीलानं मला काही पत्ता लागू दिला नाही. परवां त्याचं अमेरिकेतनं पत्र आलंय शीलाला की आपण सारं कळवतो वडिलांना म्हणून ! मला होती थोडी कल्पना याची पण शीलानं शपथ घालून सांगितलं आहे की यातलं काही सुद्धा येवढ्यातच बोलायचं नाही. पण मलाच राहवेना. तुमच्यासारख्या उपकारकर्त्यापासून काही लपवून ठेवण्याची कल्पनाच सहन होईना. म्हणून म्हटलं की तुम्हांला भेटावं आणि निवांतपणे सारं काही सांगावं, तुम्ही रागावलात तरी तुमचा राग सहन करावा आणि म्हणावं, 'माझ्या शीलाला आता आपली म्हणा !' मुलांच्या, हातून चुका होतात, त्यांना आपणच सांभाळून घ्यायला हवं असतं असं तुम्हीच म्हणता ना ? आज निर्मलाताई असत्या तर त्यांना केवढा आनंद झाला असता ! 'अशी मुलगी सून म्हणून आपल्या घरात यावी असं कुणालाही वाटल' असं नेहमी म्हणायच्या त्या माझ्याजवळ शीलाला पाहिलं म्हणजे ! "

आपण काय ऐकत आहो हेच बबनरावांना समजत नव्हतं. एका क्षणात सारी नाती बदलली होती. व्याह्याचं नवं नातं निर्माण झालं होतं. आपण कसली अपेक्षा केली होती आणि अखर झालं काय या विचारानं त्यांचं मस्तक सुन्न झालं होतं आणि काय बोलावं हेच त्यांना सुचत नव्हतं !

खरं सांगायचं तर बोलण्यासारखं काही उरलंच नव्हतं ! पण शांताबाईनी खोदखोदून विचारलंच असतं तर मात्र ते म्हणाले असते, "जोडा कसा छान आहे, उत्तम आहे !" ●



(पान ७ वरून—रसिक हो...)

तो प्रयोग दीपावलीने सतत वहा वर्षे यशस्वीपणे केला. हिंदी जगाची मागणी असूनही केवळ व्याप कमी करण्याच्या भूमिकेमुळे मी 'हिंदी वार्षिक'चा नाद सोडला. अन्यथा ह्या रौप्य महोत्सवात 'हिंदी' दीपावलीही सहभागी होऊ शकली असती.

गतवर्षी 'दीपावली'ने कादंबरी स्पर्धा आयोजित केली होती. त्या स्पर्धेबाबत अनेकांनी अनेक शंका व इच्छारंजन केले. परंतु स्पर्धेला ४५ कादंबऱ्यांची हस्तलिखिते आली. शंकारंजनाला परस्पर उत्तर मिळाले. 'दीपावली'वरील श्रद्धा-विश्वास-प्रेमाचेच ते निदर्शक आहे असेच मी मानतो. त्या स्पर्धेतील 'प्रतीक्षा' ह्या कादंबरीचे केवळ परीक्षक—वाचकांनीच स्वागत केले असे नसून अनेक जाणकार समीक्षकांनी पसंतीचा इसार दिला आहे. 'रणांगण'बरोबरचे कर्तृत्वही काहींनी बहाल केले आहे ही एकच गोष्ट 'टीकेविना' नमूद करतो. त्या स्पर्धेचे परीक्षक म्हणून काम केलेल्या सौ. मालतीबाई बेडेकर, श्री. अरविंद गोखले, श्री. जयवंत दळवी ह्या तिघांच्या 'साक्षेपी' 'चोखंदळ' 'परीक्षे'तून हे सुवर्ण 'दीपावली' देऊ शकली. परीक्षकांचे पुनश्च आभार मानतो. यंदाच्या 'विनोदी साहित्य' स्पर्धेला ८७ स्पर्धक लाभले व पारितोषिकपात्र साहित्य प्रस्तुत अंकात भेटीला येत आहेच. यंदाच्या अंकातील जयवंत दळवी व अच्युत बर्वे यांच्या दोन कादंबरिका आपापल्या वैशिष्ट्यांनी रसिकमान्यता मिळवितील आणि 'रौप्य-महोत्सवी खास भेट' म्हणून गाजतील असा विश्वास वाटतो.

हे सारे साहित्य देताना 'दीपावली'ने जे जे लोकप्रिय असत वा होते ते ते सारे चांगलेच असते, असलेच पाहिजे असाही भ्रम 'दीपावली'ला कधी झाला नाही. वैयक्तिक निंदा—नालस्ती—कुचाळकीचा वारा 'दीपावली'च्या शिडात कधी शिरला नाही. मते आणि मतभेद मांडले, पण मूर्तिभंजनासाठी 'कुऱ्हाड' म्हणून लेखणीचा वा कुंचल्याचा वापर केला नाही. होऊ दिला नाही. कोणतेही पीठ वा पंथ मानला नाही व आपलेही पीठ वा आपला पंथ होऊ दिला नाही. विद्यमान पंथ—पीठातले जे जे उत्तम, सुंदर कलात्मक व राष्ट्रहितैषी वाटले त्याचे त्याचे स्वागत दीपावलीने केले. ते करताना पुरोगामी—प्रतिगामी, नवे—जुने वगैरेच्या घोळात 'दीपावली' पडली नाही ! 'कलात्मक आवाहन' महत्वाचे मानले. कलेचे पीठ मोलाचे मानले. साहित्याचा ध्वजदंड हाती धरला. आणि संस्कृतीचा थोर वारसा जपून व यथामती, यथाशक्ती वर्धिष्णु करण्याचा प्रयत्न करीत सारा व्यवहार चालविला आहे. दीपावलीने अयोग्य तडजोडी स्वीकारल्या नाहीत तसाच स्वाभिमानही सोडला नाही. कुठलीही लाचार आवाहने केली नाहीत. याबाबतचे यशापयश जोखण्याचा अधिकार अर्थातच आमचा नाही, तो आपला आहे. तो कौल अनुकूल होता व आहे म्हणूनच 'दीपावली'ला रौप्यमहोत्सवी चंद्र गवसला आहे.






अनुक्रमणिका








# सोडवा ही शब्दसमस्या

स्नुषा स्तनवस्त्रं परित्यक्त्वा श्वशुरं प्रार्थयते
(सुनने स्तनांवरील वस्त्र दूर सारून सासऱ्याची प्रार्थना केली).

* * *

(२) एक विलक्षण असे सरोवर, मानस त्याचे नाव–
विचित्र तेथे आहेत पक्षी हंस द्विजांचे राव
नित्य प्राशिती शोणित ते हो दुग्ध देती वत्सास
कोण हंस ते ? मानस कुठले ? तुम्ही सांगा अम्हांस

* * *

(३) अहिकुल वहनाचे वहन आणीत होते
शशिधर वहनाने ताडिले मार्गपंथी
नदिपतीरिपु ज्याचा तात भंगून गेला
रविसुत महिसंगे फार दुःखित झाला

* * *

(४) जगाच्या पाठीवर अशी एक माता आहे की तिच्या नेत्रात विलक्षण सामर्थ्य आहे. केवळ नजरेने ती आपल्या मुलांना वाढवते. ती कोण ?

* *

(५) कः शूरः ? (शूर कोण? ) (उत्तरे २२४ पान वर)




शासकीय धोरणे (आणि धोरणी राज्यकर्ते)

गेल्या पंचवीस वर्षाच्या काळातल्या अनेकविध प्रयोगांचा साक्षेपी आढावा गेल्या काही महिन्यात सर्वश्री भय्यासाहेब ओंकार, प्र. श्री. नेरुरकर, आनंद साधले, प्रभाकर अत्रे व शां. ह. रेगे ह्या मंडळींनी घेतला आहे. त्या बाबतीत एक खंत वा सल व्यक्त करावीशी वाटते. स्वाभिमान जपून, वारकरी निष्ठांचा सुयोग्य अभिमान सांभाळून, साहित्य–संस्कृती–कलातले जे जे उत्तम आहे त्याचा गौरव होत रहावा असे वाटत असेल तर दीपावली वार्षिका-प्रमाणेच मासिक दीपावलीलाही मराठी साहित्य रसिकांनी योग्य प्रतिसाद देणे अगत्याचे आहे असे वाटते. रौप्यमहोत्सवाच्या उंबरठ्यावर उभे राहून दीपावली असे आवाहन प्रथमच करीत आहे. अशा मैफली रंगतात त्या रसीली दाद मिळाली तर !! पंचवीस वर्षांच्या मूक व निरलस कलासाधनेनंतर हे आवाहन दीपावली करीत आहे. "साहित्य–कला–संस्कृति" संगम घडला–जपला गेला तर जीवन जपले गेले. जीवनातले सत्य–शिव–सुंदर जपले गेले अशी आमची श्रद्धा आहे. तो वारसा जपण्यासाठी तुम्ही साऱ्यांनी मासिक मैफलींनाही रसीली दाद देण्याची गरज आहे. ती तुम्ही द्याल असा विश्वास व्यक्त करतो.

'दीपावली'च्या या पंचवीस वर्षाच्या प्रवासात अनेक नामवंत व अनामिक व्यक्तींचे साहाय्य–सहकार्य दीपावलीला लाभले. त्यामुळे 'अनंतहस्ते कमलावराने, देता किती घेशील दो करांनी' अशी मनःस्थिती होऊन जाते.

लेखक, कवी, व्यंगचित्रकार, छायाचित्रकार, वर्गणीदार, जाहिरातदार, महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेरही सर्वत्र पसरलेले वितरक, रसिक वाचक या सर्वांच्या अमोल सहकार्यामुळेच ही वाटचाल घडली. यासंबंधी काही खास उल्लेख करायलाच हवा. मासिक किंवा वार्षिक सर्व दृष्टीने यशस्वी होण्यास उत्कृष्ट वाङ्मयाइतकीच भरपूर जाहिरातींचीही मदत लागतेच, किंबहुना जाहिरात हा नियतकालिकांचा 'प्राणवायू'च मानायला हरकत नाही. त्याविना कोणतेही नियतकालिक 'जिवंत' राहणेच अशक्य आहे. दीपावलीच्या जन्मापासून असे सक्रीय सहकार्य अनेक मान्यवर संस्थांकडून लाभले व ते आजतागायत मिळत आहे. किर्लोस्कर ऑईल इंजिन्स व किर्लोस्कर समूहाचे माननीय श्री. शंतनुराव किर्लोस्कर, स्वस्तिक रबर प्रॉडक्टस्‌चे श्री. वसंतराव वैद्य, कॅलिको मिल्स–साराभाई ग्रूप, स्वस्तिक ऑईल मिल्स वगैरे मान्यवर संस्थांच्या अध्वर्यू श्रीमती गिराबेन साराभाई, 'शिल्पी' जाहिरात संस्थेचे जनरल मॅनेजर व माझे लेखक मित्र श्री. अच्युतराव बर्वे, 'डोंगरे बालामृता'चे श्री. बाळासाहेब व श्री. नानासाहेब डोंगरे, सिन्नरचे सुप्रसिद्ध विडी कारखानदार श्री. देवकिसनजी सारडा आणि श्री. रामनाथशेठ चांडक आणि महाराष्ट्रातील इतर अनेक मान्यवर संस्थांचे सहकार्य नियमित लाभले आहे. मेसर्स टॉम ॲण्ड बे प्रा. लि. या जाहिरात संस्थेचे सूत्रधार आमचे मित्र श्री. गणेशराव तांबे यांचा स्वतःच्या संस्थेचा व्याप

[पान २२६ वर]









अनुक्रमणिका








## 'गैरसमज'

ळख पटली मला तुझीही, तशीच माझी तुला।
सखे ! मज, ध्यास तुझा लागला ॥ १ ॥
मस्त सावळी काया पाहुनि, रसरसलेली अशी।
चुंबनी, प्रथम पाडिशी फशी ॥ २ ॥
सुरू जाहल्या गाठी-भेटी, चोरुनि त्याही कशा।
आजही स्मरत जशाच्या तशा ॥ ३ ॥
अनुभव तो हा नवा निराळा, मंत्रीतुनि लाभला।
आठवे, दिन मीलन आपुला ॥ ४ ॥
करे फिरवुनी सोडित नाडी, वस्त्र फेडि फरफरा।
प्रमोदे, उचलुनि घेई करा ॥ ५ ॥
मस्त रगडिता मुग्ध अशी तू, सुधा-मीलनांतरी।
क्षणी त्या, फुलत सदा सत्वरी ॥ ६ ॥
कडकपणाची लज्जत न्यारी, आठवते घडिघडी।
वाटते, चाखावी हरघडी ॥ ७ ॥
घेती संशय सखे ! तुझा तो, भुरळ घालुनी मला।
सांगती, तू नादी लाविला ॥ ८ ॥
कुणी कळेना चुगली केली, म्हणति बिघडला असा।
जगाचे, तोंड धरू मी कसा ? ॥ ९ ॥
अर्धांगीही तसा पिता हा, माता ही कोपली।
वहीणहि, टाकुनि की बोलली ॥ १० ॥
हा छंद कुणी अन् तुला लाविला कसा ?
तू कुळा काळिमा लाविशी का हा असा ?
का लाज सर्वही पीत कोळुनी कसा ?
प्रश्न वाकडे ऐकुनि येई, कींव जगाची मला।
पराचा, करिताही कावळा ॥ ११ ॥
अहो ! ! न कोणी नार 'तमाखू', धिक्कारुनि बोललो।
जगावर, तुझ्यासवे थुंकलो ॥ १२ ॥

— पंडित महाजन

# समस्यापूर्ती

[ 'सोडवा ही शब्दसमस्या'मधील पान २२१ वरील कोड्यांची उत्तरे ]

(१) हे कोडे अश्लील वाटले तरी ते तसे नाही या उत्तरावरून दिसेल :—
हिंडिबा भीम वनिता ग्रीष्में धर्मार्तपीडिता
स्तनवस्त्रं परित्यक्त्वा वायुं अप्रार्थयत
[भीमाची पत्नी हिंडिबा एकटीच वनात हिंडत असता ग्रीष्माच्या तापाने घामेजून गेली तेव्हा आजुबाजूला कोणी नाही असे पाहून तिने आपल्या स्तनांवरील वस्त्र दूर केले आणि वायूची (भीमाचा पिता म्हणजेच हिंडिबेचा सासरा) ती प्रार्थना करू लागली]

(२) असा विलक्षण असे जलाशय, जलाविना राही
पंख हरवुनी हंस पहुडले, त्याच्या जवळी पाही
'तेथे' याचा तर्क लाविता, हृद्देशी ते बसले
छात्रगणानो, पहा पहा रे कोडे माझे सुटले
वात्सल्याचा स्पर्श पावता, दुग्ध होय रुधिराचे झाले.
मातेच्या मानसी सरोवर, हंस स्तनांचे साचे ॥

(३) अहिकुल वहनाचे वहन म्हणजे भुंगे जिथे राहतात ते कमल. त्याला वाढवणारे जे, म्हणजे पाणी आणी होते. तेव्हां शशिधर म्हणजे शंकराच्या वाहनाने (बैलाने) वाटेत मारले. नदीपती रिपु ज्याचा—म्हणज समुद्र ज्याचा शत्रू तो अगस्ती आणि त्याचा तात म्हणजे घागर (मडके) फुटून गेली आणि रविसुत म्हणजे कर्ण किंवा कान महीसंगे म्हणजे जमिनीवर पडून अतिशय दुखावला.

* * *

(४) कासवी.

* *

(५) ललनालोचनबाणैः यः न विद्धः स शूरः।
(यौवनमत्त स्त्री कटाक्षांनी (बाणांनी) जो जखमी होत नाही तो शूर).

प्रेषक : अशोक परांजपे














## ऑक्टोबर, १९६९

सकाळीच
एक तारीख फाडली
तेव्हा हात पुसटसे थरथरले.
रात्री मारलेल्या ढेकणांचं रक्त
अजून बोटावोटावर ओलसर होतं.
उद्या दुसरी तारीख फाडीन.
परवा तिसरी
यापुढे हात नाहीत थरथरणार
आजच्यासारखे.

आजच्यापुरतं लक्ष्यात
एवढंच राहील:
कोवळं ऊन..निव्वळ..
हवेत सोनेरी गारठा
जरीवारीत असतो तसा..
पाखरं कुलकुलणारी
[illegible]ांसारखी..
ऊन.
हवी घून.

उद्याही हे असंच असेल का?
उद्या..परवा..तेरवा..
तेरवाच्या परवाच्या तेरवा..?

न् एरव्ही
असंच हे ऊन
वैष्णव..?

## रक्ताष्टमी

केव्हांचे थय्थय्
नाचतोय् आम्ही
अंगाला फासून तुझं रक्त.
हे रक्त ओंजळभरसुद्धा नाही
हे आम्हाला माहीत नाही
असं नाही.
'एवढा कसा रे हाडकुळा तू?)
उडून जाणाराय्
तुझ्या नौखाळीच्या यात्रेसारखं
याची आम्हांला फिकीर नाही.
तुझ्यासारखाच आम्ही दुसरा पकडू



## गांधींचं नाव घेतो कधी काळी....

प्रा. स दा नं द रे गे

तुझ्यापेक्षा जरा गुबगुबीत.
कुणाच्या मस्तकामागे लावायचं
तेजोवलय
कुणाच्या नाही
हे आमच्या हातात आहे.
रेशनिंग नसलेली एकच चीज आहे
आमच्या राज्यात उघडया बाजारात.
रक्त.
आमच्या मुक्तबंध नाचाला
कुणीही पायबंद घालू शकणार नाही.
थय्थय्...थय्थय्..
धर ठेका..बांध घुंगुट..
फास गुलाल द्रष्टया चेहऱ्यावर..
आमचं ऐक..आमच्यात ये..
आमचं ऐक..आमच्यात ये..
आमचा हो
अन् गिरकी घेत स्वत:भोवतीच
आमची विनवणी कर..
नका हो नका,
माझं तेजोवलय पुसून टाकू नका!

## जन्मानतर शंभर वर्षांनी....

आज तुझा पाळणा
काय सज्जड सजवलाय्...
खास काठेवाडी बाजाचा.
डोळयांना आंघोळ घालताय्त
आज आरशांच्या सरी..
जावं तिकडे रंग..नुसते रंग..
कमरेत वाकून वाकून
करताय्त मुजरे..
सगळेच आज सगळयांचे हुजरे..
पाळण्यात थेट
तुझ्यासारखीच मातीची बाहुली..
चष्मा लावलेली..पंचा नेसवलेली..
खुळकन् हंसणारी..
नि वर चिमण्या
खरोखरीच्या
छान चुरगाळून झुबक्या झुबक्यानं लावलेल्या..
ठिब्ठिब्..
कसं छान ठिबकतंय् रक्त
विरघळणाऱ्या
गौड मल्हारासारखं....

---

(पृष्ठ २२२ वरून--रसिकहो...)

...राच मोठा झालेला आहे. तरीही गेली पंचवीस वर्षे ...नी दीपावली घरचीच मानली आणि अजूनही त्याच नात्याने ते ...पले घरेलू सहकार्य दीपावलीला देत आहेत. दीपावली, वार्षिक स्वरूपात प्रसिद्ध होत असे त्यावेळी संपादनकार्यात सर्वश्री रॉय किणीकर, ग. रा. कामत, विजय तेंडुलकर, अच्युत बर्वे, प्रभाकर अत्रे, बाळ सामंत, कै. गोपाळकृष्ण भोबे यांच्या बहुमोल साहाय्याबद्दल आणि पुण्याचे सुप्रसिद्ध प्रकाशक रा. ज. देशमुख यांच्याही त्या काळी लाभलेल्या सहकार्याबद्दल मी कृतज्ञता व्यक्त करतो.





दीपावलीच्या ह्या रौप्यमहोत्सवी वर्षाच्या उंबरठ्यावर उभे राहून मी सहज मागे वळून पाहतो तेव्हा अनेकांची स्मरणे मनात घोटाळू लागतात. अनेक ज्ञात अज्ञात व्यक्तींचे साहाय्य हृया संसारात झाले आहे. हा आहे सामाजिक संसार! माणसांच्या त्यांच्या कथा–व्ययांचा संसार!! गोपाळकृष्ण भोबे यांच्यासारखा एखादा मध्येच उठून गेला. मैफल चालूच राहिली. राहिली सामाजिक मैफल आहे. इथे कळत–नकळतच एक व्यापक बैठक लाभते. आपले सूर सामाजिक सुरात केव्हा मिसळून जातात ते कळतही नाही. असे सूर जुळविण्याच्या प्रयत्नात ज्या ज्ञात-अज्ञात व्यक्तींचे साहाय्य 'दीपावली'ला झाले आहे त्या साऱ्यांचे मी मनःपूर्वक आभार मानतो.

'दीपावली'च्या हृया साऱ्या धडपडीला केंद्र शासन व राज्य शासनाचेही जे सहकार्य सतत लाभत आले आहे त्याचा खास उल्लेख केला पाहिजे. 'दीपावली'च्या कलात्मक निर्मितीला १९६४ सालचे केंद्रशासनाचे श्रेष्ठ गुणवत्ता प्रशस्तिपत्र ... केंद्रशासनाने जणु शाबासकीची थापच मारली आहे. ते ... हे एक प्रेरणास्थान आहे. साधनेतली ती इसार पावती ... मी मानतो. हृया प्रसंगी केंद्र व राज्य शासनाने दीपावलीला हा जो स्नेह दिला त्याचेही मी कृतज्ञतापूर्वक स्मरण करतो.

दीपावलीच्या कुटुंबातील श्री. श्री. स. दाभोळकर, देसाई, कृ. वि. पेठे, चंद्रकान्त अ. दळी, धामणकर, वांदोडकर, भुरदे, प्रभाकर अत्रे यांचे मी मनःपूर्वक आभार मानतो. अशोक प्रिंटिंग प्रेसचे सावंत पितापुत्र व कामगार वर्ग, जगदीश्वर प्रेसचे श्री. भालचंद्र पाठक, दीपावलीचे वैशिष्टय राखणारी रंगीत छपाई करणारे आशा प्रिंटरीचे श्री. भाई व श्री. सुरेश मालपेकर, तसेच चित्रांचे सुंदर ब्लॉक्स तयार करून देणारे प्रभात प्रोसेस स्टुडियोचे श्री. विष्णुपंत कडव आणि धारगळकर प्रोसेस प्रा. लि. चे श्री. धारगळकर यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानतो.

शेवटचे पण अत्यंत महत्त्वाचे आभार मानावयाचे ते म्हणजे दीपावली वाचकांपर्यंत तत्परतेने पोहोचविणारे आमचे मित्र श्री. बाबूराव बागवे आणि सर्वदूर विखुरलेले आमचे ठिकठिकाणचे वितरक यांचे होत. दीपावलीच्या रजतमहोत्सवाच्या निमित्ताने मी या सर्वांना धन्यवाद देऊन त्यांचे मनःपूर्वक आभार मानतो.

जगन्नाथाचा रथ निघाला आहे. त्या जगन्नाथाजवळ श्री ज्ञानेश्वरांच्या शब्दात एकच मागणे मागतो.

दुरिताचे तिमिर जावो, विश्वस्वधर्म सूर्ये पाहो
जो जे वांछील तो ते लाहो, प्राणिजात!!

हृया इप्सितसाधनेच्या मार्गावरील एक दीप होण्याची कांक्षा दीपावली बाळगते. ते घडो ही प्रार्थना!!

दीनानाथ दामोदर दलाल, संपादक

अनुक्रमणिका

